अन्त्यानुप्रास हा शब्द रूढ व्हावा हें इष्ट आहे; परन्तु यमक हा शब्द आधीच रूढ होऊन बसला आहे; आणि अन्त्यानुप्रास हा शब्द तितका उच्चारसुलभ नि सुटसुटीत नाही. तेव्हा यमक हा शब्द अन्त्यानुप्रासाच्या ठिकाणीं वापरून संस्कृतांत ज्याला यमक म्हणतात त्याला केवळ अक्षरावृत्ति म्हणावें; आणि वाङ्मयांत यमकाची तहान केव्हा केव्हा अक्षरावृत्तीवरच भागवून घेण्यांत येते असे समजावें.

यमकाचा इतिहास

यमक हे संस्कृत वाङ्मयांत दुर्मिळ आहे. अलङ्कार म्हणून अनेकाक्षरावृत्तीचा उपयोग चरणान्तीहि भारवि, माघ इत्यादिकांनी केलेला आढळतो.

"सकलविबुधलोक: स्त्रस्तनि:शेषशोक
कृतरिपुविजयाश: प्राप्तयुद्धावकाश:
अजनि हरसुतेनानन्तवीर्येण तेना-
खिलविबुधचमूनाम प्राप्य लक्ष्मीमनूनाम" (कूस १३।५१)

या चतुष्पदींत यमकें आहेत; परन्तु हा सर्ग प्रक्षित भागापैकी आहे असें म्हणतात. गीतगोविन्दकाव्यांत आणि मोहमुद्गर काव्यांत यमक आहे.

"ललितवङ्गलतापरिशीलनकोमलमलयसमीरे
मधुकरनिकरकरम्बितकोकिलकूजितकुञ्जकुटीरे" (गीगो १।३)

"दिनमपि रजनी सायंप्रात:
शिशिरवसन्तौ पुनरायात:
काल: क्रिडति गच्छत्यायु-
स्तदपि न मुञ्चत्याशावायु (मोमु १)

भरताच्या नाट्यशास्त्रांतील

"शङ्कर: शूलभृत
पातु मां लोककृत" ( भ ३२।५१)

या उदाहरणांत यमक आहे; असे व्यज्जनान्त यमक मराठींत फारच दुर्मिळ आहे. संस्कृतांत मात्र पहा:-

"गर्जसि मेघ न यच्छसि तोयं
चातकपक्षी व्याकुलितोऽहम

दैवादिह यदि दक्षिणवात:
क्क त्वं क्काहं क्क च जलपात:" (पूर्वचातकाष्टक ४)

भारवीच्या किरातार्जुनीयांतील पुढील श्लोकांत दिसून येणारें यमक कदाचित यद्दच्छया साधलें गेलें असेल.

"नासुरोऽयं न वा नागो
धरसंस्थो न राक्षस:
ना सुखोऽयं नवाभोगो
धरणिस्थो हि राजस:" ( किरात १५।१२)

पहिल्या आणि तिसऱ्या चरणांच्या अन्ती 'गो' या एका अक्षराचीच आवृत्ति आहे; पण दुसऱ्या आणि चौथ्या चरणांच्या अन्तीं आवृत्ति 'अस:'ची असल्यामुळे हे शुद्ध यमक आहे. अश्वघोषाच्याहि रचनेंत मध्येच यमक स्वाभाविकपणें पण अहेतुकपणें आलेले आढळतें:-

"हृदि या मम तुष्टिरद्य जाता
व्यवसायश्च यथा मतौ निविष्ट:
विजनेऽपि च नाथवानिवास्मि
ध्रुवमर्थोऽभिमुख: समेत इष्ट:" ( अबुच ५।६९)

यमक हे अपभ्रंशवाङ्मयांत सर्वत्र प्रचलित दिसते; आणि त्या अपभ्रंशवाङ्मयाच्या द्वारा यमक मराठींत आलें असावें. जोइन्दुकृत परमात्मप्रकाश हा अपभ्रंवाङ्मयांतील ग्रन्थ ख्रिस्तशकाच्या सहाव्या शतकापूर्वी रचलेला आहे. हा सयमक दोहा जातींत आहे. यांतून यमकाचें एक उदाहरण घेऊं.

"अप्पा गुरु णवि सिस्सु णवि
णवि सामिउ णवि भिच्चु
सूरउ कायरू होई णवि
णवि उत्तम णवि निच्चु" (पप्र ९०)

यमकाचें याहूनहि प्राचीन उदाहरण आढळते. कुन्दकुन्दाचार्याच्या नावावर चालत आलेली प्राकृत गुरुभक्तीचीं पद्यें परमात्मप्रकाशाहून नि:संशय प्राचीन आहेत. ही पद्यें सयमक आहेत. पहिली चतुष्पदी पहा:-

"मणुयणाइन्दसुर छत्तत्तया
पञ्चकल्लासोक्खावली पत्तया
दंसणं जाणज्झाणं अणन्तं बलं
ते जिणा दिन्तु अम्हं वरं मङ्गलं" (प्रागुभ १)

## यमकाविषयी तीव्र मतभेद कां?

यमकाचा काही उपयोग आहे का? कवि रेन्दाळकर यांनी जेव्हा यमकाविरुद्ध बण्ड पुकारिलें तेव्हा निकराचीं वाग्युद्धें झालीं.

"टला ट ग पला प
काव्य बने आपोआप"

असें प्रतिपादन करणारे यमकाभिनिवेशी वीर प्रतिपक्षावर कर्तृत्वशून्यतेचा आरोप करीत आणि म्हणत की 'छन्दयति आह्लादयति इति छन्द:' हें जर खरें असेल तर रसिकाच्या कानाला नि मनाला आल्हाद देणारें आणि कवीच्या कल्पनेला चालना देणारें यमक हे काढून टाकणें म्हणजे काव्याला शुष्क गद्याच्या पायरीला उतरवून बसविण्यासारखें होय. उलटपक्षीं यमकत्यागी लोक संस्कृत काव्यपरम्परेचें उदाहरण पुढे करून प्रतिक्षावर सनातन स्वधर्म सोडल्याचा आणि तोतयालाच राज्यासनावर बसविल्याचा आरोप करीत. त्यांचें म्हणणें असें की भावनेचें सङ्क्रामण हा काव्याचा आद्य हेतु होय. यमक हा निवळ एक दागिना आहे. सालङ्कृत कलेवर नको; अनलङ्कृत परन्तु सुन्दर जिवन्त कलाकृति पाहिजे. दागिन्यासाठी जातीचें सौन्दर्य विकृत करणें गर्ह्य आहे. यमकाच्या सोङ्गामुळे कित्येकदा नीरस पद्यच काव्याच्या नावावर खपतें. तेव्हा सयमक काव्य रचण्याचें सामर्थ्य अङ्गीं नाही म्हणून नव्हे तर खऱ्या काव्याची पारख व्हावी म्हणून निर्यमकच रचना करावी.

"अनलसमीहित साधी राया वारा महीवरा कामा
अनलस मीहि तसा धीरा यावा रामही वराका मा" (मोरोपन्त)

यासारखी हठाकृष्ट क्लिष्टरचना पाहिली की केवळ विस्मय वाटतो. अशा दुर्बोधरचनेंत रमणीयार्थ अत्यल्प येऊं शकतो; आणि वर, कविता अर्थाकडे लक्ष देऊन म्हणतांना चरणाचे जे विलक्षण तुकडे पडतात त्यांनी तर विरसच होतो. मणामणाच्या बेड्या पायांत घालून एखादा बजरङ्ग विस्मयकारक उड्या मारून दाखवील; परन्तु मेनकेचें पदलालित्य पहायचें असेल तर नूपुर चालतील; पण सुवर्णाचे असले तरी लङ्गर काय कामाचे? यमकाचे बन्धन हे तालाच्या बन्धनाप्रमाणे कृत्रिमता उत्पन्न करिते; परन्तु ज्या मानाने चमत्काराचे स्तोम उणावेल त्या

मानाने बन्धनाची काचणी उणावून कलाविलासास अधिक मोकळीक मिळेल.

## यमक अपरिहार्य नाही पण स्वाभाविक, आल्हाददायक आणि अपयुक्त आहे

यमक हें सामान्यपणें आल्हाददायक आहे; आणि सयमकरचनेकडे मनुष्यप्राण्याची थोडीफार स्वाभाविक प्रवृत्तीच आहे. 'आपडी थापडी-गुळाची पापडी' यासारखे प्राचीन परम्परेने आलेले बाळबोल, आणि काखेंत कळसा गावाला वळसा' यासारख्या म्हणी पाहिल्या की यमक जुळविण्याची प्रवृत्ति किती स्वाभाविक आहे हे दिसून येतें. पद्याप्रमाणेच यमक हें स्मरणशक्तीस साह्य करितें आणि पद्याइतकेंच ते मनवळणीहि पडून जातें. काव्याची भाषा ही वास्तववादी, प्रत्यक्ष प्रखर सृष्टीची आठवण करून देईल अशी नसावी, ती गद्याच्या भाषेहून भिन्न, अद्भुतरम्यसूचक असावी असा जेव्हा आपला हेतु असतो तेव्हा यमक हें पद्याप्रमाणेच आपल्याला व्यवहाराच्या सहाऱ्यापासून दूर काव्याच्या काश्मीरांत नेऊन सोडण्यास उपयोगी पडतें. पद्याप्रमाणेच यमक हें कित्येकदा नवनवे वाक्प्रयोग आणि कल्पना सुचायला कारणीभूत होतें. पुन्हा काव्याची रचना जर पद्यांत करावयाची आहे तर कडव्याची विशिष्ट बान्धणी प्रतीत करून द्यायला यमक, चरणान्त्य यमक हे फार उपयोगी पडतें. सुनीत म्हणजे केवळ साडेतीन श्लोक नव्हेत तर ते अष्टपदी नि षट्पदी, अथवा तीन चतुष्पद्या आणि त्यांची एकत्र बान्धणी करणारी अन्त्य द्विपदी मिळून होतें याची जाणीव करून द्यायला यमकाच्या बान्धणीचा चाङ्गला उपयोग होतो.

तथापि सयमक पद्य म्हणजे काव्य हें समीकरण कोणत्याहि रसिकास मान्य होणार नाही. "औडक चौडक दामाडू, दामाडूचे पञ्चाडू' अशा सयमक आणि पद्यरूप तथापि निरर्थक बाळबोलांनी बाळांनाच आनन्द व्हायचा. समञ्जस मनुष्याला यांत काहीच हृद्गम्य वाटणार नाही. तरी यमकाच्या चमत्कृतीने दिपून नीरस पद्यालाच काव्य म्हणून कवळणारे आणि सरस काव्याला निर्यमक म्हणून झिडकारणारे काही विद्वान आढळतात. त्यांच्या डोळ्यांना आणि कानांना यमकाची इतकी सवय झालेली असते की मराठी निर्यमक काव्य पहातांक्षणी ते बुजतात. यमक हें आज मराठीं कवितेचें सौभाग्यचिन्ह होऊन बसलें असलें तरी ते साक्षात सौभाग्य नव्हे हें विसरता कामा नये. ते अपरिहार्य नाही आणि त्याची शोभाहि सापेक्ष आहे.

सयमक रचना करावी की नाही हा प्रश्न जसा वैयक्तिक प्रकृतीचा तसाच सामाजिक रूढीचा आणि अभिरुचीचा आहे. संस्कृतांत बाणाच्या गद्यरूप कादम्बरीसहि काव्य मानतात, आणि पद्य हें प्राय: निर्यमक असते; फार्सीभाषेंत गद्यसुद्धा सयमक रचण्याकडे शेकडो वर्षे प्रवृत्ति होती. रेन्दाळकरांनी निर्यमक पद्य रचण्यांत संस्कृत वाङ्मयांतील रूढीकडे परावर्तन केले; राम गणेश

गडकरी यांनी राजसंन्यासांतील सयमक गद्य लिहिण्यांत उर्दू नाटकांतील पद्धतीचें अनुकरण केलें. यमकचतुर मोरोपन्ताने भगवद्गीतेचे भाषान्तर जसें पूर्वीच निर्यमक केले होतें, तसा चूर्णिका नामक गद्यप्रकारांत यमकाचा प्रवेश गडकऱ्यांच्या पूर्वीच झाला होता. विनायक कोण्डदेव ओक यांनी हिन्दुस्थानकथारसाच्या शेवटीं आपल्या एका मित्राच्या गद्यग्रन्थांतून जो उतारा दिला आहे तो केवळ यमकचमत्कार करून दाखविण्यासाठीच रचलेला दिसतो. वानगीसाठी पुढील एक वाक्य पुरें होईल:-

"पहा पहा! गङ्गानदीपलीकडे त्या लुङ्गाहीन कङ्गालांनी सङ्गात्यांसह दङ्गा शिङ्गावर घेण्यांत अङ्गाकडे न पाहतां पिङ्गा घालून, ढङ्गाच्या रङ्गाने हङ्गाम समजून, झिङ्गा बरळतो त्यापरी इङ्गा फिरला नव्हता तोपर्यंत चङ्गळ माण्डिली होती."

यमकस्थान

पद्यांत यमक हें साधारणत: चरणान्ती आणि लागोपाठ दोन वा अधिक चरणांच्या अन्ती साधण्यांत येते; कारण, चरणान्ती विराम असतो आणि यमकाने चरण जणू काय एकत्र बान्धले जातात. यमकाने प्राय: विषम सम चरण बान्धले जातात; परन्तु केव्हा केव्हा यमक हे पहिल्या नि तिसऱ्या चरणांच्या अन्तीं आणि दुसऱ्या नि चौथ्या चरणांच्या अन्तीं साधण्यांत येतें.

(१) "अन्तर्बहि:स्थित रघूत्तमसूनुधाकें
प्राणासि धैर्य तिळमात्र न होय जाया;
मोहान्धकारापतिता विधिच्या विपाकें
नेत्रें हळूच उघडी रघुवीरजाया" (मोकुल ४।३६)

(२) "घनरवान्तकरा, खणतो पहा
वनबिडाल महीस कसे वनी,
बहु भयङ्कर कर्कश हे महा,
परम सस्पृह मूषकसेवनीं." (मोकुल ४।२१

जेथे रचना अर्धसम असते तेथे यमकें याप्रमाणे जुळविणें बरें असतें. कित्येकदा यमक हें पहिल्या आणि तिसऱ्या चरणांच्या अन्तीं चरणांच्या अन्तीं जुळवीत नाहीत, दुसऱ्या आणि चौथ्या चरणांच्या अन्तीं जुळवितात; जसे

"तव पादसरोरुहीं स्वचित्त-
भ्रमरातें रस चाखवूनि गोवूं,

तुज भक्त तुझे सदैव गाती,

मृग आम्ही गुणगीतसक्त होऊं" (मोस्फुका ४।१८३)

गीतींत बहुश: यमक असेंच दुसऱ्या आणि चौथ्या पादांच्या अन्तीं साधलेलें असतें; परन्तु दोनदोन चरण सलग एका ओळींत देण्याच्या पद्धतीमुळे ही गोष्ट ध्यानांत येत नाही. गीतींत लागोपाठ चरणांच्या अन्तीं यमक जुळविल्याची उदाहरणें दुर्मिळ आहेत.

"सोडुनि माझा घोडा
दोघेहि हस्त या क्षणीं जोडा.
'शरणागत', म्हणवा रे,
याचि उपायें समर्थभय वारे". (मोकुल १३।१६)

वीरेश्वराने आपल्या गजमुखचरित्रांत यमकें अशींच जुळविलीं आहेत:-

"देऊनि निरोप अमरां
उठला तो इश जावया समरा;
त्या जगदवलम्बातें
दे नन्दी निजकरावलम्बातें" (वीगच ८)

आर्यागीतींत यमकें अशी म्हणजे पहिल्या आणि दुसऱ्या, तिसऱ्या आणि चौथ्या चरणांच्या अन्तीं साधिलेलीं रविकीर्तीच्या काळापासून आढळतात.

दोन वा क्वचित तीन चरणांहून अधिक चरण सोडून यमक साधूं नये. यमक केवळ डोळ्याला दिसून त्याचा तितका उपयोग नाही. ते कानाला कळलें पाहिजे. 'पूर्वानुभवसंस्कारबोधिनी यद्यदूरता,' हा दण्डीने अनुप्रासाच्या बाबतींत घातलेला दण्डक यमकाच्या बाबतींत अवश्य पाळायला हवा. दुसऱ्या जोडीदाराची गाठ पडेपर्यन्त पहिल्याचे स्मरण रहायला पाहिजे. चरण आखूड असल्यास पहिल्या आणि चौथ्या वा पाचव्या चरणांच्या अन्तीं यमक चालेल; परन्तु चरण दीर्घ असल्यास यमकांचाहि दूरान्वय होण्याची भीति असते. यशोधनांत (पृ. ७६) शार्दूलविक्रीडितरचनेंत पहिल्या चरणाचें यमक आठव्या चरणाशी जुळविलें आहे!

यमक हे जसे विरामापूर्वी म्हणजे चरणान्ती साधण्यांत येतें तसेच ते चरणातभ्भीहि साधतात.

(१) "पम्पातीरीं मग वसे
शम्पाशतरुचिचाप
सम्पाया धृति विरह दे

कम्पा उठवुनि ताप." (मोदोरा ३७)

(२) "शङ्का हरुनी बिभीषणा
रङ्का सङ्गरधीर
पङ्कापहगुणसिन्धु दे
लङ्का श्रीरघुवीर." (मोदोरा ६५)

(३) "वन्देऽहं विठ्ठलं दातुं
शं देहं धृतवान्प्रभु:
संदेह हन्त मुदितो
मन्देहं योंऽशुमानिव." (मोस्फुका १।१३६)

(४) "पङ्कराशिमपि पावनकीर्ते
रङ्कराजमव मां करुणाब्धे
शङ्करानतमलं तव कर्तु
कं कराब्जमनघं न सदीङ्यम" (मोस्फुका १।१८३)

पुढील दोन उदाहरणांत अनुक्रम आद्यन्तिक आणि अन्तादिक यमक आहे असे म्हणतात; पण वस्तुत: ही अनेकाक्षरावृत्तीचीं उदाहरणें आहेत.

(१) "शोक लास्य करी हृदङ्गणि, कण्ठ केवळ शोकला,
कोमलाननपूर्णचन्द्र तिचा तदा बहु कोमला;
कां पती रुसला? म्हणे, सकलेन्द्रियें बहु कांपती
भार तीस निजाङ्ग होय, वदे अशी मग भारती." (मोकुल ४।७१)

(२) "तेची चिरञ्जीव जगीं जहाले
हाले जयांचे स्मरणें धरा ही,
राही जयांचे यश शुभ्र येथे,
येते जयांचे स्मरणें दृगम्बू." (तासक ४४)

यमकान्ती खटका असतो.

चरणान्तर्गत विरामामुळे जेथे चरणाचे दोन विभाग पडतात तेथे त्यांच्या अन्तीं (आणि क्वचित केव्हा आरम्भीं) यमक साधण्यांत येतें. याचीं उदाहरणें मागे (पृ ४9-५० पहा) दिलींच

आहेत. आणखीहि एकदोन उदाहरणें घेऊं.

(१) "असेल सामर्थ्य तरीच चापीं
मौर्वीसि जोडा, विशिखासि सोडा;
नसेल सामर्थ्य तथापि सारे
हस्तासि जोडा, मम बन्धु सोडा." (मोकुल ८।२७)

(२) "हे वो कोडे कोन निवाडें
ऐस्या लक्षा काय विवक्षा
घेतो चापा स्पर्शुनि कोपा
चन्दी दक्षा हेचि परीक्षा." (लस्व ५।३२)

येथे चरणान्तीं यमक न साधितां चरणविभागान्ती साधिलें आहे. परन्तु एवढ्यावरून चरणविभागाला चरण मानून चतुष्पदीची अष्टपदी करण्याचें प्रयोजन नाही. जेथे चरणाचे अशा रीतीने पडणारे दोन विभाग लगक्रमदृष्ट्याहि अभिन्न असतात तेथे मात्र चरणाची अदपट करून चतुष्पदीची अष्टपदी करण्याकडे प्रवृत्ति होते; उदाहरणार्थ,

"त्या पुरींत सर्व लोक जाहले उदण्डशोक
किन्तु तो न रामवीर जाउं दे स्वकीय धीर
सर्व पौर कान्तिहीन जाहले अतीव दीन
तो महान्त अन्तराय बोलवी जनांस 'हाय'!" (राप ५।८४)

हा श्लोक निर्यमक चच्ञला [। - ˜ - ˜ । - ˜ - ˜ । - ˜ - ˜ । - ˜ - ˜]
वृत्ताचा आहे. परन्तु मध्यान्तिक यमक साधल्यामुळे प्रत्येक चरणाचे दोन अगदी एकसारखे तुकडे पडतात; आणि एका श्लोकाचे पुढील प्रमाणे समानिकावृत्तांतील दोन सयमक श्लोक होतात.

"त्या पुरींत सर्व लोक
जाहले उदण्डशोक
किन्तु तो न रामवीर
जाउ दे स्वकीय धीर.
सर्व पौर कान्तिहीन
जाहले अतीव दीन
तो महान्त अन्तराय
बोलवी जनांस 'हाय'."

वृत्तांत अथवा जातींत सारख्या लगक्रमाचे शब्द जर सारख्या अन्तरांनी येऊं शकत असतील तर तेथे चरणामध्येच यमकें साधून कवीस पदलालित्य दाखवावेसें वाटतें. आणि ही यमकें तरङ्गावलीप्रमाणे आल्हाददायक होतात; जसें,

"तो शर गरधरवरसा, पविसा रविसा स्मरारिसायकसा" (मोरोपन्त)
" न धरी बा दर हा दर सादर दे वाजवूं पुन्हा नीट" (मोरोपन्त)

जातिरचनेंत विशेषत: अष्टमात्रक आवर्तनाच्या जातींत प्रत्येक आवर्तनांत तिसऱ्या मात्रेवर खण्डन करून तेथे यमकें साधतात; जसें,
"सुन्दरा मनामधि। भरलि जरा नहि। ठरलि हवेलिंत। शिरलि मोत्याचा। भाङ्ग"

यमकान्तीं याप्रमाणे खटके हे असतात; तेथे थोडें थाम्बणे अवश्य असतें. तसे न केल्यास यमकांची प्रतीति कानास होत नाही. तेव्हा तसें करितांना शब्द भलत्या ठिकाणीं तुटून रसभङ्ग होऊं नये.

"वाजत गाजत साजत आज तया जतन करुनि आणा हो" (मोविप ४)
ही ओळ अर्थाकडे लक्ष देऊन सरळ म्हटली असतां वाजत, गाजत, साजत या तीनच शब्दांतील यमक प्रतीत होते; आजत याजत या दोन अक्षरावलींतील यमक प्रतीत होत नाही; कारण, म्हणताना आजत-याजत असे तुकडे न पडतां ते 'आज तया' आणि 'जतन' असे पडतात.

"रामा, मनोज्ञगुणधामा, पलाशजनतामारणैकनिरता,
कामारिचित्तसदना, मारुतिप्रियसुनामा, नशत्रुविजिता,
धामाधिपान्वयवरा, मानशौर्यसुभगा, मानिषेव्यचरणा,
वामाकृति, इतरवामापराङ्मुखमना, मानवैकशरणा." (मोकुल १3।३०)

या श्लोकांत 'आमा'ची आवृत्ति साधिली परन्तु ती स्पष्टपणें प्रतीत होत नाही. यासाठी यमकान्ती पदसमाप्ति होणें अवश्य आहे.

चरणान्तर्गत यमकावलीमुळे कित्येकदा वृत्ताची वा जातीची मोडणी कळायला साह्य होतें. उदाहरणार्थ, सोळा गुरु अक्षरांच्या ब्रह्मरूपक नावाच्या वृत्ताचें वाणीभूषणांतील

"राजद्भाल: स्फूर्जन्नेत्रप्रोद्यद्वह्निज्वालाजालै:
स्व... त्यम्भोवीचीनीरासारस्विद्यच्चुडाचन्द्र:।

माद्यद्गौरीवक्त्राम्भोजस्वैरस्मैरक्रीडाशीत:
श्रेयो देयान्नागश्रेणीभूषामीषश्चन्द्रापीड:" (वाभू २।१८२)

हे उदाहरण पाहतां वृत्ताची मोडणी [। - - - - । - - - - । - - - -। - - - -] अशी वाटते; परन्तु ज्या प्राकृतपैङ्गलावर वाणीभूषण आधारलेलें आहे त्यांतील,

"अम्मुत्ता जोहा उद्दे कोहा ओत्थाओत्थी जुज्झन्ता
मेणक्का रम्भा णाहं दम्भा अप्पाअप्पी बुज्झन्ता
धावन्ता सण्ठा छिण्णो कण्ठा मत्था पिट्ठि पेरन्ता
णं सग्गा मग्गा जाए लग्गा लुद्धा उद्धा हेरन्ता" (प्रापै २।१७५)

हे उदाहरण पहातां वृत्ताची मोडणी [- । - - - - । - - - - । - - - - । - - -] अशी पाहिजे हे निश्चित होतें.

चरणान्ती यमक साधितात म्हणून तेवढ्याने यमक हें चरणसमाप्तीचे गमक होत नाही कित्येकदा लागोपाठ दोन आवर्तनान्तीं यमक साधतात; कित्येकदा ते एका चरणांत साधतात आणि दुसऱ्या चरणांत साधीत नाहीत. तेथे यमक हे केवळ पदलालित्याचें एक अङ्ग असते.

"मुखरमधीरं त्यज मज्जीरं रिपुमिव केलिसुलोलम
चल सखि कुञ्ज सतिमिरपुञ्ज शीलय नीलनिचोलम" (गीगो ११।४)

हे साकीचे दोन चरण आहेत. या द्विपदीची यमकानुरोधाने,

"मुखरमधीरम
त्यज मज्जीरम,
रिपुमिव केलि सुलोलम
चल सखि कुञ्जम
सतिमिरपुञ्जम
शीलम नीलनिचोलम"

अशी षटपदी करणें युक्त होणार नाही. यमकानुरोधाने चरणनिर्णय केल्यास "वाचाळ मी नीट पाचारितो धीट त्याचा न यो वीट साचा हरी" या एक चरणाचे

“वाचा-
ळ मी नीट
पाचा-
रितो धीट
त्याचा
न यो वीट
साचा
हरी”

असे आठ तुकडे पडून हे विलक्षण पद्य होईल!

## यमक कसे असावें?

काव्याच्या सरस स्वाभाविकतेला जपायचें असेल तर यमक हे एकदोनाहून अधिक अक्षरांचे असण्याचें प्रयोजन नाही. यमक प्रत्ययात्मक नसावें. “रामाचे-देवाचे” हे यमक योग्य नाही; “घे वाचे-देवाचे” हे यमक चालेल. यमकाच्या पुनरावृत्त भागांतील व्यज्जनोच्चार अभिन्न नसेल तर ते सवर्गीय, निदान एकमेकाशी जुळते असे असावेत. टाक-लाख-खाशी, पुढे-मुदें, केशवेष, भाल-आळ अशी यमकें शुद्ध आणि उत्तम अर्थातच नाहीत; पण ती धकतील. त्यांच्यावर बहिष्कार घालण्याचे कारण नाही.

## मराठींतील यमकोपयोगाचा इतिहास

मराठींत चरणान्त्य यमक हें अपभ्रंशवाङःमयाच्या द्वारा आलें असलें पाहिजे. तथापि मराठींतील आद्य वृत्तात्मक रचना, भास्करकविकृत “इशस्तुति’ ही निर्यमक आहे. तेराव्या शतकाच्या शेवटी शेवटी सयमक रचनेचा पाठच पडला. परन्तु अनेकदा शुद्ध यमकाचे काम केवळ अक्षरावृत्तीवर भागवून घेण्यांत येई. ओवीरचनेंत असे सदोष यमक आहे. एकनाथाची पदें सयमक आहेत. मुक्तेश्वराच्या रामायणाची वृत्तरचना ही सयमकच आहे. वामनापासून यमकाला विशेष महत्त्व येऊं लागलें; तो निर्वाळा असा देतो की,

श्लोकवृत्त कथिलें यमकांनी
गाति त्यांस न पडे यम कानी” (वाभारा १।३०)

त्याच्या चमत्कृतिजनक थोर कामगिरीमुळेच त्याचे नाव 'यमक्या' पडलें. मोरोपन्ताच्या कृतीत या चमत्कृतीचा कळस झाला. चरणान्ती शक्य तितक्या अक्षरांची यमके तर त्याने साधिलीच, पण साहित्यकारांनी शब्दालङ्कारप्रकरणीं जितक्या प्रकारची यमके साडिगतली आहेत तितक्या प्रकारची जुळवून मोरोपन्ताने वाचकांचे डोळे दिपवून टाकिले, त्यांची मति भ्रान्त करून टाकिली. तथापि त्याचे भगवद्गीतेचें भाषान्तर निर्यमक गीतींत आहे हे विसरता कामा नये. जातिरचनेला यमक हे प्राचीनकाळापासून आवश्यक वाटत आले आहे. आधुनिक मराठी कवींत घण्टय्या नायडू यांनी आपले एक दीर्घ काव्य निर्यमक लिहिले असले तरी निर्यमक कवितेची चळवळ एकनाथ पाण्डुरङ्ग रेन्दाळकर यांनीच केली. रा. एकनाथ यादव निफाडकर यांचे 'सतीचा शाप' हे दीर्घ जातिस्वरूप काव्य निर्यमकच आहे. तरी आधुनिक मराठी कविता ही प्राय: सयमकच आहे. शक्य तितक्या अक्षरांची यमकें हट्टाने जुळवीत बसण्यांत बुद्धीचा व्यय मात्र क्वचितच कोणी कवि करीत असेल. यमक एकाक्षरी असलें तरी धकतें. एकाक्षरी यमक जुळविणें हें पद्यरचनेहून अधिक दुष्कर वा कृत्रिम सुतराम नाही. तथापि रेन्दाळकरांच्या मागून निर्यमक कवितेचा पुरस्कार करण्याची आवश्यकता अलीकडे पूर्व महाराष्ट्रांतील कवीना वाटूं लागली आहे. त्यांच्यापैकी काही जणांना तर लयबद्धताहि जाचक होते. त्यांनी यमकाची प्रतिष्ठा का ठेवावी?

## २ यतिविचार

पद्य सलगपणें आणि लयानुरोधाने वाचीत असताना जो न्यूनाधिक विराम काही ठिकाणीं घ्यावाच लागतो त्याला **यति** म्हणतात. हा यति ज्या ठिकाणी घ्यावयाचा त्या "जिहेष्टविश्रामस्थाना'लाहि **यति** म्हणतात. यतिस्थानी पद्याचा विच्छेद होतो, तुकडा होतो; म्हणून यतिस्थानीं शब्दसमाप्ति, निदान पदसमाप्ति तरी व्हावी. तसें न झाल्यास जो कर्णकटु दोष होतो त्याला यतिभङ्ग म्हणतात.

यति मानावा की नाही याविषयी मतभेद आहे असें दिसते.

"जयदेअपिङ्गला सक्कअम्मि दोच्चिअ जइ समिच्छन्ति ।
मण्डव्व, भरह, कासव, सेवल (? यव) पमुहा ण इच्छन्ति"।।

(स्वछ १।१४४)

पिङ्गल आणि जयदेव हे यति मानतात तर माण्डव्य, भरत, काश्यप, आणि सैतव हे मानीत नाहीत. याचा अर्थ, पद्यरचनेंत यति येऊच शकत नाही असा नव्हे, तर यति हा पद्य म्हणणाऱ्याच्या पद्धतीवर अवलम्बून असल्यामुळे त्याचे स्थान हे निश्चित मानीत नसत एवढाच केला पाहिजे. ही अनिश्चित चरणान्तर्गत यतीविषयी असली पाहिजे; कारण "यति: सर्वत्र पादान्ते

श्लोकार्धेतु विशेषत:” असें परम्पराप्राप्त वचन आहे. चरणान्तीं यति हा निरपवादपणें असलाच पाहिजे; कारण, पद्याचे चरणरूपी विभाग हे या अपरिहार्य यतीच्याच अनुरोधाने पडतात.

“लाविला गुलाबी रङ्ग
किति सुन्दर अमुच्या बङ्ग-          ल्याप्रती!
मोगरी, चमेली कुन्द
लाविलीं चहुकडे सुन्द-          राकृती
गुज्जतात गुङ्गुड भृङ्ग;
तो नाद तयांचा गुङ्ग-          वी मती.” (पोप ५७)

यासारखीं हास्योत्पादक *(* परन्तु “प्रभूतें म्हणे, हें पहा आङ्ग लीला
वती मी, वरावें मला चाङ्गलीला” (मोसीरा ४०)
हे हास्योत्पादक नाही, हास्यास्पद आहे.) पद्ये सोडलीं तर चरणान्ती शब्दसमाप्ति न होण्याचा प्रश्नच सम्भवत नाही. उलटपक्षी चरणान्ती विराम घ्यायला पाहिजे तो न घेतां पुढील चरणांत जेथे यति नाही तेथे तो अर्थाच्या सोयीसाठी घेतल्यास ते कर्णकटु नि वैरस्यकारक होतें. पहा:-

“लीलेने स्वकरांत तो धरितसे काण्डी बरूची जधी
साऱ्या सुन्दर वस्तु त्या झडकरी येती समाधीमधी
त्याच्या; येऊनि त्या तयास म्हणती, ‘आम्हास दे भूषण
दिव्यें, आणि शिकीव लौकर अम्हां ती अप्सरोगायने’” (केक. ८०)

चरणान्तर्गत यति मानावयाचा की नाही, मानावयाचा झाल्यास त्याचे स्थान कोणतें इत्यादि गोष्टीविषयी मतभेद सम्भवतो. अनुष्टुभ, बृहती आणि पङिक्त या वर्गातील वृत्तांत पिङ्गलाने यति साङिगतला नसला तरी हलायुध असा आम्नाय आहे म्हणून यति साङ्गतो. इन्द्रवज्रा, उपेन्द्रवज्रा या अकरा-अक्षरी वृत्तांत पिङ्गल यति साङ्गत नाही, पण शालिनी या अकराच अक्षराच्या वृत्तांत तो यति साङ्गतो. मन्दारमरन्दचम्पूचा कर्ता श्रीकृष्ण कवि हा इन्द्रवज्रा-उपेन्द्रवज्रा वृत्तांत पाचव्या अक्षरानन्तर यति साङ्गतो.

कानडी छन्दोऽम्बुधीचा कर्ता नागवर्मा हा स्वतन्त्रपणे यति साङ्गतो. शालिनीवृत्तांत तो यति [ - - - - - ˜ - ! - ˜ - - ] सातव्या अक्षरानन्तर साङ्गतो; रथोद्धतेंत [- ˜ - ˜ ˜ ˜ ! - ˜ - ˜ -] सहाव्या अक्षरानन्तर, इद्रवज्रावृत्तांत [ - - ˜ - - ˜ ˜ - ! ˜ - - ] आठव्या अक्षरानन्तर यति साङ्गतो. नागवर्म्याने साङिगतलेले काही यति स्वाभाविक वाटतात तर काही कृत्रिम वाटतात. शशिकला, स्त्रक इत्यादि अप्रचलित वृत्तांची मोडणी कळून त्यांना चाल लावायला साङिगतलेल्या यतिस्थानांचे साह्य होतें. परन्तु कोकिलक, नर्कुटक इत्यादि काही वृत्तांना चाल लावतांना यतीची उलट अडचण होते.

शालिनी, पृथ्वी, शार्दूलविक्रीडित इत्यादि वृत्तांच्या चाली परम्परेने चालत आल्या असून जिवन्त राहिल्या आहेत, त्यांच्या यतिस्थानाविषयी बहुश: मतभेद होत नाही.

यतिभेदाने वृत्तभेद होतो. अवितथ, कोकिलक, आणि नर्कुटक वा शशिकला, स्त्रक आणि मणिगुणनिकार हे भेद यतिभेदाने होतात.

यतिस्थानीं विराम घ्यावयाचा तो न्यूनाधिक असू शकतो. त्या ठिकाणी जर नुसता खटकाच असेल तर तो स्वल्पविराम समजावा, रुचिरा आणि प्रहर्षिणी या वृत्तांत अनुक्रमे चार आणि तीन अक्षरांनन्तर म्हणजे सहा मात्रानन्तर द्विमत्त्रक विराम असावा असें मला वाटते.

## पिङ्गलाची धरसोड

आवर्तनी वृत्तांत यतिस्थान कोणत मानावें याविषयी पिङ्गलाचे काही निश्चित धोरण दिसत नाही. कुड्मलदन्ती, जलोद्धतगति, प्रहरणकलिता, मणिगुणनिकर, ललना इत्यादि सोळा मात्रांच्या पद्यावर्तनी वृत्तांत तो प्रथमावर्तनान्ती यति साङ्गतो; परन्तु दोधक आणि मत्ता या सोळाच मात्रांच्या पद्यावर्तनी वृत्तांत तो तसा प्रथम आवर्तनाच्या अन्तीं यति साङ्गत नाही. रुक्मवती वृत्तांत तर चरणमध्यावर चरणाचे लगक्रमदृष्ट्या एकसारखे असे दोन तुकडे पडत असूनहि तो यति साङ्गत नाही; आणि वरतनु (म्हजेच भालती) वृत्तांत तर तो भलत्याच ठिकाणीं यति साङ्गतो. क्रौञ्चपदावृत्तांत तो प्रत्येक आवर्तनान्ती यति साङ्गतो, पण त्या सारख्याच तन्वीवृत्तांत तो पहिल्या आणि दुसऱ्या आवर्तनान्ती यति साङ्गतो, पण तिसऱ्या आवर्तनान्ती साङ्गत नाही.

पिङ्गलाची ही धरसोड दाखवून देण्याचा हेतु इतकाच की त्याचे मत हे अवश्य विचारणीय असले तरी तो अन्तिम निर्णय समजण्यात येऊ नये. अमुक एक ठिकाणीं यति मानावा की नाही याचा निर्णय, प्राचीन विपुल उदाहरण उपलब्ध असती तर तत्काळ देता आला असता. परन्तु हे आता शक्य नाही. पिङ्गलाचे मत प्रमाण मानून ज्या कवीनी त्याप्रमाणे रचना केली त्यांच्या रचनेचा उपयोग पिङ्गलाच्या मताची ग्राह्याग्राह्यता ठरवायला मुळीच होणार नाही. कवींनी यति पाळलेला मताची ग्राह्याग्राह्यता ठरवायला मुळीच होणार नाही. कवीनी यति पाळलेला दिसला नाही तरी मोडणी पहातां जेथे एक वा अनेक मात्रांचा विराम असेल तेथे यति मानल्यावाचून शास्त्राला गत्यन्तर नाही. कित्येक अशी वृत्तें आहेत की त्याच्यात प्रथमावर्तनांत शेवटीं द्विमात्रक विराम पाहिजे असे मला वाटतें.

नवमालिनी, प्रमदा, कुटिल, गजविलसित, प्रभद्रक, कुमारी, मणिकल्पलता, शैलशिखा, अवितथ, वरयुवती, वंशदल, भ्रमदपद, द्युवाणिनी, वाणिनी, वीरललिता, समदविलासिनी, गरुडरुत, नन्दन, नरेन्द्र, कामलता, शशिवदना, भद्रक, अश्वललित, ललितविक्रम आणि सुधाकलश[१] (१ यांच्या व्यतिरिक्त याच प्रकारची आणखी काही वृत्तें आहेत. त्यांची ठाऊकी छन्द:शास्त्रज्ञांस नाही;

पण त्यांची उदाहरणें वाड्मयांत सापडतात. त्यांची उडुपथ, सुरासुरवन्द्य, त्रिदशाड्गना अशी नावे उदाहरणांतील शब्दांवरून मी ठेविलीं आहेत. विस्तारभयास्तव ती येथे दिली नाहीत.) या पञ्चवीस वृत्तांची परस्पराशी तुलना करून पहातां ही अष्टमात्रक आवर्तनाची आहेत, पहिला गण ( - ˜ ˜ - ) वा ( ˜ ˜ ˜ ˜ - ) असा षण्मात्रक आहे, आणि पुढील गणांत ( ˜ - ˜ ˜ ˜ - ) या गणाचें प्राचुर्य आहे हे ध्यानांत यायला वेळ लागत नाही. आता पिड्गलाने साडिगतलेल्या वृत्तांपुरताच विचार केला तर असे दिसून येते की वंशपत्रपतित (वंशदल), शशिवदना, भद्रक आणि अश्वललित या चार वृत्तांत तो द्वितीय आवर्तनाच्या अन्ती यति साड्गतो; पण नवमालिनी, ऋषभगजविलासित, शैलाशिखा, अवितथ आणि वरयुवती या वृत्तांत तो द्वितीय आवर्तनाच्या अन्तीं यति साड्गत नाही. वरयुवती आणि वंशपत्रपतित या दोन वृत्तांत विलक्षण साम्य आहे; पण एका वृत्तांत तो यति योग्य ठिकाणीं साड्गतो तर दुसऱ्या वृत्तांत तो यतिच साड्गत नाही! एकन्दरीने विचार करितां नवमालिनी, ऋषभगजविलसित, शैलशिखा, कोकिलक या वृत्तांत पिड्गलाने साडिगतलेलीं यतिस्थानें चुकीची वाटतात. अष्टमात्रक आवर्तनाच्या वृत्तांत जेथे चरणांत चार आवर्तनें असतात तेथे दुसऱ्या आवर्तनाच्या अन्तीं खटका अगदी स्वाभाविकपणें येतो. तेथे एका मात्रेचाहि विराम नसतो, तथापि ते यतिस्थान होतें; आणि तेथे पदसमाप्ति अवश्य वाटते. जेथे केवळ खटका आहे ते जर यतिस्थान मानावें लागतें तर जेथे दोन मात्रांचा विराम आहे ते यतिस्थान मानलेंच पाहिजे हे उघड आहे. पहिल्या आवर्तनांत सशब्द सहा मात्रा झाल्यावर दोन नि:शब्द मात्रांचा विराम घेतल्याविना नवीन आवर्तनाला आरम्भ होऊं शकत नाही. म्हणून या सर्व वृत्तांत ( ˜ ˜ - - ) वा ( - ˜ ˜ - ) वा ( ˜ ˜ ˜ ˜ - ) या पहिल्या गणाच्या अन्तीं द्विमात्रक विराम असल्याने तेथे यति मानणें अपरिहार्य आहे.

अगदी सूक्ष्मपणाने विचार केला तर असें वाटतें की रुचिरा आणि प्रहर्षिणी या वृत्तांत, पहिल्या आवर्तनांत ज्याप्रमाणे द्विमात्रक विराम असल्याने अनुक्रमें चौथ्या आणि तिसऱ्या अक्षरानन्तर यति साड्गण्यांत आला आहे त्याप्रमाणे दुसऱ्या आवर्तनांतहि पाचव्या अक्षरानन्तर यति साड्गायला हवा. म्हणजे रुचिरा आणि प्रहर्षिणी यांची अक्षरमाण्डणी आवर्तनानुसार अनुक्रमें [ । ˜ - ऽऽ ! ˜ ˜ ˜ ˜ - ऽऽ ! ˜ - ˜ - ] आणि [ - - - ऽऽ ! ˜ ˜ ˜ ˜ ऽऽ ! ˜ - ˜ - - ] अशी होईल. यतिस्थान (!) या चिन्हाने दाखविलें आहे.

## ३ अक्षरविचार

अक्षर म्हणजे वर्ण नव्हे, आणि अक्षरविचार म्हणजे शुभ वर्ण कोणते आणि अशुभ वर्ण कोणते याचाहि विचार नव्हे. वर्णाचे शुभ आणि अशुभ वा दग्ध असे वर्गीकरण केलेलें आढळतें ते कोणत्या तत्त्वास अनुसरून आहे आणि त्या वर्गीकरणाचा छन्द:शास्त्राशी काय सम्बन्ध आहे हे काही समजत नाही. काव्यारम्भीं अशुभ अक्षर नसाव; पण देवाच्या नावासारख्या मड्गल

शब्दारम्भीं ते असले अथवा ते गुरु असलें तर म्हणे दोषाचा परिहार होतो!

**अक्षर** म्हणजे एकावेळीं तोण्डांतून बाहेर पडणारा ध्वनि होय, मग तो ध्वनि लिहून दाखवायला लिपींतील चिन्ह एक लागो वा अनेक लागोत. अक्षराचे अधिष्ठान स्वरावर असतें,[१]

(१ "एक मात्रं भवेद ऱ्हस्वं द्विमात्रं दीर्घमिष्यते
प्लुतं चैव त्रिमात्रं स्याद अक्षरं स्वरयोजनात" (भ १७।११६)

मग त्यांत आरम्भीं वा अन्तीं व्यज्जनोच्चर मिळो वा न मिळो. राजन या शब्दाच्या लेखाकडे पाहून आपण यात रा-ज-न अशी तीन अक्षरें आहेत म्हणून म्हणतो; पण हे चूक आहे. वस्तुत: रा-जन अशीं दोनच अक्षरे आहेत. शब्दांत जितके स्वर तितकीच अक्षरें होणार. रा हें अक्षर आकारान्त म्हणजे स्वरान्त आहे; तर जन हे अक्षर व्यजनान्त आहे. स्वरान्त अक्षराला विवृत म्हणतात आणि व्यज्जनान्त अक्षराला संवृत म्हणतात.

स्वराच्या ऱ्हस्वदीर्घप्रमाणे स्वाभाविकपणेंच विवृत्त अक्षर उच्चारायला न्यूनाधिक काळ लागतो. दीर्घ स्वर उच्चारायला लागणारा काळ ऱ्हस्व स्वर उच्चारायला लागणाऱ्या काळाच्या दुप्पट गणावा असा स्थूल सङ्केत आहे. ऱ्हस्व स्वर उच्चारायला एक मात्रेचा काळ लागतो असे म्हटले तर दीर्घ स्वराच्या दोन मात्रा होतात. ऱ्हस्वस्वरान्त अक्षराला लघु आणि दीर्घ स्वरान्त अक्षराला गुरु म्हणतात. आधुनिक मराठींत अ, इ, उ हे तीन स्वर ऱ्हस्व, आणि आ, ई, ऊ, ए, ऐ, ओ, औ हे सात स्वर दीर्घ मानावेत ही मर्यादा पाळली जात आहे.

व्यज्जनान्त म्हणजे संवृत अक्षर उच्चारायला लागणाऱ्या काळांतहि स्वराच्या ऱ्हस्वदीर्घतेप्रमाणे काही सूक्ष्म अन्तर पडतेंच पण तिकडे दुर्लक्ष करून, स्वर ऱ्हस्व असो वा दीर्घ असो, संवृत अक्षर हे सदैव गुरुच, द्विमात्रक मानावें असा नियम चालत आलेला आहे.

लघु-गुरुसाठी अनुक्रमें (।) नि (ऽ) ही प्राचीन, आणि (˘) मो (-) ही अर्वाचीन चिन्हे आहेत. परशुराम तात्या गोडबोले यांनी इंग्रजीतून लघुगुरूसाठी अनुक्रम (˘) आणि (-) ही चिन्हे घेतली. इंग्रजी छन्दोरचनेंत लघुगुरू हा भेद नसून साघात आणि निराघात असा भेद असल्याने इंग्रजींत या दोन चिन्हांचा लोप झाला. हिन्दुस्थानांत मात्र ही आता सर्वत्र रूढ झाली आहेत. हीच चिन्हें उलट क्रमाने म्हणजे लघुसाठी (-) आणि गुरूसाठी (˘) अशी घेतली तर आपली परम्परा पाळल्यासारखें होईल. ही चिन्हें उलटून (-) आणि (˘) अशीं अनुक्रमें लघुगुरूसाठी निर्णयसागरी वृत्तरत्नाकरपञ्चिकेमध्ये वापरिलीं आहेत. पण एकट्यानेच ती प्रथा पाडण्याचा प्रयत्न केला तर तो फोल होतो. या ग्रन्थांत (।) या चिन्हाचा उपयोग चरणविभाग दाखवायला केला असून नि:शब्द मात्रा व्यक्त करण्यासाठी (ऽ) या चिन्हाचा उपयोग केला आहे.

१. "गुरुस्तु द्विकलो ज्ञेयो गजद न्तसमाऽकृति:
लघुस्तदन्य: शुद्धोऽसावेकमात्र: प्रकीर्तन:" (के ९ टीप)

"गुरु संज्ञा वक्र रेखा, ऋजु रेखा लघुस्थळी
प्रस्तारलेखनी आहे रीति हे ऋषिनिर्मित" (निस ९)

आ, ए, ओ हे तीन स्वर ऱ्हस्व उच्चारिता येतच नाहीत असे नाही. प्राकृतांत आणि प्राचीन मराठीं कवितेंत त्यांचा ऱ्हस्व म्हणून उपयोग केलेला आढळतो.

"समाए पेहाए परिव्वयन्तो
सिया मणो निस्सरई बहिद्धा" (दवैसू २।४)
"देह त्यागितां कीर्ति मागे उरावी" (रामदास)

परन्तु आधुनिक मराठी पद्यांत त्यांचा ऱ्हस्व म्हणून उपयोग होत नाही.

## प्लुत

पद्यरचनेंत काही ठिकाणीं **प्लुत'** (१ 'घागरि घेऊनि' याच्या जशा आठ मात्रा होतात तशा 'गौळणी हो-' याच्या आठ मात्रा व्हायला पाहिजेत. 'णी हो-'च्या चार मात्रा होतात, तेव्हा 'गौळ' च्या चार मात्रा व्हायला 'ळ' दीर्घ उच्चारून 'गौळऽणी हो' असें तरी म्हटलें पाहिजे अथवा 'गऊळणी हो' असा काहीतरी उच्चार करून 'गौ'वर तीन मात्रांचा काळ घेतला पाहिजे. अशा ठिकाणी 'गौ' प्लुत आहे असें म्हणतात.) म्हणजे दोहोहून अधिक, विशेषत: तीन मात्रांचे अक्षर येतें. दिसायला प्लुत अक्षर काही गुरू अक्षराहून वेगळें नसतें. एरव्ही गुरू अक्षर उच्चारतांना दोन मात्रांचा काळ व्ययित करायचा असतो. अष्टमात्रक आवर्तनारम्भीं प्लुत अक्षर येते आणि तेव्हा त्याच्यापुढे बहुश: लघु अक्षर असतें. प्लुत आणि त्यापुढील लघु मिळून चार मात्रांचा काळ पुरा करायचा असतो. उदाहरणार्थ

"गौऽळणी होऊंऽसयांनो, गौऽळणी होऊं !
घागरि घेऊनि पाण्यालागी यमुनेला जाऊ!" (माशि २१)

अष्टमात्रक आवर्तनाच्या ज्या वृत्तांत वा जातींत अन्त्य गण ( ˜ - ˜ - ) असा यावा तेथे कित्येकदा अन्त्य गण ( - ˜ - ) असा असतो, अशा ठिकाणीं प्रथमाक्षर प्लुत उच्चारिल्याविना लयबद्धता रहात नाही.

"। णच्चइ चंचल । बिज्जुलिआ साह । जाऽणए
। मम्मह खग्ग कि- । णीसइ जलहर । साऽणए

। फुल्ल कअंबअ । अंबर डंबर । दीऽसए
। पाऊस पाऊ घ- । णाघण सुमुहि व- । रीऽसए" (प्रापै १।१८८)

शंकर आणि इत:पर यांचे उच्चार शङ-क-र आणि इ-तह-प-र असे होत असल्याने अनुस्वार आणि विसर्ग यांच्यमुळे अक्षर व्यज्जनान्त म्हणजे संवृत म्हणजे गुरू होते हे उघड आहे. 'संवय' सारख्या शब्दांत शीर्षबिन्दु हा अनुस्वार व्यक्त करीत नाही, केवळ नाकांतून उच्चार करायचा हे व्यक्त करितो. तेथे शीर्षबिन्दूने गुरूत्व येत नाही. महत्त्व उच्चाराला आहे, लेखाला नाही हे ध्यानांत वागविलें पाहिजे.

ऋलृ यांचा विचार संयुक्त अक्षरांचा विचार केल्यानन्तर करू.

## संयुक्तवर्णपूर्व अक्षर

'संयोग ऱ्हस्वास गुरुत्व देतो' हा नियम केवळ लेखाकडे लक्ष्य देऊन केलेला आहे. काही जोडाक्षरापूर्वील लघूस गुरुत्व येत नाही हे जेव्हा आढळून आले तेव्हा आघात असल्यासच गुरुत्व येतें अशी या नियमाला पुस्ती जोडण्यांत आली. उच्चारदृष्ट्या अक्षरघटना कशी होते हे पाहिले असते तर साराच घोटाळा दूर झाला असता.

शब्दाची सारी अक्षरें आपण सलग आणि लागोपाठ उच्चारितों त्यामुळे शब्दांत कोठे दोन वा अधिक व्यज्जनें संयुक्त असली तर त्यांतील पहिले व्यज्जन तत्पूर्वील अक्षरांत समाविष्ट होतें. विप्र या शब्दाची लेखन-दृष्ट्या वि आणि प्र अशी दोन अक्षरें दिसतात; परन्तु उच्चारदृष्ट्या विप-र अशी दोन अक्षरें पडतात. सूक्ष्मपणाने पाहिलें तर असे दिसते की पचा उच्चार प्रथमाक्षरान्तीं सम्पून मग तो द्वितीय अक्षराच्या आरम्भीं येतच नाही असे नाही. उच्चार काटेकोरपणाने लिहून दाखवायचा तर तो विप-प्र असाच लिहिला पाहिजे. पण ते असो. मुख्य गोष्ट ही की महत्त्व लेखापेक्षा उच्चाराला आहे. 'छन्दसा लक्षण येन श्रुतमात्रेण बुध्यते' असे श्रुतबोधाच्या आरम्भींच साडिगतलें आहे. शब्दांत कोठे संयुक्त व्यज्जनोच्चार असला तर त्यांतील पहिला व्यजनोच्चार तत्पूर्वील अक्षरांत मिळून जातो आणि ते अक्षर लघु असल्यास त्यास व्यज्जनान्त म्हणजे गुरु करितो.

## संयुक्तवर्ण दृश्य नको श्राव्य हवा.

मराठींत हकार जेव्हा काही व्यज्जनांत मिळून जातो तेव्हा दिसायला संयुक्त अशी सहा अक्षरें ण्ह, न्ह, म्ह, ऱ्ह, ल्ह, आणि व्ह हीं होतात. उच्चारदृष्ट्या ही इतर संयुक्त व्यज्जनांसारखी नाहीत. कोणताहि स्वर नाकांत उच्चारितां येतो. हा अनुनासिक उच्चार केल्याने लघूस गुरुत्व येतें

असें मुळीच नाही. हें हें अक्षर लघु आहे पण 'हम' हे अक्षर व्यज्जनान्त अतएव गुरु आहे. हा अनुनासिक उच्चार जसा स्वराशी अगदी एकजीव होऊन जातो तसाच हा हकार म्हणजे महाप्राण हा एकजीव होऊन जाऊं शकतो. हा महाप्राण अक्षरांत एकजीव होऊन जातो म्हणूनच प्राचीन लिपींत या महाप्राणयुक्त अक्षरांसाठी पृथक चिन्हें निर्माण केली गेली. महाप्राणयुक्त क म्हणजेच ख होय. पुढे मराठींत जेव्हा महाप्राणयुक्त ण, न, म, र, ल आणि व हे उच्चार नवीन आले तेव्हा शास्त्रशुद्ध रीत्या या उच्चारांसाठी पृथक चिन्हें निर्माण व्हायला हवी होतीं. तशीं स्वतन्त्र चिन्हें असती तर ख हा वर्ण ज्याप्रमाणे संयुक्त वाटत नाही, त्याप्रमाणे हे नवे वर्ण संयुक्त वाटले नसते. परन्तु लिपींत हे नवे महाप्राणयुक्त उच्चार ण्ह, न्ह, म्ह, ऱ्ह, ल्ह, व्ह असे दिसू लागले म्हणूनच ते संयुक्त वर्ण वाटूं लागले. वस्तुत: ते संयुक्त वर्ण नव्हेत. म्हणूनच कण्हेर, पन्हें, तुम्ही, वऱ्हाडी, वल्हें, नव्हे इत्यादि शब्दांत प्रथमाक्षर गुरु होत नाही. अक्षरांचे स्पष्ट उच्चार करूनहि तीं क-ण्हे-र अशींच पडतात.

ण्ह, न्ह, म्ह, ऱ्ह, ल्ह, व्ह हे उच्चारच संस्कृतांत नाहीत म्हणूनच ही लिपिचिन्हेंहि नाहीत. ज्या संयुक्त व्यज्जनांत प्रथम व्यज्जन ह आहे अशीं ह्ण, ह्म, ह्र, ह्ल, सारखीं काही संयुक्त व्यज्जनें आहेत. यांचे मराठींत हे उच्चार होतात त्यांत वर्णांचा विपर्यय होऊन ह्ण, ह्म, ह्र, ह्ल यांचे उच्चार अनुक्रमें ण्ह, म्ह, ऱ्ह, ल्ह, असे होतात; आणि चिन्ह, ब्रम्ह, अऱ्हस्व, प्रल्हाद इत्यादि शब्दांत या संयुक्तवर्णांचा उच्चार करिताना प्रथम वर्णाचें द्‌वित्व होतें जसे चिन्न्ह, ब्रम्म्ह, अऱ्हस्व, प्रल्ल्हाद. या ठिकाणी चिनन्ह, ब्रम-म्ह, अर-ऱ्हस्व, प्रल-ल्हाद अशी अक्षरविभागणी होत असल्याने पहिली अक्षरे व्यज्जनान्त अतएव गुरु होतात. चिन्ह, ब्रम्ह, प्रल्हाद इत्यादि शब्दांत अनुक्रमें न, म, ल या व्यज्जनाचें द्‌वित्त्व होते हे त्यांची अनुक्रमे भिन्न, ढम्म, जल्लाद या शब्दांशी तुलना केली असतां तत्काळ स्पष्ट होईल. या शब्दांतील उच्चाराच्या अनुकरणाने तुम्ही, उन्हें, वल्हें यांचे उच्चारसुद्धा जेव्हा तुम्म्ही, उन्न्हें (कोल्हापुराकडील बोलींत उन्नें,) वल्ल्हें (वल्लें) असे होतात तेव्हा प्रथमाक्षर व्यज्जनान्त आणि गुरु होतें.

मराठी शब्दांत व्यज्जनांचा जेव्हा 'या'शी (आणि केव्हा केव्हा 'ये'शी) संयोग होतो तेव्हा हा यकार असाच त्या अक्षरांत एकजीव होऊन जात असल्याने नद्‌या, करित्यें या शब्दांत दिसायला जरी द्‌य आणि त्य हीं संयुक्तव्यज्जनें असली तरी वस्तुत: ती तशीं नसतात. शब्दांची न-द्‌या, क-रि-त्ये अशीच अक्षरविभागणी होते; आणि या संयुक्त भासणाऱ्या वर्णापूर्वीचें लघु अक्षर गुरु होत नाही. परन्तु संस्कृत शब्दांत ती संयुक्त व्यज्जनें असल्याने मराठींत त्यांचा उच्चार करिताना पहिल्या व्यज्जनाचें द्‌वित्व होतें, आणि त्यांतील पहिले व्यज्जन पूर्वीच्या अक्षरांत मिळून त्यास व्यज्जनान्त अतएव गुरु करते जसें, नद्‌याम (नद-द्‌याम). सत्याने (< सत्य) आणि बत्त्याने (< बत्ता) या दोन शब्दांच्या उच्चारांची तुलना केल्यास संस्कृत शब्दांचा मराठींत उच्चार करितांना यच्या पूर्वीच्या संयोगी वर्णाचें द्‌वित्व कसे होते हे स्पष्ट होईल. पुढील उदाहरणांत मात्र

'रयू' याचा उच्चार 'र्यु' असा न होता मराठी 'ऱ्यु' प्रमाणे होऊन तत्पूर्वील लघूस गुरुत्व येत नाही.

"अटति यद्भवानहि काननं
त्रुटिऱ्युगायते त्वामपश्यताम
कुटिलकुन्तल श्रीमुखंच ते
जड उदीक्षतां पक्ष्मकृद्दशाम"     (भाग १०|३१|१५)

तेव्हा अक्षरांचा सलग आणि स्पष्ट उच्चार केला असतां एखाद्या अक्षरांत जर पुढील जोड वर्णांतील प्रथमवर्णाचा उच्चार येऊन मिळत असेल तरच ते अक्षर लघु असल्यास गुरु होतें असा निरपवाद नियम समजावा.

परन्तु या नियमालाहि काही अपवाद असावेत अशी म्हणण्याची प्रवृत्ति केव्हा होते? विप्र याचा उच्चार निरपवादपणें विप-प्र (- ~) असा होतो; पण हाच प्र जर एखाद्या पदारभ्भीं आला तर तत्पूर्वील लघूस गुरुत्व यावे की नाही? ज्ञानप्रकाश हा शब्द [ - ~, ~ - ~ ] असा उच्चारावा की ज्ञानप-प्रकाश [ - - ~ - ~ ] असा उच्चारावा, दैनिक बोलींत तर याचा उच्चार [ -, ~ - ~ ] ज्ञान-प्रकाश असा होतो. तेव्हा पद्यांत ग्राह्य कोणता मानायचा हा प्रश्न आहे. डोळ्यापुढे पद्यांतील उदाहरण पाहिजे म्हणून पुढील उदाहरण रचून पाहूं या.

रवि-प्रकाश हा पडला भूवर,
रविप्रकाशीं सुवर्णसुन्दर
मुलांस या हिरवळीं क्रीडुं द्या--
असो काळजी उद्याची उद्या.

छन्दोभड्ग टाळायचा असला तर पहिल्या चरणांतील 'वि' हे दुसरे अक्षर लघुच ठेविलें पाहिजे; आणि तीव्र-प्रयत्नाने, हट्टाने ते लघुच ठेवायचे म्हणजे 'वि'च्या मागून किंचित अडखडळल्यासारखे थाम्बून मग पुढील 'प्र'चा उच्चार अस्पष्ट निसरडा करावा लागतो.[1] (१. यालाच तीव्रप्रयत्नोच्चारण म्हणतात. :यदा तीव्रप्रयत्नेन संयोगादेरगौरवम। नच्छन्दोभड्ग इत्याहुस्तदा दोषाय सूरय:" (सरस्वतीकण्ठाभरणं १|१२३) या वचनाला फार महत्त्व देतां कामा नये.) असे न केले तर दुसऱ्या चरणांतील वि-प यांच्या सहजसंयोगाप्रमाणे पहिल्या चरणांतहि संयोग होऊन, विप असे होऊन दुसऱ्या अक्षराला गुरुत्व येतें. सलग, स्पष्ट आणि स्वाभाविक उच्चाराला महत्त्व देणारा कवि पहिला चरण 'पडे हा रविप्रकाश सुन्दर' असा सुधारून घेईल. एका चरणांत एक नियम आणि दुसऱ्या चरणांत दुसराच नियम असे निरड्कुशत्व त्याला रुचणार नाही. पद्यांत चरणांतील सारी अक्षरें सलग आणि स्पष्ट उच्चारावयाचीं असतात. तेव्हा चरणांत कोठेहि संयुक्त वर्ण आला असला, आणि तो कानालाहि संयुक्त प्रतीत होत असला तर तत्पूर्वील लघु हा

निरपवादपणें गुरु झाला पाहिजे. क्र, प्र इत्यादि संयुक्त वर्णाच्या प्रकरणीं सुद्धा अपवाद करण्यांत येऊ नये.

(१) " सा मङ्गलस्नानविशुद्धगात्री
गृही**तप्र**त्युदगमनीयवस्त्रा" ( कुमार ७।११ )
(२) " प्राप्यना**भिह्ल**दमज्जनमाशु
प्रस्थितं निवसनग्रहणाय" ( शिशु १०।६० )

या अवतरणांतील छन्दोभङ्गाच्या दोषाच्या परिहारासाठी 'प्रेन्हेवा' म्हणून जे सूत्र पिङ्गलाच्या नावावर विकण्यांत येतें त्याचा पिङ्गलाच्या छन्द:शास्त्रांत तरी पत्ता लागत नाही.

चरणान्ती खटका तरी असतोच, तेव्हा एखाद्या चरणारम्भीं संयुक्त वर्ण आल्यास त्यांतील पहिला व्यञ्जनाबरोबर काही त्याच्या पूर्वीच्या चरणाच्या अन्तीं असलेल्या अक्षरांत मिळायला जात नाही; आणि ते चरणान्त्य अक्षर लघुअ ठेवायचें असल्यास तसे राहूं शकतें.

जलबिन्दु जसा पद्यदलस्थित
क्षणभङ्गुर हे तैसें जीवित.

येथे प्रथमचरणान्ती खटका असल्याने तक-क्षण असा संयोग होऊ शकत नाही. म्हणूनच केदारभट्टाने

"पादादाविह वर्णस्य संयोग: क्रमसंज्ञक:
पुर:स्थितेन तेन स्याल्लघुताऽपि क्वचिद गुरो:" ( के १।१० )

असा नियम साङ्गून

"अल्पव्ययेन सुन्दरि
ग्राम्यजनो मिष्टमश्नाति"

हे उदाहरण दिलें आहे.

ऋलृ हे शुद्ध स्वर नव्हेत.

ऋ, लृ यांचा विचार आता करणें योग्य होईल. संस्कृतांत यांना स्वर मानतात; आणि मराठी भाषेंत हे संस्कृतशब्दाव्यतिरिक्त इतर कोठेहि आढळत नाहीत. लृ हा क्लृप्ति या एकच शब्दांत आढळतो. ऋ आणि लृ यांचा उच्चार प्राचीनकाळीं संस्कृतांत कसा होत असेल तो असो. आ, ई, ऊ, ए, हे आपले स्वरच काय, परन्तु इंग्रजीतून मराठींत आलेले बॅट हॅट इत्यादि शब्दांतील ऍ, नि बॉल मधील ऑ हे इंग्रजींतील स्वरहि सारेच 'अ'ची निरनिराळीं निर्भेळ रूपे वाटतात. ऋ-लृ चे आजचे प्रचलित उच्चार पहातां ते तसे अच्या रूपावलींत बसत नाहीत. ज्ञ म्हणजे *** याचा उच्चार जसा मराठींत ज आणि ञ यांच्या संयोगाहून अगदीच भिन्न, 'द्न्य' असा होतो त्याप्रमाणे ऋ-लृ यांचे आज होत असलेले उच्चार प्राचीन, अकराच्या रूपावलींत बसतील अशा उच्चाराहून

अगदीच भिन्न वाटतात. वस्तुत: केवळ व्यज्जनांचा उच्चार करून दाखविणें अशक्य आहे; परन्तु क, ख, ग, र, ल अशीं पाय मोडलेलीं व्यजनें उच्चारून दाखवितांना ज्या स्वराचा आश्रय घेण्यांत येतो, जो धड इ नाही धड उ नाही पण यांमधीलच असा, जर्मन ö सारखा स्वर, तो र आणि ल या व्यज्जनांना मिळाला असतां जे उच्चार होतील ते अनुक्रमे ऋ-लृचे उच्चार होत. अर्थात आधुनिक मराठींत ऋ-लृ हे स्वर नसून ही रि-लि वा रु-लु यासारखी अक्षरें आहेत. एखादें स्वरान्त अक्षर दीर्घ उच्चारीत राहिलें असतां लाम्बविलेला उच्चार हा त्या स्वराचा उच्चार असतो. का हे अक्षर लाम्बवून उच्चारिलें की आऽऽऽऽ हा स्वर प्रतीत होतो. कृ हें अक्षर लाम्बवून उच्चारिलें की जो स्वर प्रतीत होतो तो कृममधील शुद्ध स्वर होय. ककार आणि रकार हे लाम्बविले जात नाहीत. ऋ आणि लृ या अक्षरांत जो स्वर प्रतीत होतो त्याच्यासाठी जर ı̥ हें चिन्ह उपयोगिलें तर ऋ आणि लृ ही अक्षरें ı̥ आणि लृ अशीं लिहिलीं जातील; आणि मृ हें साधे अक्षर न राहतां मृ असे संयुक्त अक्षर होईल. अर्थात अमृत शब्दाची अक्षर अम-मृ-त ( - ˜ ˜ ) अशीं पडून ऋकारयुक्त अक्षरापूर्वीच्या अक्षराला गुरुत्व येईल.

मग कवींच्या रचनेंत ऋकाराने तत्पूर्वील लघूला गुरुत्व आल्याचीं उदाहरणें दुर्मिळ कां? इतर संयुक्तवर्णापूर्वीच्या लघूस गुरुत्व न आल्याचीं उदाहरणें जेथे अगणित आहेत, एखाद्या पदारम्भीं संयुक्त वर्ण आला असतां तत्पूर्वील लघु तीव्रप्रयत्नाने लघु ठेवण्याची जेथे वहिवाट दिसते तेथे ऋ---लृ यांच्या पूर्वील लघूस गुरुत्व आल्याचें उदाहरण नाही या गोष्टीला महत्त्व नाही. “वीर पडुनि रणिं स्वर्ग जिडिकती” ( केपगु ४९) असा चरण पादाकुलकजातींत लिहिणारे कवि “उज्ज्वल मुगुटशिरीं धरि नृपती” ( केपगु ४9) असा चरण लिहितील यात नवल नाही. परन्तु ऋ आणि लृ हे स्वर आहेत असे मानणारे हेच कवि—श्री. नरसिंह चिन्तामण केळकर जेव्हा सहजगत्या शार्दुलविक्रीडितांत

“देई धीर मनासि आजवरि मी, झाले प्रय**त्न वृ**था” (केपगु ६९) असा चरण लिहितात तेव्हा ऋकारयुक्त अक्षरापूर्वील लघु गुरु व्हायला पाहिजे हे आपोआप सिद्ध होते. अक्षरांचे उच्चार सलग आणि स्पष्ट केले असतां ऋकारयुक्त व्यज्जनापूर्वील लघूस गुरुत्व आलेच पाहिजे. “प्रवृत्ति परिसूनिया स्तिमित सर्वही मानसीं” ( लेति २) या पृथ्वीवृत्तांतील चरणांतील प्रवृत्ति या शब्दाचा उच्चार आणि “निवृत्ती ही प्रवृत्तीशी झुन्जे नित्य विलोकी” (टिक १।१२४) या साकीजातींतील चरणांतील प्रवृत्ति या शब्दाचा उच्चार यांची तुलना केली असतां आधुनिक मराठींतील रूढ आणि प्रचलित उच्चाराच्या दृष्टीने टिळकांचाच चरण शुद्ध वाटतो.

## हृचा अपवाद होतो का?

मग सहृदय या शब्दामध्ये प्रथमाक्षर गुरु कां होऊं नये? हृ मध्ये संयुक्त व्यज्जन नाही हेंच कारण होय. संस्कृतलेखनपद्धतीप्रमाणे हृ हें अक्षर लिहिलें जात असले तरी उच्चारत: तें

ह+र+अ (hrö) असें नसून ऱ्ह+अ rhö असे आहे. म्हणजे ऱ्ह मध्ये एक विशिष्ट स्वर मिळून हे अक्षर होतें. अर्थात 'तऱ्हा' मध्ये ज्याप्रमाणे प्रथमाक्षराला गुरुत्व येत नाही, त्याचप्रमाणे 'सहृदय' मध्ये प्रथमाक्षराला गुरुत्व येत नाही.

## स्वरभक्ति

ज्या संयुक्त वर्णांत पहिला वर्ण र आहे अशा संयुक्त वर्णाची फाळणी वृत्ताच्या सोयीसाठी मध्ये एखादा इकार घालून प्राचीन संस्कृत काव्यांत करण्यांत येते असे दिसतें.

"य वै श्वसन्तमनु विश्वसृजः श्वसन्ति
यं चेकितानमनु चित्तय उच्चकन्ति
भूमण्डलं सर्षपायति यस्य मूर्ध्नि
तस्मै नमो भगवतेऽस्तु सहस्त्रमूर्ध्ने" (भाग ६।१६।४८)

येथे सर्ष याचा उच्चार सरिष असा करावयाचा आहे. मराठींतहि वर्ष याचें वरिस असे रूप होतें. पण मराठींत वर्ष लिहून वरिस उच्चारित नाहीत तर 'वरिस' असे लिहितात.

## चरणान्त्य अकार

चरणान्ती विरामपूर्व स्वर दीर्घ होतो या न्यायाने चरणान्त्य अकार अवश्य असल्यास दीर्घ करितां येतो. या दीर्घ अ-साठी लिपींत निराळे चिन्ह नाही त्यामुळे तो दिसायला एकमात्रक अच दिसला तरी छन्दाच्या आवश्यकतेप्रमाणे तो दीर्घ उच्चारावयाचा असतो. चरणान्त्य अकार हा ऱ्हस्व असूच शकत नसता तर त्याच्यासाठी निराळे चिन्ह असण्याची आवश्यकता नव्हती. पण चरणान्त्य अकार कित्येकदा ऱ्हस्व असूं शकतो. तेव्हा शुद्धलेखन करायचें म्हणजे कवितेंत तो जेव्हा दीर्घ असेल तेव्हा स्वर एका मात्रेने पुढे लाम्बवायचा आहे हे दाखवायला त्याच्यापुढे ऽ हे चिन्ह घालावें.

"तेव्हा आम्ही म्हटलें, "ही ऱ्हासाची
रजनी केव्हा जाईल विरुनि साची ? -
स्वतन्त्रतेची पहाट ती येईल ऽ?"
उत्कर्षाचा दिन केव्हा सुचवील ऽ." (केक २०)

चरणान्तीं एक मात्रेच्या विरामाचीहि कूस नसते, केवळ खटका असतो तेव्हा अन्त्य अकार ऱ्हस्वच उच्चारावा लागतो.

(१) "भुललों देखुनि सकळहि सुन्दर
सुराङ्गना तो नाचति भूवर." (केक १४३)

(२) "मन किती उताविळ घेत धाव
कधि वरिन नोवरी हीच हाव." (देशा ३७)

(३) "आम्ही श्रीरामाचे चाकर

"हरिकीर्तन आमुचा मुशारा, रामनाम तुपसाखर १
अमृतरूप घरि बसल्या देतो स्वात्मसुखाची भाकर." 2 (अक १३७)

चरणान्त्य अकार हा छन्दाच्या सोयीसाठी जसा दीर्घ होऊ शकतो तसा तो छन्दाच्या सोयीसाठी गाळतांहि येतो. हा गाळावयाचा अकार वर्णाखाली हलचिन्ह काढून दाखविणें हे शुद्धलेखन होईल.

"पाखरा, येशिल का परतून?
मत्प्रेमाने दिल्या खुणांतुनि एक तरी अठवून?" (टिक १।१४१)

अशा ठिकाणीं अन्त्य अक्षर अकारविरहित असूनहि तो वर्ण मोडून लिहिणें कित्येकांना चुकीचें वाटतें. जो अकार उच्चारावयाचा नाही तो खुणेने तसा दाखविण्यांत चूक कोणती? तो अकार उच्चारावयाचा असतो असा ज्यांना भ्रम होतो त्यांच्या भ्रमाचा निरास करण्यासाठी वरील पद्याच्याच जातींतील संस्कृत पद्य देतों. तुलना अवश्य करून पहावी.

"विजयते रामदूत हनुमान
यो रघुपतिनासह सुग्रीवं मैत्र्या योजितवान" (विदप ८)

हा अन्त्य अकार उच्चारित आहे असें समजून त्याचा एक लघु गणून अरविन्दादि भिन्न वृत्तें हिन्दी छन्दःप्रभाकरांत साडिगतलेलीं आहेत; परन्तु हा अकार अनुच्चारित आहे तसा गणल्यास वृत्तभेद होत नाही. उदाहरणार्थ, छन्दप्रभाकरांतील अरविन्द (पृ. २०७) हे वृत्त वस्तुःत दुर्मिलच होय.

अकार गाळण्याची ही मोकळीक चरणान्तींच ठेविलेली आहे, इतरत्र नाही. दैनिक बोलींत

शब्दान्त्य अचा उच्चार क्वचितच होतो; आणि जर, मग, कळ इत्यादि **** शब्दांतील अन्त्य अकार गळून उपान्त्य अ हटकून दीर्घ होतो. तरी पद्यांत हा शब्दान्त्य अकार उच्चारावा आणि उपान्त्य अकार ऱ्हस्वच गणावा अशी वहिवाट आहे. जर मग, कळ इत्यादि शब्दांचे लगत्वलेखन ( ˜ ˜ ) असेंच होतें. बोलतो, चालतो इत्यादि शब्दांतहि मधला अकार गळून सामान्य उच्चार बोलतो, चालतो असा होतो; तथापि या उच्चाराला अद्यापि मान्यता मिळालेली नाही. एरव्हीचा उच्चार आणि काव्यपठनांतील उच्चार यांतील हा भेद स्वाभाविकपणाला थोडा मारक होतो हे नि:संशय खरे आहे. हा भेद काढून टाकिल्यास भाषेचें स्वरूप किती निराळें दिसेल या कल्पनेनेच डोळे मिटून घ्यावेसे वाटतात. तथापि ही क्रान्ति बहुजनांच्या योजनेने आनि दण्डकाने घडवून आणल्यास ते अनिष्ट होईल असे मात्र नाही.

'राजा शिवाजी' या काव्याचे कर्ते महादेव मोरेश्वर कुण्टे[१] (१ मुळांत शब्द पुढीलप्रमाणे आहेत. " It is not pure Marathi words that are at fault, but the system of quantification now in force is irregular and unnatural. Marathi words are not written as they are pronounced. For instance nobody pronounces उचलून as consisting of four full syllables, but च is only a consonant and is amalgamated with उ which threrfore becomes long by position. So long as this difference between Marathi written and Marathi spoken is not removed or atleast recognized; so long as some innovation founded on the knowledge of this difference is not introduced the cause of Marathi metrical composition should suffer. A ware of this, I fearlessly adopted the method of writing words as they are spoken in my poem. So the reader will find खालचा instead of खालचा which is really unmusical.) (Preface p. 23) हे ख्रिस्तशके १८६९ मधील आपल्या प्रस्तावनेंत म्हणतात, "हा शुद्ध मराठी शब्दांचा दोष नाही; पण अक्षरविभागणीची आणि अक्षरमोजणीची पद्धत ही अनियमित आणि अस्वाभाविक आहे. मराठी शब्द जसे उच्चारिले जातात तसे ते लिहिण्यांत येत नाहीत. उदाहरणार्थ उचलून या शब्दाचा उच्चार करितांना पूर्ण चार अक्षरें कोणीहि उच्चारीत नाही. च हे केवळ व्यज्जन असून ते तत्पूर्वील 'उ' मध्ये समाविष्ट होते आणि त्यामुळे तें अक्षर गुरु होतें. लेखी मराठी आणि बोललेली मराठी यांच्यातील हा भेद जोपर्यन्त दूर करण्यांत येत नाही, निदान ओळखला जात नाही, या भेदाच्या जाणीवेवर जोपर्यंन्त एखादी नवी पद्धति स्थापण्यांत येत नाही तोपर्यंत मराठी पद्यरचनेच्या कार्याची ही हानिच होत रहाणार. हे जाणून शब्द जसे उच्चारण्यांत येतात तसेच ते माझ्या काव्यांत लिहिण्याची पद्धति मी निर्भीडपणें स्वीकारिली. म्हणून वाचकाला 'खालचा'च्या ठिकाणीं 'खाल्चा' असे आढळेल. 'खालचा' हे रूप खरोखर कर्णकटु आहे."

ऋकाराला स्वर न समजतां ऱ्+अ असें अक्षर समजून त्या धोरणाने निरपवाद रचना करण्यचा जो उपक्रम मी चालू केला आहे तो कुण्टे यांनी दाखविलेल्या दिशेनेच आहे. परंतु या एवढ्याशा सुधारणेलाच अज्ञान आग्रहाने किती विरोध होत आहे! मग कुण्टे यांची सम्भावना ६५

वर्षामागे कशी झाली असेल याची कल्पनाच करावी.

शिष्टसम्मत आणि सर्वत्रप्रचलित असा स्पष्टोच्चार हवा.

जा स्पष्टोच्चार शिष्टसम्मत आणि सर्वत्र प्रचलित आहे त्याप्रमाणे जे लेखन ते शुद्ध होय आणि त्याप्रमाणेच पद्यांतहि रचना असावी. वैयक्तिक उच्चार वैचित्र्याला मात्र अगदी महत्त्व देऊ नये.

"दीर्घाक्षरमपि जिह्ला ह्रस्वं चेत्पठति तदपि भवति लघु
द्वौ वा त्रीनथ वर्णानेक जातीहि शीघ्रपठनाच्च" (के २२ टिका)

हा नियम नागर सुसंस्कृत मराठीचा नव्हे. त्याचप्रमाणे दैनिक बोलींत काही उच्चार आपण घाईघाईने अस्पष्ट आणि लघु करितों; त्याप्रमाणे रचना करितां कामा नये. उदाहरणार्थ 'महा' या शब्दांतील 'हा' चा उच्चार घाईघाईने कित्येकदा अस्पष्ट आणि ऱ्हस्व केला जातो म्हणून काही

"पार्थसखा म्हण बोधितसे भगवन्त पहा महाभारतयुद्धीं" (उभ)
"महाराष्ट्राच्या पुण्याईच्या फुलल्या फुलवेली" (कुगी)

अशी रचना रसिकमान्य होणार नाही. प्राचीन मराठी कवींच्या काव्यांत शैथिल्य आढळतें म्हणून तशी रचना आता भाषा नागर, सुसंस्कृत, सुसङ्घटित आणि रेखीव झाल्यावरहि करणें असमंजसपणाचें होईल. सोहिरोबा आम्बिये यांच्या

"सर्वची पाहातां उदासिन मना काहीचि ना वाटते
हे पञ्जात्मक सव विश्वरचना सम्भूत हे आटतें,
ना पाचारित अडिंग येऊनि बहू वैराग्य हे दाटतें,
सोहीरा म्हणे भ्रान्तिचें वसन की निभ्रान्त हे फाटतें" (सोआप १७१)

या शार्दूलविक्रीडितांतील श्लोकासारखी रचना आता असह्यच झाली पाहिजे.

लेखनाप्रमाणे सरळ वाचन करीत गेलें की तें प्राय: शुद्ध व्हायचेंच हा जसा बालबोध (नागरी) लिपीचा विशेष आहे, त्याप्रमाणे आधुनिक मराठी कविता लेखनाप्रमाणे सलग स्पष्ट वाचीत गेल्याने तिच्यांतील छन्दाचा बोध आपोआप होतो, हा जो बहुमोल विशेष मोरोपन्त-देवलादि पद्यप्रभूंना मराठींत कमावून आणिला आहे तो गमावणें अनर्थावह होईल. हा विशेष प्राचीन मराठी कवितेंत नसल्यामुळें शेकडो अर्थदृष्ट्या सरस अशी पदे दुदैवाने गद्यासारखीं वाचावीं लागतात; कारण लेखनानुसारी वाचनाने त्यांच्यांतील छन्दाचा बोध होत नाही. पद्यरचनेंत अडचणी येत नाहीत असें नाही; परन्तु अडचणीच्या निमित्ताने अस्पष्टोच्चाराचा चञ्चुप्रवेश होऊ दिला तर तो

परिणामीं घातक झाल्याविना रहाणार नाही. प्रणय, प्रीति आणि प्रेम ही शब्दत्रयी मात्र जितकी अपरिहार्य तितकीच जाचक आहे तेव्हा या तीन शब्दांच्या पुरताच 'तीव्रप्रयत्नोच्चार' क्षम्य ठरेल. संयुक्त वर्णाचा उच्चार अस्पष्ट करणें हा अक्षम्य दोष आहे हे मनाला पटल्याविना तो टाळण्याचे कष्ट कोणी करणार नाही. असे दोष जितके दुर्मिळ तितकें कवीचें पद्यपटुत्व प्रशंसनीय ठरतें. असे दोष टाळतां यावेत म्हणूनच तर कवीला शब्दक्रम फिरविण्याची, अपरिचित पर्याय वापरण्याची आणि शब्दांचीं रूपें विकृत करण्याची थोडी मोकळीक असते.

## ४ निरद्कुशत्वाच्या मर्यादा

या मोकळिकीचा विचार थोड्या विस्ताराने येथेच करून टाकणें बरें. पद्यरचना म्हणजे विशिष्ट साच्यांत निरनिराळ्या मात्राकाराचे शब्द-खडे बसवून करावयाची सार्थ आणि लयबद्ध अक्षररचना होय. ही जितकी हृदयडम तितकीच दुष्कर असल्याने गद्यलेखकापेक्षा कवीला थोडें अधिक स्वातन्त्र्य देण्यांत येतें. हेंच निराळ्या शब्दांनी साड्गयाचें म्हणजे काव्याची गद्यभाषासरणीपासून च्युति ही काही प्रमाणांतच क्षम्य असते. तेव्हा कवीने किती स्वातन्त्र्य चालवावें याचा विचार नेमस्तपणाने आणि तडजोडीने व्हायला पाहिजे. कवि आणि वाचक यांनी एकमेकांची सोय पहायला हवी; आणि भाषा ही सर्वांचीच असल्यामुळे तिच्या स्थैर्याकडे, स्वत्वरक्षणाकडे आणि संवर्धनाकडे सर्वांनीच लक्ष्य पुरवायला हवें. शब्दक्रम फिरविण्याची आणि अपरिचित पर्याय नि शब्दांचीं प्राचीन वा ग्रामीण रूपें वापरण्याची मोकळीक कवीला असली, तरी आपल्या भाषेंत दूरान्वय आणि दुर्बोधता ही येत नाहीत याविषयी कवीला दक्षता बाळगावीच लागते. ज्या कालांत कवि रचना करितो त्या काळच्या लोकांना तो आपलीच प्रचलित भाषा लिहित आहे हे पटलें पाहिजे. नाहीतर त्यांना त्या काव्याविषयी आपुलीक वाटणार नाही. कवीला एकन्दर ज्या शब्दसड्ग्रहाची आवश्यकता भासते त्यांत अव्ययसर्वनामादि पदोपदीं येणारे काही शब्द असतात, आणि मराठीं पद्यांत त्याची अनेक रूपें प्रचलित आहेत. तेव्हा या बहुरूपी चिल्हर शब्दांचा उपयोग केल्यास आणि समानार्थी शब्दांचा साठा ठेविल्यास, "अपि भाषं मषं कुर्यात छन्दोभड्ग न कारयेत" असें जरी वचन आहे तरी सामान्यत: शब्दांची विकृति करण्याचा प्रसड्ग कवीवर ओढवणार नाही.

(१) संस्कृत धातूपासून, भूतकालवाचक धातुसाधित अव्ययापासून, आणि नामापासून, तसेच मराठीं नामापासून नि विशेषणापासून क्रियापदें सिद्ध करण्याने अर्थ थोडक्या शब्दांत साड्गतां येतो. अशा रीतीने सिद्ध केलेलीं क्रियापदे उच्चारसुलभ आणि सुटसुटीत मात्र असावींत. प्राचीन मराठी कवींनी घालून दिलेलें हे वळण पद्यांतच नव्हे तर निर्भीडपणें गद्यांतहि गिरविलें पाहिजे. यांत भाषेचें हितच आहे.

(२) करीं, करिशी, करी, करिती यासारख्या रूपांचा उपयोग अनेक काळ दाखवायला होतो. यांचा त्याग करू नये. ईकारान्त रूप सकर्मक क्रियापदासाठी योजण्याकडे लक्ष्य द्यावें.

(३) न हें अव्यय वाक्यांत कोठेहि घालून क्रियापदाचें नकारार्थी रूप साधितां येतें.

(४) काही क्रियाप्रदांच्या भूतकालाच्या रूपांत उडला, उडाला असे दोन्ही प्रकार आहेत. दोन्हीहि पद्यांत रूढ असले तरी होतां होईल तो जे रूप गद्यांत रूढ आहे ते वापरण्याकडे प्रवृत्ति असावी. उबाला, जुळाला, झिजाला, तसेच निघला, निमला, मिळला ही रूपें बहुश: कोणी गद्यांत वापरीत नाही आणि पद्यांतहि वापरू नये.

(५) करिती, करिशी यांच्या ठिकाणीं करिति, करिशि ही रूपें केव्हा केव्हा वापरावींत; परन्तु जाई, करी अशा द्यक्षरी रूपांतील अन्त्यस्वर ऱ्हस्व करू नये.

(६) करीत, जाशील अशा अकारान्त रूपांतील उपान्त्य स्वर ऱ्हस्व केला तरी चालेल; परन्तु अन्त्याक्षर दीर्घ असतांना उपान्त्य स्वर ऱ्हस्व असतो तो दीर्घ करून फुड्कीतों, करीती अशी रूपें योजणें टाळावें.

(७) गेली, उठली अशा भूतकाळाच्या रूपांतील अन्त्य ई ऱ्हस्व करूं नये. बसेल, जातेस अशा रूपांतील उपान्त्य एकार ऱ्हस्व करण्यासाठी बसल, जातिस अशीं रूपें वापरूं नयेत. पाहूं याचीं पाहों, पाहु अशीं दोन्ही रूपें चालतील; परंतु करो, करोत यांची करु, करुत अशीं रूपें युक्त वाटत नाहीत.

(८) लागली याच्या ठिकाणीं 'लागयिली' (केक २०) हे रूप कसेसेंच वाटतें अशी रूपें वैरल्यानेच वापरावींत. धाविन्नला, करिजेतो अशीं रूपें मात्र आधुनिक मराठी पद्यांत मुळीच वापरूं नयेत.

(९) घेई, देई अशा द्यक्षरी रूपांच्या ठिकाणी घे, दे, ने, पी, भी, ये, वी, हो अशीं एकाक्षरी रूपें वापरणें सोयीचेंच आहे.

(१०) ऊन प्रत्ययान्त शब्दांत उचा ऊ, ओ करितां येतो आणि न चीं नि, नी, निया, नीया अशीं चार रूपें करितां येतात. करौनि, म्हणौनि हीं रूपें मात्र आता चालणार नाहीत.

(११) 'कां करितां विघ्राला?' (टिक १०६) याप्रमाणे द्वितीयेचा प्रत्यय निष्कारण लावणें इष्ट नाही.

(१२) विभक्तिप्रत्ययाचा लोप करून ते कार्य सामान्यरूपाकडूनच करून घ्यावयाचें ते सुद्धा अकारान्त आणि आकारान्त नामांच्याच आणि द्‌वितीया-चतुर्थीपुरतेंच करून घ्यावें. 'तातडीने'चे कार्य 'तातडी' या रूपाने करून घेणें योग्य नाही.

(१३) तें हा द्‌वितीयेचा प्रत्यय, ए, ई, हीं हे तृतीयेचे प्रत्यय आणि आ ई: हें सप्तमीचे प्रत्यय हे पद्‌यांतच आढळतात. तारतम्याने त्यांचा उपयोग चालू ठेवायला काही अडचण नाही. ए, ई, हे तृतीयेचे प्रत्यय अकारान्त नामासच लावावेत आणि सप्तमीचा प्रत्यय इ याचे ऱ्हस्वीकरण करूं नये.

(१४) सामान्यरूपांतील उपान्त्यस्वराचें ऱ्हस्वीकरण करूं नये. सतिला, काकुने ही रूपें वापरणें उचित नाही.

(१५) विशेष्यांच्या सङ्‌गती विशेषणांसहि विभक्तिप्रत्यय लावण्याची संस्कृतांतील पद्धत मराठींत योग्य नाही. 'पवित्रें चरित्रें' 'पावने उपवने' 'मङ्‌गलें जडगलें' हे प्रयोग अमराठी वाटतात.

(१६) शुद्ध संस्कृत शब्द स्थिरोच्चार असल्यास त्यांची विकृति करू नये. सामान्यरूप करितांना उपान्त्य स्वर दीर्घ असल्यास तो ऱ्हस्व होतो हा मराठी शब्दांच्या विषयींचा नियम संस्कृत शब्दांना लावू नये. प्रितीला, रुपाने ही रूपे चाङ्‌गली दिसत नाहींत. 'शरिराला' हे रूप एकवेळ चालेल; पण 'शरिरभोग' तर अगदी असह्य होतो.

(१७) नदी, वधू यासारखे जे दीर्घ स्वरान्त शब्द आहेत त्यांतील अन्त्य स्वर कधीच ऱ्हस्व करू नये.

(१८) प्रीति, हेतु यासारख्या इकारान्त आणि उकारान्त नामांतील अन्त्यस्वर छन्दोवशात दीर्घ लिहावेत; प्रीत, हेत इत्यादि काही थोडक्या शब्दांत यमकासाठी अन्त्य अकार होऊ द्‌यावा. समासांत मात्र हे शब्द शुद्ध रूपांतच योजावेत. दृष्टीशर, प्रीतीयुक्त, रघूनायक अशीं समस्तरूपें त्याज्य होत.

(१९) हृत या नामाचें हृदीं हे सप्तमीचे रूप चालूं ठेवावे पण समासांत हृदकमल न म्हणतां हृत्कमलच म्हणावें.

(२०) शशिन, हस्तिन सारखीं जी नामें आहेत त्यांची प्रथमेची रूपें शशी, हस्ती अशी असतात. या रूपांतील अन्त्य इकार ऱ्हस्व केला तरी चालेल; पण उलटपक्षी समासांत शशी-वदना, हस्तीदन्त अशी रूपें त्याज्य गणावींत.

(२१) छन्दस, तपस, तेजस, नभस, यांसारखी जी नामे आहेत त्यांतील अन्त्य सचा साहजिकच विसर पडतो. शिक्षणाच्या प्रसारामुळे छन्दोमज्जरी, तपोबल, तेजोभङ्ग, मनोरज्जन इत्यादि समास जरी सर्वसामान्य परिचयाचे झाले आहेत तरी नवीन समास करितांना मन-रज्जनासारखे करण्यांत आले तर ते क्षम्य मानावेत.

(२२) मराठी समासांत सन्धि वैकल्पिक असला तरी शुद्ध संस्कृत समासांत तरी या विकल्पाला वाव नसावा. 'प्रभातउदय,' 'जन-इच्छा,' 'उत्कण्ठाअनळ' अशीं समस्तरूपें वापरू नयेत.

(२३) प्राचीन मराठी कवितेंत अकारान्त स्त्रीलिङ्गी नामांना निष्कारण ही जोडीत असत जसें आगी, सरी, चाडी, तळमळी. ही रूपें आता नकोत.

(२४) आता, आपणां, आपुला इत्यादि पाच सहा शब्द सोडले तर शब्दारभ्भींच्या आचा अ करणें युक्त नाही. आङ्ग, आजून, आळस ही रूपेंहि त्याज्य मानावींत.

(२५) धक्का, बुक्की, हद्द इत्यादि शब्दांत दुहेरी व्यज्जनाच्या ठिकाणीं एकेरी व्यज्जन सहसा वापरू नये.

(२६) छी, थू, तू, मी इत्यादि एकाक्षरी शब्द ऱ्हस्व वापरूं नयेत; पण हा नियम की, नी, ही, या अव्ययांना लागूं नसावा.

(२७) सर्वनामांच्या रूपांत विविधता फार आहे. मला याच्या ठिकाणीं मज, मजला, मजलागी, मजलागून, मशी, मजशी, माते, मजप्रति अशीं आठ रूपें वापरितां येतात. माझ्या, तुझ्या, त्याच्या, याची माझिया, तुझिया, त्याचिया अशीहि रूपें होतात. इयेस, तियेचे, तयाला, मियां, म्यां, तुवां, त्वां इत्यादि विविध रूपें तारतम्याने वापरून जिवन्त ठेवावीत. आम्ही तुम्ही, माझी, तुझी, त्याची इत्यादि शब्दांतील अन्त्य स्वर ऱ्हस्व करू नये. ही, जी, ती या स्त्रीलिङ्गी रूपांच्या ठिकाणी हे, जे, ते हीं रूपें यमकादि शब्दचमत्कृतीपुरतीच वापरण्यासारखीं आहेत.

(२८) सर्वनामांप्रमाणेच अव्ययांचीहि विविध रूपें आढळतात. याच शब्दांना चिल्हर म्हटलें आहे. इतर शब्द अविकृत रहावेत म्हणून या किरकोळ शब्दांची विविध रूपें चालूं रहावींत हेच योग्य होय. रूपांची विविधता पहा:-

(१) अलीकडे, अल्याड, ऐलीकडे, ऐलाड.
(२) असे, ऐसें, एवि, कसें, कैसें केवि, केवी, तसें, तैसे, तेवि, तेवि
(३) आज, अजि, आजी.
(४) आणि, अन, नि.

(५) इथ, इथे, येथे, कुठ, कुठे, कोठे, तिथ, तिथे, तेथे.

(६) कही, कैं, कदा, कधी कव्हा, केव्हा, जई, जैं जव, जधीं, जव्हा जेव्हा त्याचप्रमाणे तई, तै इत्यादि

(७) कडून, कून, पासून, पुन.

(८) खाली, खालें, खालति, खालती, खालील, खालला.

(९) जर, जरि, जरी, तर, तरि, तरी, परि, परी, परीस.

(१०) झणी, लवलाही, लौकरी, झडकरी, सत्वरी.

(११) नाही, नहि.

(११) नित्य, नित.

(१२) पलीकडे, पल्याड, पैलीकडे, पैलाड.

(१३) पुढे, पुढं, पुढारी, पुढारां, पुढतें, पुढील, पुढला.

(१४) भंवती, भवतें, भवताली, भोवतां, भोंवती, भोंवते, भोवताली, सभोवती, सभोवताली.

(१५) मग, मा.

(१६) मध्ये, मधे, मधि, मधी, माजि, माजी, माझारीं, भीतरीं.

(१७) मागे, मागां, मागुती, मागून, माघारा, मागील, मागला.

(१८) वर, वरि, वरी, वरति, वरती, वरतें, वरील, वरली.

(१९) विना, विणें, वीण.

निरड्कुशत्वाच्या या ज्या मर्यादा घालून दिल्या आहेत त्या पाहतां त्यांत एकसूत्रीपणा नाही हे उघड आहे. पण हा दोष व्यक्तिश: कवीचा वा भाषेचा नसून मूलभूत मनुष्यस्वभावाचा आहे. व्यक्तींतसुद्धा जर आत्यन्तिक एकसूत्रीपणा आढळत नाही तर अशा कोट्यवधि व्यक्तींची मिळून जी भाषा तिच्यांत त्याची अपेक्षा करणें चुकींचे आहे. मनुष्य एकीकडे एकसूत्रीपणा आणण्याचा प्रयत्न करितो तर दुसरीकडे जे चिरपरिचयाचें रूढ आहे ते त्याला सोडवत नाही. तेव्हा विसङ्गति आणि तडजोड ही या मूलभूत द्वैताचींच फळें आहेत. शुद्ध संस्कृत शब्दांचे प्रयोग संस्कृत व्याकरणास अनुसरून करावेत असे ठरवून दारा, समाधि इत्यादि शब्द पुल्लिङ्गी वापरले तर ते हास्यास्पद पाण्डित्य होतें; बरे, मराठी व्याकरणाचे नियम यच्चयावत सर्व शब्दांना लावावेत असे ठरवून, ‘आधुनिक’, ‘विवीध’ ‘प्रितीला’ अशी रूपे लिहूं लागलो तर तो निरर्गल सुधारकपणा होतो; आणि डोळ्यापुढे नकोसा वाटतो तरी सुधारणेची दिशा ठरली की त्या दिशेने थोडीफार प्रगति करीत रहावें हे युक्त होय.

## ५ गणविचार

**गण** म्हणजे चरणाचा स्वाभाविकपणें पडणारा भाग होय. पद्य जर आवर्तनी असेल तर चरणांत ठराविक कालांत उच्चारल्या जाणाऱ्या अक्षरांचे जे गट पडतात ते स्वाभाविक गण होत. हे सदैव एकाच अक्षरसङ्ख्येचे आणि लगक्रमाचे कसे असतील? "अच्युतं केशवं रामनारायणम" या चरणांत ( - ˜ - ) असे त्र्यक्षरी गण चार पडतात, तर "धुनोतु नो मनोमलं कलिन्दनन्दिनी सदा" या चरणांत ( ˜ - ˜ - ) असे चतुरक्षरी गण चार पडतात. रुक्मवती वृत्तांत ( - ˜ ˜ - - ) असे पञ्चाक्षरी गण दोन पडतात तर दोधक वृत्तांतील दोन गण ( - ˜ ˜ - ˜ ˜ ) आणि ( - ˜ ˜ - - ) असे भिन्न भिन्न पडतात. शालिनी वृत्तांत गण या दृष्टीने पहातां ( - - - - ) आणि ( - ˜ - - ˜ - - ) असे पडतील.

## पिङ्गलोक्त त्रिक

वृत्ताचें लक्षण म्हणजे चरणांतील अक्षरांची सडरव्या आणि लगक्रम ही साङ्गण्याच्या ज्या अनेक शास्त्रोक्त पद्धती आहेत त्यांपैकी पिङ्गलाच्या पद्धतींत त्र्यक्षरी गणांची, त्रिकांची योजना आहे. ही पद्धति अधिक रूढ झाल्यामुळे गण हे त्र्यक्षरीच असले पाहिजेत हा समज रूढ झाला आहे. या गणांतहि काही शुभ आणि काही अशुभ मानण्यांत येऊन त्यांच्या देवता आणि त्यांची फलें ही कल्पिण्यांत आली आहेत! पण या देवखुळेपणाच्या प्रपंचाला पिङ्गलाच्या सूत्रांत आधार नाही.

या त्र्यक्षरी गणांच्या नावाच्या साहाय्याने कोणत्याहि वृत्ताचें लक्षण थोडक्यांत आणि अचूक माण्डून ठेवितां येतें ही गोष्ट खरी; आणि म्हणूनच विष्णूने जसें त्रैलोक्य व्यापिलें तसे य, म, त, र, ज, भ, न, स, ल आणि ग या दहा अक्षरांनी, समस्त वाङ्मय व्यापून टाकिलें आहे असें केदारभट्ट[१]

(१ "मयरसतजभनलगसंमित भ्रमति वाङ्मयं जगति यस्य
स जयति पिङ्गलनाग: शिवप्रसादाद्विशुद्धमति:" (हलायुध)
" म्यरस्तजभ्नगैर्लान्तैरेमिर्दशभिरक्षरै:
समस्तं वाङ्मय व्याप्तं त्रैलोक्यमिव विष्णुना" (शके १।६)

म्हणतो.

**'यमाताराजभानसलगम'** या सूत्राने पिङ्गलाने साडिगतलेल्या गणांची नावें आणि स्वरूपें बान्धून टाकिली आहेत. कोणतीहि तीन अक्षरें क्रमाने घेतली असतां त्या त्या त्र्यक्षरी शब्दाचे जे लगत्वरूप होतें ते त्यांतील आद्यक्षराने निर्दिष्ट होणाऱ्या गणाचें स्वरूप होय.

यमाता ( ˜ - - ), मातारा ( - - - ), ताराज ( - - ˜ ), राजभा ( - ˜ -) जभान ( ˜ -

~ ), भानस ( - ~ ~ ), नसल ( ~ ~ ~ ), आणि सलगं ( ~ ~ -), ही य, म, त, र, ज, भ, न आणि स या गणांची रूपें होत. ल (~) हें अक्षर लघुदर्शक असून ग (-) हे गुरुदर्शक आहे. यांच्या साहयाय्याने वृत्तलक्षण थोडक्यांत साङ्गता येतें जसें, "शार्दूलविक्रीडितं म्सौ ज्सौ तौ ग आदित्यऋषय:". परन्तु अर्थशून्य आणि उच्चारकठिण सूत्र ऱ्हस्वतम असलें तरी बिनचूक लक्षांत ठेवायला थोडे श्रम पडत नाहीत. एखाद्या श्लोकाचें वृत्त कोणते म्हणून कोणी विचारिले तर आपण काही गण माण्डून सूत्रस्मरणाने ते ओळखीत नाही. वाचतां-वाचतांच तो श्लोक कोणत्या ओळखीच्या श्लोकासारखा आहे हे आपला कान साङ्गतो, आणि मग आपण त्या ओळखीच्या श्लोकाच्या वृत्ताचें नाव साङ्गतों. म्हणून, वृत्त ओळखतां यायला प्रत्येक सुप्रसिद्ध वृत्ताचें एक एक उदाहरण चांगले ध्यानात ठसलें की पुरें. विचारलेल्या श्लोकाची शुद्धता तुलनेने सहज पारखतां येईल. यतिस्थानेंहि श्लोक म्हणतांना आपण विशेष कोठे थाम्बतों हे पाहूनच ध्यानांत रहातात. तेव्हा तोण्डपाठ करावयाच्या शुद्ध श्लोकांत त्याच्या वृत्ताचे नाव ग्रथित केलेले असल्यास तेहि अनायासें साङ्गतां येईल. त्र्यक्षरी गणहि साङ्गा म्हणून कोणी आग्रहच केल्यास आरभ्भींपासून त्र्यक्षरी तुकडे पाडून लगक्रम माण्डून यमाताराजभानसलगम या सूत्राच्या साहाय्याने त्या गणांची नावेहि साङ्गतां येतील.

(२ दुसरे एक सूत्र "मायावी यतात्मा रावण: सहसा तन्त्रणि जजाप भावय न इति" हे एका विद्वान जर्मन स्नेहयाकडून मिळालें असे चार्लस फिलिप ब्राऊन आपल्या Sanskrit Prosody च्या ३ ऱ्या पृष्ठावर म्हणतो. "यमाताराजभानसलगम" हे सूत्र पाणिनीने केले असे याच ब्राऊनने २८ व्या पुष्ठावर लिहून ठेविलें आहे. या सूत्राचा उगम मला सापडला नाही.

"शार्दूलासच कौतुकास्पद गमे शार्दूलविक्रीडित"

- - - | ~ ~ - | ~ - ~ | ~ ~ - | - - ~ | - - ~ | -

मातारा सलगं जभान सलगं ताराज ताराज गं

तेव्हा, शार्दूलविक्रीडिताच्या एका चरणांत १९ अक्षरें असून मसजसतत असे क्रमाने गण पडून शेवटीं एक गुरु असतो; आणि यति बाराव्या अक्षरानन्तर असतो असें सहज साङ्गतां येतें.

परन्तु वृत्तज्ञानाला या त्रिकांचा काही उपयोग नाही.

# अध्याय ३ रा

## वृत्तविचार आणि वृत्तविस्तार

शिखा,[१] (१ शिखा नि खज्जा हे प्रकार वृत्तरत्नाकर आणि प्राकृत पैङ्गल या दोनच ग्रन्थांत पाददव्यघटित आहेत.) खज्जा नि चूलिका हे प्रकार वगळल्यास संस्कृतांत पद्याचें परिमाण चतुष्पदी हे आहे. शिखा, खज्जा नि चूलिका या प्रकारांत चरण दोन दोनच असले तरी ते दीर्घ असल्याने म्हणतांना त्यांचे स्वाभाविकपणेंच चारचार चरण होतात. संस्कृतांत बहुश: अनुष्टुप छन्दांतील चतुष्पदीसच श्लोक म्हणतात; तथापि शङ्कराचार्यकृत 'प्रात:स्मरामि हृदि

संस्फुरदात्मततत्त्वम' या 'प्रात:स्मरण' स्तोत्रांत वसन्ततिलकावृत्ताच्या तीन चतुष्पद्या असून त्यांना उद्देशून नन्तर

"श्लोकत्रयमिदं पुण्यं लोकत्रयविभूषणम।
प्रात:काल पठेद्यस्तु स गच्छेत्परमं पदम ॥"

असा श्लोक आहे. मराठींत कोणत्याहि वृत्तांतील चतुष्पदीस **श्लोक** म्हणतात.

ज्या पद्यांतील चरण विशिष्ट अक्षरसङ्ख्या, लगक्रम आणि मोडणी वा गणविभागणी यांनी नियमित असतात ते वृत्त होय. मोडणी म्हणजे पिङ्गलोक्त गणांचा क्रम नव्हे तर अन्तर्गत आन्दोलनानुसार होणारी गणविभागणी होय. अक्षरसङ्ख्या आणि लगक्रम ही अभिन्न असली म्हणजे आरम्भापासून गणना करून चरणाचे जे त्र्यक्षरी तुकडे वा गण पडतात ते पिङ्गलोक्त गण एका ठराविक क्रमानेच येतात. पण पिङ्गलोक्त गणांचा क्रम अभिन्न असूनहि अन्तर्गत आन्दोलनानुसार होणारी गण-विभागणी भिन्न भिन्न होऊ शकते. या गणविभागणीस मोडणी म्हटले आहे.

मणिगुणनिकर [ । ~ ~ ~ ~ ~ ~ ~ ~ ! ~ ~ ~ ~ ~ - ] (पि ७/१३)
शशिकला [ । ~ ~ ~ ~ ~ ~ ~ ! ~ ~ ~ ~ ~ ~ ~ । - ] (हे २/२४४)
स्त्रक [ । ~ ~ ~ ~ ~ ~ ! ~ ~ ~ ~ ~ ~ ! ~ ~ -] (हे २/२४५)

हीं तीन वृत्तें अक्षरसङ्ख्येने आणि लगक्रमाने एकसारखीं असल्याने न, न, न, न, स, याच क्रमाने तिन्ही वृत्तांचे पिङ्गलोक्त गण पडतात; पण या तीन वृत्तांत अनुक्रमें अष्टमात्रक, सप्तमात्रक आणि षण्मात्रक आवर्तनें असल्याकारणाने त्यांची गणविभागणी निरनिराळी होते. आवर्तन किती मात्रांचे आहे, आवर्तनारम्भ कितव्या अक्षरावर होतो, आणि गण-विभागणी कशी होते यांचा निर्णय करायला प्राचीन छन्द:शास्त्रकारांनी साडिगतलेल्या यतिस्थानांचा फार उपयोग होतो. म्हणून लक्षण साङ्गतांना यति कोठे आहे हे साङ्गण्यांत येते; आणि यतिभेदाने म्हणजेच मोडणी-भेदाने वृत्तभेद मानण्यांत येतो. वर दिलेल्या वृत्तांत यतिस्थानें खाली टिम्ब असलेल्या उभ्यारेघांनी दाखविण्यांत आलीं आहेत. यति अनुक्रमें ८ व्या, ७ व्या आणि ६ व्या अक्षरानन्तर सांगितले आहेत त्यावरून आवर्तनें ही अनुक्रमें अष्टमात्रक, सप्तमात्रक आणि षण्मात्रक आहेत ही गोष्ट कळते. परन्तु पुष्कळदा यति सांगितलेलेच नसतात वा भलत्याच म्हणजे अस्वाभाविक ठिकाणीं सांगितलेले असतात. उदाहरणावरून वृत्ताची मोडणी निर्णीत करू म्हटले तर एखादेच उदाहरण असायचे आणि तेहि छन्द:शास्त्रकारानें रचून घातलेले असायचे. वृत्तव्याख्या सुधारायला त्या उदाहरणाचा फारसा उपयोग होत नाही. म्हणून एखाद्या वृत्ताच्या जर अनेक मोडण्या

सम्भवत असतील तर त्या साऱ्या देण्याचा प्रयत्न मी या ग्रन्थांत केला आहे. तथापि जेथे चरणांत एखाद्या विशिष्ट गणाची आवृत्ति आहे तेथे, जेणें करून ती आवृत्ति भङ्गेल अशी मोडणी घेणें उचित नाही.

चारी चरण भिन्न भिन्न लक्षणांनी युक्त असल्यास त्या वृत्तास **विषम वृत्त** म्हणतात. संस्कृतांत अनेक विषम वृत्तें सांगितलीं आहेत. त्यांपैकी एकाच विषम वृत्ताचा उपयोग सलग दीर्घ रचनेंत केलेला आढळतो. सौन्दरनन्द ३ रा, किरात १२ वा आणि शिशु १५ वा हे सर्ग उद्गता नामक विषमवृत्तांत आहेत. या वृत्ताचें लक्षण उत्पल ( वबृ १०३/४८) या श्लोकावरील टीकेंत

"प्रथमे सजौ यदि सलौच
नसजगुरुकाण्यनन्तरम
यद्यथ भनजलगा: स्युरथो
सजसा जगौच भवतीयमुद्गता"

असें देतो. उद्गताचें पुढील उदाहरण मराठींत अपवादरूपच असेल.

"बहु भागला दितिसुतांसि
अतुल समरा करूनिया
राम तृषित बहु होऊनिया
रमला प्रियाननसुधानिषेवणीं". ( साव ९/५६)

सौन्दरनन्द काव्यांत ( २।६४-६५) हे दोन श्लोक उपस्थितप्रचुपित नामक विषमवृत्ताचे आढळतात.

"हुडकिती सगर ते चहूकडे
हय त्यांसी परि कुठे न सापडे;
हुडकुनी हरितां मग चारही
करिती साठ हजार विचारही". (नग ७३)

या चतुष्पदींत चारी चरण लगक्रमदृष्ट्या भिन्न भिन्न आहेत; पण एवढ्याने हे विषमवृत्त होत नाही. लगक्रमदृष्ट्या भिन्न असणारे चारी चरण जेव्हा अनेक श्लोकांत अनुक्रमें सारखे येतात; तेव्हा ते श्लोक एका विशिष्ट विषमवृत्ताच्या साच्याचे ठरतात.

**चूलिका** ( पि ४।५२ ) [ २७ ल । १ ग ॥ २९ ल । १ ग ] ही द्विपदी आहे. पहिल्या चरणांत सत्तावीस २७ लघू आणि मग एक १ गुरु अशीं अक्षरें असतात; दुसऱ्या चरणांत एकोणतीस २९ लघू आणि मग १ गुरु अशी अक्षरें असतात. चूलिकेची मोडणी जर पद्यावर्तनी असली तर सोळा लघु अक्षरांनन्तर यति येतोच. पण हा यति सांगितलेला मात्र नाही. तेथेच चरण तोडून द्विपदीची चतुष्पदी केल्यास या प्रकारास विषम वृत्तांत ढकलितां येईल. पहिला नि तिसरा चरण हे मात्र सोळा सोळा लघु अक्षरांचे असल्याने एकसारखे होतात. हीच स्थिति शिखा (के २/३९), आणि खज्जा (के २/४०) या दोन प्रकारांची आहे. **शिखा** [ २८ ल । १ ग ॥ ३० ल । १ ग

] या प्रकाराचा व्यत्यय म्हणजे **खज्जा** [ ३० ल । १ ग ‖ २८ ल । १ ग ] हा प्रकार होय. परन्तु पिङ्गल, स्वयम्भू आणि हेमचन्द्र यांच्या मते शिखा आणि खज्जा हे प्रकार पादचतुष्टयघटित आहेत. प्राकृत पैङ्गलाच्या मते शिखाच्या १ ल्या चरणांत पंचवीस २५ लघू असून मग ( - ˜ ) हा गण असतो; आणि दुसऱ्या चरणांत एकोणतीस २९ लघू असून मग ( - ˜ ) हा गण असतो. खज्जामध्ये दोन्ही चरणांत छत्तीस ३६ लघू असून मग रगण असतो. (प्रापै १/१६१, १५८).

चूलिकेचा जो दुसरा प्रकार हलायुध सांगतो त्यालाच केदारभट्ट **अतिरुचिरा** (के २।४२) म्हणतो. या प्रकारांत [२७ ल । १ ग ] दोन्ही चरण सारखे असून ते सत्तावीस लघु आणि एक गुरु मिळून झालेले असतात. सोळा लघूनन्तर चरण तोडून या द्विपदीची जर चतुष्पदी केली तर ते अर्धसम वृत्त होईल.

ज्या पद्यांत विषम वा ओज वा अयुक म्हणजे पहिला नि तिसरा हे चरण सारखे असतात; आणि सम वा अनोज वा युक म्हणजे दुसरा नि चौथा हे चरण सारखे असतात ते **अर्धसम वृत्त** होय. समवृत्तांच्या सङ्ख्येच्या मानाने अर्धसम वृत्तें अगदीच अल्पसङ्ख्य आहेत.

अर्धसम वृत्ताचा आणखी एक प्रकार आढळतो; पण त्या प्रकाराचें पृथक विवेचन कोणी केलेले नाही. या प्रकारांत चतुष्पदीचे पहिले दोन चरण सारखे एका लगावलीचे असतात; आणि शेवटील दोन चरण सारखे, पण भिन्न लगावलीचे असतात. या प्रकारच्या मिश्रणाचे स्फुट श्लोक आढळतात, ते पुढे वृत्तविहारांत दिले आहेत. परन्तु एकासारखे अनेक श्लोक आढळल्याविना त्या प्रकाराला पृथक स्थान प्राप्त होऊ शकत नाही. अचलधृति आणि विद्युन्माला यांच्या अशा मिश्रणाने होणाऱ्या प्रकारांचा (पि ४/५०-५१, मागे पृष्ठ २३ पहा) पिङ्गल उल्लेख करितो; परन्तु हलायुधाने दिलेल्या उदाहरणाव्यतिरिक्त इतरत्र तशी रचना संस्कृतांत मला आढळली नाही. मराठींत मात्र मोरोपन्ताने आपले सौम्य रामायण (मोसग्र ८/१३८) हे सौम्या नामक अर्धसम वृत्तांत रचिलें आहे. चतुष्पदीचा पूर्वार्ध विद्युन्माला आणि उत्तरार्ध अचलधृति असल्यास त्या अर्धसम वृत्ताला सौम्या (पि ४/५१) वा **अनङ्गक्रीडा** (के २/४१) म्हणतात.

चारी चरण एकसारखे असले म्हणजे त्या वृत्ताला समवृत्त म्हणतात.

समवृत्तांचे वर्गीकरण चरणाक्षरसङ्ख्येप्रमाणे करण्याचा आम्नाय आहे. एका चरणांत जितकी अक्षरें असतात तितक्या अक्षरांचे ते वृत्त मानण्यांत येतें.

एकाक्षरी वृत्तापासून सव्वीस-अक्षरी वृत्तापर्यन्त अनुक्रमे (१) **उक्ता**, (२) **अत्युक्ता**, (३) **मध्या**, (४) **प्रतिष्ठा**, (५) **सुप्रतिष्ठा**, (६) **गायत्री**, (७) **उष्णिह**, (८) **अनुष्टुभ**, (९) **बृहती**, (१०) **पङिक्त**, (११) **त्रिष्टुक**, (१२) **जगती**, (१३) **अतिजगती**, (१४) **शक्करी**, (१५) **अतिशक्करी**, (१६) **अष्टि**, (१७) **अत्यष्टि**, (१८) **धृति**, (१९) **अतिधृति**, (२०) **कृति**, (२१) **प्रकृति**, (२२) **आकृति**, (२३) **विकृति**, (२४) **सङ्कृति**, (२५) **अभिकृति**, आणि (२६) **उत्कृति** या नावाचे वर्ग कल्पिण्यांत आले आहेत. ज्या वृत्तांच्या चरणांत सव्वीसाहून अधिक अक्षरें आहेत त्यांना दण्डक वा मालावृत्त[२] (२ मालावृत्त (भ

१५।४७). म्हणतात. दण्डकांत एका विशिष्ट गणाची सारखी आवृत्ति असते तशी माला वृत्तांत नसते.

वृत्त फारच आखूड असल्यास अर्थप्रतिपादनाची अडचण होते; आणि म्हणूनच प्रीति, विदग्धक, हारीत, तनुमध्या, कुमारललिता, आनन्द, हंसमाला इत्यादि वृत्तांच्या द्विरावृत्तीने अनुक्रमे पद्यिनी, मरालिका, स्वानन्दसम्राट, मणिमाला, राजरमणीय, आनन्दकन्द, दया इत्यादि नवीन वृत्तें साधण्यांत आलीं असतील. सहासात-अक्षरी वृत्तांविषयी क्षेमेन्द्र मार्मिकपणाने म्हणतो,
"न षटसप्ताक्षरे वृत्ते विश्राम्यति सरस्वती
भृङ्गीव मल्लिकाबालकलिकाकोटिसङ्कटे" (क्षे २।२)

वृत्त अतिशय दीर्घ असल्यास कवि आणि वाचक दोघांचाहि उर भरून यावयाचा! पद्यपाटव दाखवून वाचकांना चकित करून टाकण्यासाठी अतिऱ्हस्व वा अतिदीर्घ वृत्तांत जरी रचना करून दाखविण्यांत आली असली तरी अशीं क्लिष्टवृत्तें हीं रमणीययार्थाच्या स्वाभाविक प्रतिपादनाला निरुपयोगीच होत. भास, वराहमिहिर, वाग्भट, भवभूति इत्यादिकांच्या कृतींत दण्डकरचना आढळते यावरून दण्ड्काचें प्राचीन महत्त्व दिसून येतें. वराहमिहिराच्या एका दण्डकाच्या (वबृ १०३।६1) प्रत्येक चरणांत १०२ अक्षरें आहेत. सिद्धर्षिकृत उपमितिभवप्रपंचाकथामध्ये दण्डकाच्या चतुष्पद्या नाहीत; तर एकएक दोनदोन स्फुट चरण आहेत. या ग्रन्थाच्या ५ व्या प्रस्तावांतील (पृ ८४१ वरील) 'विलसतभटकोटि' या दण्डकचरणांत एकशें अठ्ठयाण्णव अक्षरें आहेत! तथापि येथूनहि सीमा फारच दूर आहे. वृत्तरत्नाचा टीकाकार नारायण भट्ट पुढील पद्य उद्धृत करितो,-

"एकोनसहस्त्राक्षरपर्यन्ता दण्डकाड्प्रय: प्रोक्ता:
वर्णत्रिकगणवृद्ध्या नद्वितया द्या महामतिभि:" (के. पृ. १०६)

या ग्रन्थांत वृत्तविस्तार देतांना वृत्तें चरणाक्षरसङ्ख्येप्रमाणे सांगण्याची प्राचीन पद्धति स्वीकारलेली नाही. अर्थातच दण्डकाच्या विवेचनासाठी पृथक प्रकरण दिलेले नाही. एका वृत्ताचा दुसऱ्या वृत्ताशी सम्बन्ध काय तो ध्यानांत यावा म्हणून वृत्तानुक्रम हा लगक्रमसाम्य आणि मोडणीचें साम्य यांच्या अनुरोधाने ठरविला आहे. छन्द:साम्य हे चरणान्तापासून[१] (१ रणपिङ्गलांत प्राचीन वर्गपद्धति आहे; पण एका वर्गांतील वृत्तांचा अनुक्रम ठरवितांना त्रिकगणसाम्य हे चरणान्ताकडून चरणारम्भाकडे पहाण्यांत आले आहे.) चरणारम्भाकडे पहात अनुक्रम ठरविला आहे.

सङ्ख्याक्रमभेदाने वृत्तप्रकार किती होऊ शकतील हा वस्तुत: गणिताचा प्रश्न आहे; परन्तु: या प्रस्तारप्रकरणाने छन्द:शास्त्राच्या क्षेत्रांत निष्कारण पाय पसरले आहेत. एकाक्षरी रचनेपासून सव्वीसअक्षरी रचनेपर्यंतच शक्य वृत्तप्रकारांची एकन्दर सङ्ख्या गणिताने $२^{२५}$-२ म्हणजे ३३,५४,४३० इतकी होते! परन्तु एकन्दर उपलब्ध वृत्तांची सङ्ख्या सहस्त्रावर जात नाही. वृत्तांत ते वृत्त व्हायला काहीतरी आन्दोलनमाधुरी पाहिजे. छन्द म्हणजे काही लघुगुरुंचा प्रस्तारखेळ नव्हे.

ज्या वृत्तांतील आन्दोलन अक्षररचनेकरून सहज प्रतीत होत नाही, ज्यांना तालांत बसवायला थोडे फार परिश्रम पडतात, परन्तु ज्यांपैकी अनेक वृत्तांच्या चाली परम्परया चालत आल्याकारणाने सुकर वाटतात अशा वृत्तांना **अनावर्तनी** म्हटले आहे. त्यांचे विवेचन आवर्तनी वृत्तांच्या आधी केले आहे. कित्येकवृत्तें अशी आहेत की ती सहज (क्वचित एखादें दुसरें अक्षर प्लुत उच्चारून) आवर्तनी होऊ शकतात; परन्तु त्यांच्या परम्पराप्राप्त चाली पहातां ती अनावर्तनी वाटतात त्यांचे विवेचन आधी अनावर्तनी वृत्तांच्या वर्गात केले असून पुढे आवर्तनी वृत्तांच्या वर्गांत त्यांचा पुन्हा उल्लेख केला आहे. उदाहरणार्थ, रथोद्धता नि स्वागता यांची रूढ मोडणी अनुक्रमें [ - ˜ - ˜ ˜ ˜ - । ˜ - ˜ - ] आणि [ - ˜ - ˜ ˜ ˜ - । ˜ ˜ - - ] अशी आहे, म्हणून त्यांचे विवेचन अनावर्तनी वृत्तांत केले आहे. परन्तु त्यांची मोडणी अनुक्रमे [ - ˜ - ˜ ˜ ˜ । - ˜ - ˜ - ] आणि [ - ˜ - ˜ ˜ ˜ । - ˜ ˜ - - ] अशी घेतल्यास ती पद्यावर्तनी होतात म्हणून त्यांचा उल्लेख विद्युन्माला वर्गातहि पुन्हा केला आहे. मोडणी भिन्न झाली की ते वृत्त वस्तुत: भिन्न झाले, त्याला भिन्नच नाव पाहिजे. उदाहरणार्थ, पृथ्वीवृत्तांतील लगावलीची मोडणी जर [ । ˜ - ˜ ˜ ˜ - ! ˜ - ˜ ˜ ˜ - । ˜ - - ˜ - ] अशी धरिली तर ते वृत्त निराळेंच होईल. सुदैवाने पृथ्वीवृत्ताला विलम्बितगति असे दुसरे नाव असल्याने ते या दुसऱ्या मोडणीच्या वृत्ताला निश्चित करितां येतें. पण जेथे वृत्ताचें नाव एकच आहे पण त्या लगावलीची मोडणी विविध होऊ शकते तेथे निरनिराळीं नावे असणे इष्ट असले तरी त्या भिन्न भिन्न मोडणीच्या वृत्तांत यापुढे सहेतुकपणें रचना होण्याचा सम्भव अत्यल्प असल्याने सध्या तरी नवीन नावें निर्माण करून वृत्तनाममाला लाम्बविण्याचें काही प्रयोजन नाही.

पद्यावर्तनी, अग्न्यावर्तनी, भृङ्गावर्तनी आणि हरावर्तनी वृत्तांचा विचार अनुक्रमें अनावर्तनी वृत्तांच्या नन्तर केला आहे. चतुर्मात्रक आवर्तनांची वृत्तें असूच शकत नाहीत असे नाही; परन्तु चतुर्मात्रक आवर्तनांची वृत्तें सारीच अष्टमात्रक आवर्तनांत बसतात. उलटपक्षी आवर्तनान्ती पदसमाप्ति झाली नाही तरी अक्षरसमाप्ति तरी झालीच पाहिजे असे असल्याने अष्टमात्रक आवर्तनाचें वृत्त चतुर्मात्रक आवर्तनांत बसेलच असे नाही. उदाहरणार्थ, ( ˜ - - ˜ - ) ( - ˜ - ˜ - ) या अष्टमात्रक गणांचे चारचार मात्रांचे दोन दोन तुकडे पडू शकत नाहीत. यासाठी चतुर्मात्रक आवर्तनांच्या वृत्तांचा समावेश पद्यावर्तनी वृत्तांत करणेंच सोयीचें आहे.

आवर्तनी वृत्तांत पद्यावर्तनी वृत्तांची सङ्ख्या सर्वांत मोठी आणि अग्न्यावर्तनी वृत्तांची सङ्ख्या सर्वांत लहान आहे. अनावर्तनी वृत्तांच्या मानाने आवर्तनी वृत्तांची सङ्ख्या जवळ जवळ औटपट आहे. परन्तु आवर्तनी वृत्तांची सङ्ख्या कितीहि मोठी असली तरी ती बहुतेक जातिरचनेत लय पावली आहेत. एकट्या पादाकुलकजातींत पाऊणशेहून अधिक वृत्ते लय पावतात. जातिरचना ही सुकर असून तिच्यांत स्वाभाविकपणेंच विविधतेला पुष्कळ वाव मिळतो.

वृत्ते अनावर्तनी असोत वा आवर्तनी असोत, कवींना जी वृत्तें सलग नि दीर्घ रचनेला अनुकूल अशी वाटली आणि जी त्यामुळे रूढ झालीं अशा वृत्तांची सङ्ख्या चाळीसाच्या वर जात

नाही.

अनावर्तनी वृत्तांपैकी इन्द्रवज्रा, उपेन्द्रवज्रा, इन्द्रवंशा, वंशस्थ, रुचिरा, प्रहर्षिणी, रथोद्धता, स्वागता, प्रमिताक्षरा, द्रुतविलम्बित, वसन्ततिलका, शालिनी, मालिनी, मन्दाक्रान्ता, स्त्रग्धरा, शार्दूलविक्रीडित, हरिणी, शिखारिणी, सुवदना आणि पृथ्वी ही वृत्तें विशेष रूढ दिसतात. या वीस वृत्तांपैकी इन्द्रवंशा हे वृत्त संस्कृतांत वैरल्याने आढळते. रुचिरा, प्रहर्षिणी, प्रमिताक्षरा नि सुवदना ही वृत्तें उत्तरोत्तर दुर्मिळ होत आली आहेत.

पद्यावर्तनी वृत्तांपैकी तोटक, विद्यन्माला, दोधक, जलोद्धगति, जलधरमाला, मत्तमयूर, मदिरा, हंसगति आणि हेमकला ही नऊ वृत्तें रूढ दिसतात. अग्न्यावर्तनी वृत्तांपैकी विबुधाप्रिया आणि सुरनिम्नगा ही रूढ दिसतात. भृङगावर्तनी वृत्तांत प्रमाणिका हे फार प्राचीन काळापासून रूढ दिसते. कलिन्दनन्दिनी आणि देवराज ही उशीराने रूढ झाली आहेत; पण यांच्या मिश्रणामुळे होणारी शिथिल रचना ललितविस्तरांत आढळते. हरावर्तनी वृत्तांपैकी भुजङ्गप्रयात आणि स्त्रग्विणी ही प्राचीन दिसतात; मन्दारमाला आणि अमृतध्वनि ही उशीराने रूढ झाली आहेत.

अर्धसमवृत्तांपैकी संस्कृतांत अपरवक्त्र, पुष्पिताग्रा, वियोगिनी आणि मालभारिणी ही चारच रूढ दिसतात. मराठींत वियोगिनी आणि मालभारिणी ही दोनच विशेष परिचित आहेत.

अश्वघोष आणि भास यांच्या काळींच ज्याचें स्वरूप निश्चित झाले होतें अशी ही अनावर्तनी वृत्तें मूळ कशी उत्पन्न झालीं असतील? छन्द:शास्त्र उत्पन्न होण्यापूर्वी कवींनी जी रचना मनोगत आन्दोलनानुसार केली असेल ती अपरिहार्यपणें शिथिल झाली असलीच पाहिजे. अशी शिथिल रचना ललितविस्तरांत विपुल पहायला मिळते. अशा शिथिल रचनेंतूनच पृथक्करण, तुलना नि वर्गीकरण यांच्या साह्याने निश्चित स्वरूपाची पद्यरचना निघते. पिङ्गलभरतादि प्राचीन छन्द:शास्त्रकारांनी ज्या सामग्रीवरून हे शास्त्र रचिलें ती साम्रगी त्यांनी आपल्या ग्रन्थांत जतन करून न ठेविल्यामुळे वृत्तोत्पत्तीचा अत्यन्त कुतूहलजनक प्रश्न हा तितकाच कूट होऊन बसला आहे. इन्द्रवज्रा, उपेन्द्रवज्रा, शालिनी, वातोर्मि, वंशस्थ, रुचिरा इत्यादि वृत्तें प्राचीन त्रिष्टुभजगतींपासून निघालीं हे उघड आहे. परन्तु वसन्ततिलका, मन्दाक्रान्ता, शार्दूलविक्रीडित, हरिणी, शिखरिणी, पृथ्वी ही कशी कशी परिणत होत आलीं याविषयी अटकळ करायलाहि आता काही मार्ग नाही.

आवर्तनी वृत्तें  ही प्राकृत गेय जातिरचनेपासून नियमित करण्यांत आली असावींत. गेय जातिरचना ही आन्दोलन मनांत मुरल्यावर जितकी सुकर असते तितकीच, तिचे नियमन ओळखून ते दृग्गोचरकरून द्यायला कठिण असते. जातिरचना करायला कवि थोडा श्रुतिसिद्ध असावा लागतो. उलटपक्षीं वृत्त हे रचायला कठिण असले तरी अक्षरांची सङ्ख्या आणि लगक्रम यांनी बद्ध असलेले त्याचें स्वरूप सहज आणि स्पष्टपणें ध्यानांत राहतें. अक्षरसङ्ख्या नि लगक्रम यांच्या दृष्टीने जातिरचनेकडे पाहिले तर कोणतेच दोन चरण एकसारखे दिसत नाहीत; त्यांतील साम्य सूक्ष्म असते; चरणांचे काही विभाग मात्र अनिच्छया एकसारखे येऊ शकतात. हे पाहून,

जातीचे मूळ स्वरूप ध्यानांत न आल्यामुळेच की काय, ज्यांत चरणाचा काही भाग अचल आणि काही भाग चल असतो असा पद्यप्रकार छन्द:शास्त्रकारांनी कल्पिला असावा. वैतालीय, औपच्छन्दसिक, गीति, आणि आर्यगीति ही रचना या प्रकारांतील आहे.

अशा गेय जातिरचनेंत जेथे अहेतुकपणें चारी चरण लगक्रमदृष्ट्या सारखे आले असतील तेथे छन्द:शास्त्रकारांनी स्वाभाविकपणेंच स्वतन्त्र वृत्त कल्पिलें असेल. परन्तु एका चरणासारखे चार चरण लगक्रमदृष्ट्या असावेत या हेतूने केव्हा केव्हा कवींनी तर केव्हा केव्हा छन्द:शास्त्रकारांनी भिन्न भिन्न वृत्तें सिद्ध करण्याचा प्रयत्न बुद्धयाहि केला असेल. छन्द:शास्त्रकारांनी दिलेल्या उदाहरण्यांव्यतिरिक्त स्वतन्त्र काव्यरचनेंत फारच थोड्या आवर्तनी वृत्तांची उदाहरणें आढळतात. उलटपक्षी वाङ:मयांत वृत्तस्वरूप चतुष्पद्या आढळतात त्यांची वार्ताहि छन्द:शास्त्रकारांना लागलेली दिसत नाही.

रूढ झालेल्या वृत्तांपासून नवी वृत्तें पुढील प्रकारांनी निर्माण करण्यांत आलेली दिसतात.

(१) चरणारभ्भींच्या गुरूच्या ठिकाणीं दोन लघू घालून इन्द्रवंशा, रथोद्धता, स्वागता, वसन्ततिलका, शार्दूलविक्रीडित आणि स्त्रग्धरा या वृत्तांपासून अनुक्रमे, केकिरव, प्रियंवदा, द्रुतपदा, ऋषभ, मत्तेभविक्रीडित आणि महास्त्रग्धरा ही वृत्तें सिद्ध झालीं आहेत.

प्रथमाक्षराप्रमाणेच इतरत्रहि एका गुरूच्या ठिकाणीं दोन लघू घालून उपेन्द्रवज्रा, इन्द्रवंशा, वंशस्थ, शार्दूलविक्रीडित आणि स्वागता या वृत्तांपासून अनुक्रमे कोल, लक्ष्मी, सद्रत्नमाला आणि चन्द्रवर्त्म ही वृत्ते सिद्ध झाली आहेत.

(२) उलटपक्षी, प्रमिताक्षरा नि द्रुतविलम्बित यांच्या आरभ्भीचे दोन लघू, आणि शिखरिणींतील उपान्त्य दोन लघू, यांच्या ठिकाणीं एकएक गुरु घालून अनुक्रमें उत्थापनी, अच्युत आणि प्रवरललिता ही वृत्तें सिद्ध झाली आहेत.

(३) इद्रवज्रा, उपेन्द्रवज्रा, स्वागता, कनकप्रभा, आणि वसन्ततिलका यांच्या अन्त्याक्षरापूर्वी एक लघु वाढविल्याने अनुक्रमें इन्द्रवंशा, वंशस्थ, यूथिका, कमलिनी आणि मृदङ्ग ही वृत्तें सिद्ध होतात.

(४) रथोद्धता, स्वागता नि प्रमिताक्षरा यांच्या आरभ्भीं दोन लघु वाढविल्याने अनुक्रमें कनकप्रभा, कुटजा नि प्रमदा ही वृत्तें सिद्ध होतात.

(५) रथोद्धता, शालिनी नि यूथिका यांच्या आरभ्भीं एक गुरु वाढविल्याने अनुक्रमें ललिता, वैश्वदेवी नि अभ्रक ही वृत्तें सिद्ध होतात.

(६) रुचिरा, पृथ्वी नि कुटिलगति यांच्या अन्तीं एक गुरू वाढविल्याने अनुक्रमें रुक्मिणी, रतिलीला, नि नन्दीमुखी ही वृत्तें होतात.

(७) प्रियंवदा, द्रुतपदा, स्वागता, मङ्गला या वृत्तांत पाचवे अक्षर लघु आहे ते गाळल्याने अनुक्रमें 'अभीष्ट,' 'लडका,' मणिराग, "प्रगुणीकृता" ही वृत्तें सिद्ध होतात.

(८) कित्येक वृत्तें इतर वृत्तांचे विभाग जोडून सिद्ध होतात. ( - - - - ) वा ( - - - - - )

आणि ( ~ ~ ~ ~ ~ -) वा ( ~ ~ ~ ~ ~ - ~ ) यांच्या जोडणीने आणि केव्हा केव्हा या जोडणीला ( - ~ - - ~ - - ), ( ~ - ~ ~ - ~ - ) आणि ( - - ~ - - ~ - ) यांच्यापैकी एखादा गण शेवटी जोडून कितीतरी वृत्तें झाली आहेत!

(९) काही वृत्तें म्हणजे सुप्रसिद्ध वृत्तांचे विभागच होत. हंसी [ - - - - । ~ ~ ~ ~ - ] हे वृत्त मन्दाक्रान्ताचे पहिले दोन विभाग मिळून होतें. इन्द्रवज्रा, इन्द्रवंशा, पृथ्वी आणि सुवदना यांचे अन्त्य विभाग म्हणजे अनुक्रमे विमला ( ~ ~ - ~ - - ), "निर्मला" ( ~ ~ - ~ - ~ - ), कुसुमिता ( ~ ~ ~ - ~ - - ~ - ) आणि वसुमती ( - - ~ ~ ~ - ) ही वृत्तें होत. द्रुतविलम्बित, मालिनी आणि शिखरिणी यांचे आद्य विभाग म्हणजेच अनुक्रमें मधुमती ( ~ ~ ~ - ~ ~ -), रतिमाला ( ~ ~ ~ ~ ~ ~ - - ) आणि शिखण्डिनी ( ~ - - - - - ) ही वृत्ते होत.

(१०) कित्येकदा एखाद्या सुप्रसिद्ध वृत्ताला एखाद्या गणाची जोड देऊन नवीन वृत्त सिद्ध करण्यांत येतें. कनकप्रभा आणि विदग्धक यांच्या जोडणीने बुद्बुवृत्त होतें. मत्ताक्रीडा वृत्ताला ( ~ - ~ ~ - ~ - ) हा गण जोडून पिपीलिका वृत्त सिद्ध होते. शार्दूलविक्रीडिताला ( ~ ~ - ~ - ) हा गण जोडल्याने विभ्रमगति हे वृत्त होते. पृथ्वी वृत्ताला ( - ~ - - ~ - ) हा गण जोडल्याने वृन्दारक वृत्त होते; आणि ( - - - - ~ - - ) या गणाला मालती वृत्त जोडल्याने माधवीलता वृत्त होतें.

(११) मणिमाला, राजरमणीय, मरालिका इत्यादि वृत्तें अनुक्रमें तनुमध्या, कुमारललिता, विदग्धक इत्यादि ऱ्हस्व वृत्तांच्या द्विरावृत्तीने सिद्ध झाली आहेत.

(१२) काही ठिकाणीं प्राचीन वृत्तरचनेंत झालेल्या चुका न उमगल्यामुळेच नवीन वृत्ते कल्पिण्यांत येऊन मग त्यांच्यासाठी सूत्रें रचण्यांत आली असावीत असे वाटते. द्रुतपदा [ ~ ~ ~ - ~ ~ ~ - । ~ ~ - - ] या वृत्ताचे लक्षण "द्रुतपदं भवति नभनयाश्चेत" [ ~ ~ ~ - ~ ~ ~ ~ । ~ ~ - - ] असेहि आढळते, वा महास्त्रग्धरा [ ~ ~ - - - ~ - - । ~ ~ ~ ~ ~ ~ - । - - - ~ - - ] या वृत्ताचे लक्षण "सजता नसौ ररौ ग: फणितुरगहयै: स्यान्महास्त्रग्धराख्या" (गछ २।२१६) असेहि आढळते, वा वातोर्मीचें लक्षण [ - - - - ~ ~ - ~ - - ] असेहि हेमचन्द्र (२।१३७) सांगतो, वा पणवाचें लक्षण म्नौ य्गौ असे न सांगता केदारभट्ट "म्नौ ज्गौचेति पणवनामकम" ( - - - ~ ~ । ~ ~ - ~ - ) असे सांगतो या मतभेदाच्या बुडाशी मूळची चुकी उमगली नाही हेच कारण असावे. असले मतभेद पुढे वृत्तांवरील टीपांत उल्लेखिले आहेत.

वृत्तनामाचा प्रश्न फारच घोटाळ्याचा आणि बिकट झाला आहे. छन्दस आणि वृत्त हे शब्द नपुंसकलिंगी असले तरी त्यांची नावे बहुतेक स्त्रीलिंगी आहेत. प्राय: ही नावें त्या वृत्ताच्या रचनेंत गोवितां येतील अशीच असतात. 'चन्द्रावर्ता' सारखे त्या वृत्ताच्या रचनेंत न बसण्याजोगें नाव क्वचितच आढळते. णराच, मालत्ती इत्यादि प्राकृत नावे वृत्तांत बसली तरी त्यांची संस्कृत रूपे त्या वृत्तांत बसत नाहीत; आणि स्वयभ्भूच्छन्द, कविदर्पण आणि प्राकृत पैङ्गल हे तीन ग्रन्थ वगळल्यास वृत्तांची नावे संस्कृत रूपांतच देण्याचा आम्नाय आहे. तेव्हा संस्कृत नाव जर वृत्तांत

बसत नसले तर त्यात थोडा फार फेरफार करणे अवश्य होते. प्रमाणी, समानी, श्येनी आणि हंसी यांची अनुक्रमे प्रमाणिका, समानिका, श्येनिका आणि हंसिका अशी रूपें करण्यात येतात. याच कारणासाठी उदाहरणांत 'यवमती'च्या ठिकाणी 'यवान्विता' म्हणून 'छन्दोवशाच्च यवान्वितामित्युक्तम' असे समर्थन हेमचन्द्र ( हे ३।८ ) करितो. याच कारणासाठी चन्द्रावर्ता आणि माला या वृत्तांत न बसणाऱ्या नावाच्या ठिकाणी शशिकला आणि स्त्रक ही नावे देण्यांत आली असावीत.

पुष्कळ नावे म्हणजे कान्तेचे वर्णन करणारी विशेषणें आहेत. काही पशुपक्ष्यांच्या स्वरावरून, गतीवरून या क्रीडितावरून पडली आहेत. काही सामासिक नामांच्या शेवटीं-आवली,-माला अशी पदे आहेत.

ही नावे अस्तित्वांत कशी आली?

जो एखादा श्लोक सुपरिचित असेल त्यांतीलच एखाद्या संस्मरणीय ललित शब्दाने ( बहुश: आद्य वा अन्त्य शब्दाने ) तो वृत्तप्रकार निर्देशिला जावा आणि सूचित व्हावा हे स्वाभाविक आहे. एकाच वृत्ताला कित्येकदा अनेक नावे आढळतात याचे एक कारण, त्या वृत्ताचे भिन्न भिन्न सुपरिचित श्लोक छन्द:शास्त्रकारांच्या डोळ्यापुढे असतील हे असू शकेल.

"कुटजानि वीक्ष्य शिखिभि: शिखरीन्द्रं
समयावनौ घनमदभ्रमराणि
गगनंच गीतनिनदस्य गिरोच्चै:
समया वनौघनमद**भ्रमराणि**" (शिशु ६/७३)

या वृत्ताला हेमचन्द्र कुटज म्हणतो आणि पुढे ' भ्रमर इत्यन्य:' असे सांगतो; दोन्ही नावे या श्लोकाच्या आद्यन्तीं आहेत. याचप्रमाणे अतिशायिनीचे म्हणून दिलेल्या उदाहरणांत ( शिशु ८/७१ ) अतिशायिनी आणि यादवी या दोन्ही नावाचा उगम आहे. हंसश्येनी हे नाव ( किरात ५/३१ ) या श्लोकावरून घेतले आहे हे उघड आहे. विस्मिता आणि धृतश्री ही नावे अनुक्रमे ( शिशु २०/७१ ) आणि ( शिशु ३/८२ ) या श्लोकावरून घेतली आहेत. ज्या वृत्ताला पिङ्गल वातोर्मि म्हणतो आणि वराहमिहिर उर्मिमाला म्हणतो त्या वृत्ताचें उदाहरण म्हणून जो श्लोक हलायुध उद्धृत करितो त्याच्या शेवटच्या म्हणजे ' त्याज्या सा स्त्री द्रुतवातोर्मिमाला ' या चरणाच्या अन्तीं दोन्ही नावे आढळतात. हलायुधाने भद्रकाचे म्हणून जे उदाहरण दिले आहे त्याच्या आरम्भीं ' मद्रकगीतिभि: असे आहे; तेव्हा भरत आणि हेमचन्द्र या वृत्ताला मद्रक का म्हणतात हे चटकन ध्यानांत येतें. तथापि वृत्तांची निर्विवादपणे प्राचीनतम अशी उदाहरणें उपलब्ध झाल्याविना या प्रकरणी निश्चित असे काही सांगता येणार नाही. भरताने सांगितलेल्या शरभललिता वृत्ताचें उदाहरण सौन्दरनन्दाबाहेर आढळत नाही; आणि सौन्दरनन्दांतील उदाहरणांत शरभललित हा शब्द

नाही त्याअर्थी सुप्रसिद्ध वृत्तांची नावे ज्या श्लोकांवरून आली असतील ते श्लोक अश्वघोषच्याहि पूर्वी स्फुट स्वरूपांत सुपरिचित असले पाहिजेत. सुप्रसिद्ध वृत्तांत थोडी फिरवाफिरव करून जी नवीन वृत्तें प्रयोग म्हणून कवीनी वा छन्द:शास्त्रकारांनी साधिलीं असतील त्यांना मात्र त्यांनी स्वत:ची नावे दिली असण्याचा सम्भव आहे.

वृत्तांच्या नावांत अनन्वित गोन्धळ माजलेला आहे. काही वृत्तांना एकाहून अधिक नावें आहेत; तर काही नावें एकाहून अधिक वृत्तांना दिलेली आढळतात. शशिवदना या वृत्ताला सिद्धक, सिद्धि, सरसी, चित्रलता, रुचिरा, धृतश्री, पञ्चकावली अशी आणखी सात नावे आहेत! कनकप्रभा वृत्ताला जया, नन्दिनी, प्रबोधिता, मञ्जुभाषिणी, मनोवती आणि सुमंगली अशी आणखी सहा नावे आहेत. कुड्मलदन्ती या वृत्ताला श्री, रुचिरा, मौक्तिकमाला, अनुकूला आणि सान्द्रपद अशी आणखी पाच नावे आहेत. उलटपक्षी चन्द्रलेखा हे नाव सहा वृत्तांना दिलेले आढळते. रुचिरा, पञ्चचामर ही नावेहि अशी सहा भिन्न भिन्न वृत्तांना दिलेलीं दिसतील. चित्रलेखा हे नाव पाच वृत्तांना आहे. ललिता हे नाव चार वृत्तांना आहे; आणि एकच नाव दोन तीन निरनिराळ्या वृत्तांना आहे अशी उदाहरणें कितीतरी सापडतील! काही नावांत अन्तर अत्यल्प आहे. मत्ताक्रीडा-मत्तक्रीडा, सुभद्र-सुभद्रा, उपस्थित-उपस्थिता, कमल-कमला, ललित-ललिता, वृत्त-वृत्ता यांचा घोटाळा सहज होऊं शकेल.

ज्या नावाचे दोन दोन पारिभाषिक अर्थ होऊ शकतात ती नावे योग्य नव्हेत. पण वृत्त हेच नाव दोन वृत्तांना दिलेले आढळते; यमक हेहि एका वृत्ताचे नाव आहे! पङिक्त; बृहती, धृति ही वर्गवाचक नावे वृत्तांनाहि दिलेली आहेत; आणि गीतिका हेहि एका वृत्ताचे नाव बनले आहे!

पूर्वी होऊन गेलेल्या छन्द:शास्त्रकाराने जर एखाद्या वृत्ताला एक नाव दिलें तर त्या वृत्ताला दुसऱ्या छन्द:शास्त्रकाराने आपले स्वत:चे म्हणून दुसरें नाव देऊ नये, सयुक्तिक कारणावाचून तरी देऊ नये. परन्तु छन्द:शास्त्रांत अगदी विरुद्ध वहिवाट दिसते. ज्या वृत्ताला काश्यपाने सिंहोन्नता हे नाव दिलें, त्याला जर सैतवाने उद्धर्षिणी म्हटलें तरी चालतें तर पिङ्गलाने आपलें वसन्ततिलका हे नाव द्यायला का भ्यावे? आणि ही परम्परा येथे तरी काय म्हणून थाम्बावी? ती थाम्बली नाहीच. ‘गार्गेण सैव गदिता मधुमाधवीति’ असा चौथा चरण प्राकृत पैङ्गलाचा टीकाकार (पृ. ४७४) छन्द:सिद्धांतभास्करांतून उद्धृत करितोच!

प्रमाणिका, विद्युन्माला, द्रुतविलम्बित, भुजङ्प्रयात, स्त्रग्विणी, मालिनी, हरिणी, मन्दाक्रान्ता, पृथ्वी आणि कुसुमितलतावेल्लिता या नावानी जी वृत्ते पिङ्लाच्या छन्द:शास्त्रांत सुप्रसिद्ध आहेत त्यांना भरताच्या नाट्यशास्त्रांत अनुक्रमे मत्तचेष्टित, विद्युल्लेखा, हरिणीप्लुता, अप्रमेया, पद्मिनी, नान्दीमुखी, वृषभललिता, श्रीधरा, विलम्बितगति आणि चित्रलेखा अशी नावे आहेत! नाट्यशास्त्र हे पिङ्लाच्या, लौकिक, वृत्तांचे विवेचन करणाऱ्या छन्द:शास्त्राहून प्राचीन असावे असे वाटते; तथापि नाट्यशास्त्राची मूळ विश्वसनीय अशी शुद्ध प्राचीन प्रत अद्यापि उपलब्ध नाही. पुन्हा, रूढ नावाचे सर्वथैव उच्चाटन करणे शक्य नाही आणि इष्टहि नाही. म्हणून

नावे निश्चित करिताना होता होईल तो प्राचीन ग्रन्थकारास मान दिला असला तरी भरताने दिलेली नावे स्वीकारण्यापेक्षा पिङ्गलाने दिलेली आणि रूढ झालेली नावेच बहुतांशी स्वीकारिलीं आहेत. परन्तु या प्रकरणीं अमुक एक पद्धत निरपवादपणे स्वीकारिली आहे असे म्हणतां येणार नाही; एका वृत्ताला अनेक नावे वा अनेक वृत्तांना एकच नाव ही दुरवस्था राहू नये एवढी काळजी घेतली आहे. वरतनु नावाचे जे वृत्त हेमचन्द्र सांगतो त्याला दुसरे नावच नाही; उलट ज्या वृत्ताला पिङ्गल वरतनु म्हणतो त्याला वराहमिहिर मालती म्हणतो, तेव्हा त्या वृत्ताला मालती हे नाव निश्चित केल्याने हेमचन्द्राने सांगितलेल्या वृत्ताला वरतनु हे नाव निश्चित करिता आले. तसेच केदारभट्टाने ज्याला मज्जुभाषिणी हे नाव देऊन ते रूढ केले त्याला पिङ्गलाचें कनकप्रभा हे नाव आहे; आणि हेमचन्द्र ज्या वृत्ताला मज्जुभाषिणी म्हणतो त्याला दुसरे नाव नाही. तेव्हा त्या वृत्ताला मज्जुभाषिणीच म्हणणे प्राप्त होते; मग केदारभट्टाच्या मज्जुभाषिणीला कनकप्रभा हे पिङ्गलोक्त नाव द्यावे लागते.

निरज्जनमाधव, विद्याधर वा. भिडे, हिन्दी छन्द:प्रभाकराचा कर्ता रायबहादुर जगन्नाथप्रसाद, रणपिङ्गलकार रणछोडराय उदयराम इत्यादि अनेक लेखक नवी नवी नावे देतात; पण आधार देत नाहीत. यांच्या काही नावाचा उपयोग वैरल्याने आणि भीतभीतच केला आहे.

जेथे निराळे नाव उपलब्ध नाही तेथे मूळ नावाच्या आरम्भी एखादे पद जोडून नावास वेगळीक आणिली आहे. मूळ नावाच्या पूर्वी कोणता शब्द जोडायचा तो हेमचन्द्रादिकांनी दिलेल्या उदाहरणांतूनच पुष्कळदा घेतला आहे. लक्ष्मी नावाची तीन वृत्ते आहेत, त्यांची नावे लक्ष्मी, राजलक्ष्मी, गृहलक्ष्मी अशी ठेवून भेद व्यक्त केला आहे. केव्हा केव्हा हा भेद 'सु' वा 'अति' हा उपसर्ग जोडून व्यक्त केला आहे. नावाचा घोटाळा टाळण्यासाठी जे नाव वा नावाचा जो भाग मी दिला आहे तो दुहेरी अवतरण चिन्हांत दिलेला आहे. अरवी, फार्सी छन्द:शास्त्रांतून जी वृत्तें इकडे येत आहेत त्यांना नावे मी दिली असून ती दुहेरी अवतरण चिन्हांत छापली असून त्यांच्यापुढे * फुली दिलेली आहे.

ज्या वृत्तांचा पत्ता छन्द:शास्त्रकारांना लागलेला नाही पण ज्यामध्ये केलेली रचना उपलब्ध आहे अशा वृत्तांना नावे त्या उदाहरणांतील शब्दांवरूनच दिली आहेत. ही नावे एकेरी अवतरण चिन्हांत आहेत; आणि मूळ आधारभूत उदाहरणें पुढे वृत्तविहारांत दिलेली आहेत.

नावे उच्चारसुलभ असावीत. कुसुमितलता-वेल्लिता, भुजङ्गविजृम्भित इत्यादि नावे फार दीर्घ आहेत. सुदैवाने अशी नावे फार नाहीत. वंश-पत्र पतित हे नाव प्राचीन कालापासून रूढ असले तरी बोजड आहे म्हणून त्याच्या ठिकाणी स्वयम्भूचे वंशदल हे आखूड आणि सुटसुटीत नाव निश्चित केले आहे.

## **अनुष्टुभ**

वृत्तविस्तार देण्यापूर्वी एका सुपरिचित परन्तु वृत्तजातिच्छन्दांपैकी कोणत्याच वर्गांत बसू न शकणाऱ्या अशा एका पद्यपकाराचा विचार केला पाहिजे. तो पद्यप्रकार म्हटला म्हणजे श्लोक वा अनुष्टुभ होय. याला छन्द म्हणतात; पण यांत लगत्वभेद आहे. याला वृत्त म्हणावे तर लगक्रम निश्चित नाही; आणि जाति म्हणावें तर काही भाग वृत्ताप्रमाणे अचल आहे, आणि उर्वरित भाग निश्चित नाही; नि मात्रांची सङ्ख्याहि नियमित नाही. वराहमिहिर श्लोकलक्षण पुढीलप्रमाणे सांगतो

"पञ्चमं लघु सर्वेषु
सप्तमं द्विचतुर्थयोः
यद्वच्छलोकाक्षरं तद्व-
ल्लघुतां याति दुःस्थितैः" (वबृ १०३|५७)

श्रुतबोधकार लक्षण सांगताना सहावे अक्षर गुरू पाहिजे ही गोष्ट अधिक सांगतो,

"श्लोके षठं गुरू ज्ञेयं
सर्वत्र लघु पञ्चमम
द्विचतुष्पादयोर्ह्रस्वं
सप्तमं दीर्घमन्ययोः" (श्रुबो १०)

चरणान्तीं यति असल्यामुळे आठवे अक्षर लघु असले तरी ते म्हणतांना गुरुच होते म्हणून आठवे अक्षर गुरु पाहिजे ही अट सांगितलेली नाही. परन्तु या दोन श्लोकांचा अर्थ एवढाच होतो की विषमचरणान्ती [ ˜ - - - ] हा अक्षरक्रम असावा आणि समचरणान्ती [ ˜ - ˜ - ] हा अक्षरक्रम असावा.

परन्तु चरणारम्भींची चार अक्षरें कशी असावीत याविषयी काहीच बोध होत नाही.

भगवद्गीतेंतील अध्याय १,५,७,१०,१२,१४ नि १६ या सात अध्यायांतील मिळून २१९ श्लोकांचे पृथक्करण करून पहातां,

(१) समचरणान्तीं ( ˜ - ˜ - ) हा गण निरपवादपणें आढळला.

(२) विषमचरणान्तीं ( ˜ - - - ) हा गण शेकडा नव्वदाहून अधिक वेळा आढळला. ४३८ विषमचरणांपैकी अन्तीं ( ˜ ˜ - - ) हा गण एकाच चरणांत, ( ˜ ˜ ˜ - ) हा १५ चरणांत, ( - - - ) हा १० चरणांत, ( - ˜ - - ) हा ७ चरणांत आणि ( - ˜ ˜ - ) हा ९ चरणांत आढळतात. म्हणजे काय, 'पञ्चमं लघु सर्वेषु' हा नियम सुद्धा विषम चरणांत निरपवाद नाही.

आरम्भीचे चतुरक्षरी गण पुढीलप्रमाणे आढळले.

विषमचरणारम्भीं समचरणारम्भीं

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | [ - - - - ] | ७७ | वेळां | ७४ | वेळां |
| २ | [ ~ - - - ] | ५० | “ | ५२ | “ |
| ३ | [ - ~ - - ] | ६० | “ | ६६ | “ |
| ४ | [ - - ~ - ] | ३९ | “ | शून्य | “ |
| ५ | [ - - - ~ ] | ३७ | “ | ५० | “ |
| ६ | [ ~ ~ - - ] | ३० | “ | ३९ | “ |
| ७ | [ - ~ ~ - ] | शून्य | “ | शून्य | “ |
| ८ | [ - - ~ ~ ] | ३१ | “ | ३७ | “ |
| ९ | [ ~ - - ~ ] | १९ | “ | ३६ | “ |
| १० | [ ~ - ~ - ] | २६ | “ | शून्य | “ |
| ११ | [ - ~ - ~ ] | २७ | “ | ४३ | “ |
| १२ | [ ~ - ~ ~ ] | १७ | “ | २४ | “ |
| १३ | [ ~ ~ - ~ ] | २५ | “ | १७ | “ |

यावरून असे म्हणता येईल की विषमचरणारंभीं कोणताहि चार-अक्षरी गण चालेल; परन्तु त्याचें दुसरे नि तिसरे अक्षर ही दोन्ही एकसमयावच्छेदें लघु नसावीत. म्हणजे विषमचरणारंभीं ( - ~ ~ -), ( - ~ ~ ~ ), ( ~ ~ ~ - ) आणि ( ~ ~ ~ ~ ) हे चार गण वर्ज्य होत.

हे चार गण समचरणारंभीहि वर्ज्यच आहेत. यांच्या भरीला ( - - ~ - ) आणि ( ~ - ~ - ) हे दोन गण विषमचरणारंभीं वर्ज्य नसून समचरणारंभीं वर्ज्य दिसतात.

अनुष्टुभांतील समचरणाची त्रिपदी पुढील पद्यांत आहे.

”द्यावया नव चालना

पाऊल पहिलें पडो

हो तूं मला अनुव्रता" (पु. मं. लाड)

परन्तु तिसऱ्या चरणाची आवृत्ति प्रत्येक त्रिपदींत असल्याने त्याला ध्रुवपदाचें स्वरूप प्राप्त होते आणि प्रत्येक कडव्यांत द्विपदीच उरते.

"बल-तेजास वाढव

दुसऱ्या शुभ पावलीं" हो तू०

अनुष्टुभ छन्दाप्रमाणेच दुसरे काही पद्यप्रकार असे आहेत की त्यांना वृत्त वा जाति यांपैकी कोणत्याच वर्गांत समाविष्ट करितां येत नाही. चरणाचा काही भाग वृत्ताप्रमाणे अचल असतो; पण उरलेला भाग पूर्णपणे जातिस्वरूप नसतो. अपरान्तिका, आपातलिका, उदीत्त्यवृत्ति, उपचित्रा, चारुहासिनी, चित्रा, प्रवृत्तक, प्राच्यवृत्ति, वानवासिका, विश्लोक इत्यादि पद्यप्रकारांपैकी काहीची उदाहरणे वृत्तस्वरूप दिसल्यामुळे त्यांचा विचार वृत्तप्रकरणीं केला आहे. या ठिकाणी वैतालीय, औपच्छन्दसिक, गीति आणि आर्यागीति यांचाच विचार कर्तव्य आहे.

**वैतालीय** [ - - - + | ~ + ~ + ]
[ - - + - | + ~ + ~ + ]

ज्या ठिकाणी शुद्ध गुरूच हवा असतो आणि दोन लघू चालत नाहीत तेथे (+) ही खूण योजिली आहे.

सूत्रकृताङ्गांत वैतालीयाचे बरेच श्लोक आहेत. त्यांतील चरणांचे पृथक्करण करितां असे दिसते की विषम चरणांचे आठ मात्रांचा आणि सहा मात्रांचा असे दोन भाग पडतात. विषम चरणान्ती ( ~ + ~ + ) हा गण आणि समचरणान्ती ( + ~ + ~ + ) हा गण हे निरपवादपणें येतात. विषमचरणांतील आद्य अष्टमात्रक गणांत ( - - - - ) हा पहिलाच प्रकार आढळतो; ( ~ - ~ - - ), ( ~ - - ~ - ), ( - ~ - ~ - ) आणि ( - - ~ - ~ ) हे प्रकार आढळत नाहीत. ते तसे आढळत नाहीत म्हणूनच पहिला गण पूर्ण जातिस्वरूप होऊ शकत नाही. विषमचरणांतील आद्यगणांत अन्त्याक्षर गुरूच पाहिजे असे दिसतें. इतरत्र एका गुरूच्या ठिकाणीं दोन लघू घालतां येतात.

समचरणांतील आद्यगणांत ( - - - - ) या प्रकाराव्यतिरिक्त वैरल्याने का होईना पण ( - ~ - ~ - ) हा प्रकार आढळतो. मात्र या गणांत चौथी नि पाचवी मात्रा अथवा पाचवी नि सहावी मिळून गुरूच अक्षर पाहिजे असा कटाक्ष दिसतो.

"पन्नसमत्ते सया जए

समताधम्ममुदाहरे मुणी
सुहुमे उ सया उलूस ए
नो कुज्झेनो मणि माहणे" (सूकृ १।२।२।६)

वैतालीयांतील प्राचीन रचना केव्हा केव्हा स्वाभाविकपणेंच शिथिल आढळते.

"उत्तर मणुयाण अहिया
गामधम्म इइमे अणुस्सुयं
जंसी विरया समुट्ठिया
चासवस्स अणुधम्मचारिणो" (सूकृ १।२।२।२५)

**औपच्छन्दसिक** हे वैतालीयाच्या चरणान्ती एक एक गुरू वाढविल्याने सिद्ध होते.

**गीति** [ - - - - । - - ]
[ - - - - । ˜ - ˜ - - । + ]

गीति ही सुद्धा चतुष्पदीच आहे. ही पूर्णपणें जातिस्वरूप नाही. विषमचरणांतील आद्यगणांत ( ˜ - - ˜ - ) अथवा ( - ˜ - ˜ - ) या गणाचा उपयोग अद्यापि होऊ लागला नाही. समचरणांतील आद्यगणांत हीच स्थिति आहे. परन्तु ही उणीव नाहीशी करिताच येणार नाही असे मात्र नाही. समचरणांतील दुसऱ्या गणांत मात्र ( ˜ - ˜ - - ) हाच गण लागतो.

मराठींत गीतीला आर्या म्हणण्याचा प्रघात आहे. वस्तुत: आर्या ही गीतीच्या समचरणांत अन्त्य दोन गणाच्या ठिकाणीं ( ˜ - - + ) हा गण घातल्याने होते.

"प्राकृत भाषेमध्ये
आर्या म्हणती जिला जुनाट कवि
गीति असूनि खरी ती
संस्कृत छन्दोविदां जनां ठकवी." (पार २९)

"आर्या आर्यासि रुचे
ईच्या ठायीं जसी असे गोडी
आहे इतरां छन्दी
गोडी, परि यापरीस ती थोडी." (मोभीभ १०)

**आर्यागीति** ही गीतीच्या समचरणान्ती एक एक गुरू वाढविल्याने सिद्ध होते.

"वृत्तीं आधी आर्या
श्राव्या सेव्याचि फार साधी आर्या,
युक्ता सद्‌ययमकांनी
प्यावी रसिकीं करूनि उद्‌यम कानी." (मोकृवि १।५)

मोरोपन्तकृत कृष्णविजय पूर्वार्ध आणि उत्तरार्धांतील पहिले पाच अध्याय, आणि प्रल्हादविजय ही काव्ये आर्यागीतीमध्ये आहेत.

आर्यागीति समयक रचण्याची वहिवाट संस्कृतांत रविकीर्तीच्या काळापासून दिसते. पहा

”येनायोजि न वेश्म
स्थिरमर्थविधौ विवेकिना जिनवेश्म
स विजयतां रविकीर्तिः
कविताश्रितकालिदासभारविकीर्तिः” (ऐहोळे शिलालेख)

# वृत्तविस्तार

## परिच्छेद १ ला

### अनावर्तनी वृत्तें

## १ श्री-वर्ग

पुढील ऱ्हस्वतम वृत्तांचा नामनिर्देश करून ठेवण्यापलीकडे त्यांचे काही प्रयोजन नाही.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | **श्री** | [-] | ६ | **स्त्री** | [- -] |
| २ | **मद** | [˜ ˜] | ७ | **रजनी** | [˜ ˜ -] |
| ३ | **सुख** | [˜ -] | ८ | **मन्दर** | [- ˜ ˜] |
| ४ | **दुक्ख** | [- ˜] | ९ | **मृगेन्द्र** | [˜ - ˜] |
| ५ | **कमल** | [˜ ˜ ˜] | १० | **सुरतरु** | [˜ ˜ ˜ ˜] |

टीपा

[ज्या नावापुढे कंसांत हे हे अक्षर आहे पण पुढे आकडा नाही ते नाव हेमचन्द्राने दिलेले नसून हेमचन्द्राने दुसऱ्याचे टिपून ठेविलेले आहे असे समजावे]

**१ श्री** (हे २/१), ह्री (भ ३२/४६), गौ (विवृ ५/१). **२ मद** (हे २/३), पुष्प (हे), मधु (प्रापै २/५), गिरिधर (ना). **३ सुख** (हे २/५), मही (प्रापै २/७), दिगन्त (ना). **४ दुक्ख** (हे २/४), सारु (प्रापै २/९). **५ कमल** (प्रापै २/२५), परम (ना).

**६ स्त्री** (हे २/२), पद्म (हे), नौ (विवृ ५/२), काम (प्रापै २/३), गर्व (ना). **७ रजनी** (भ ३२/५4, हे), मदन (हे २/९), रमण (प्रापै २/१७), प्रवर (ना). **८ मन्दर** (प्रापै २/२३). **९ मृगेन्द्र** (प्रापै २/२१). **१० सुरतरु** (ना).

## २ इन्द्रवज्रा-वर्ग

### इन्द्रवज्रा-उपेन्द्रवज्रा-वसन्ततिलका

| | | |
|---|---|---|
| ११ | इन्द्रवज्रा | [- - ˜ - - । ˜ ˜ - ˜ - -] |
| १२ | आन्दोलिका | [- - ˜ - - । ˜ - ˜ - -] |

| | | |
|---|---|---|
| १३ | ‘आनन्दशब्द’ | [- - ˜ - - । ˜ ˜ ˜ ˜ - ˜ - -] |
| १४ | केकिरव | [˜ ˜ - ˜ - - । ˜ ˜ - ˜ - -] |
| १५ | उपेन्द्रवज्रा | [˜ - ˜ - - । ˜ ˜ - ˜ - -] |
| १६ | कोल | [˜ - ˜ ˜ ˜ - । ˜ ˜ - ˜ - -] |
| १७ | “प्रतिष्ठित” | [˜ - ˜ ˜ ˜ - । - - ˜ - -] |
| १८ | “व्यवस्थित” | [˜ - ˜ ˜ ˜ - । - - ˜ ˜ ˜ - -] |
| १९ | “समुपस्थिता” | [- - ˜ ˜ - । ˜ ˜ - ˜ - -] |
| २० | वसन्ततिलका | [- - ˜ - ˜ ˜ ˜ - । ˜ ˜ - ˜ - -] |
| २१ | ऋषभ | [˜ ˜ - ˜ - ˜ ˜ ˜ - । ˜ ˜ - ˜ - -] |
| २२ | शिशु | [- - ˜ ˜ - ˜ ˜ ˜ - । ˜ ˜ - ˜ - -] |
| २३ | स्वर्णाक्षी | [- - - ! ˜ - ˜ ˜ ˜ - ! ˜ ˜ - ˜ - -] |
| २४ | केतन | [- ˜ ˜ ˜ - - ˜ ˜ - । ˜ ˜ - ˜ - -] |
| २५ | विमला | [˜ ˜ - ˜ - -] |

टीपा

**११ इन्द्रवज्रा** (पि ६/१५), “तौ जो गुरू चेद्भवतीन्द्रवज्रा” (उवबृ १०३/३४). **१२ “आन्दोलिका** ततरगा: सायकै: सायकैर्यति:” (ममच १६). **१४** “स्यौ स्यौ **केकिरवम”** (हे २/१९२). **१५ उपेन्द्रवज्रा** (पि ६/१६), “उपेन्द्रवज्रा तु जतौ जगौ ग:” (उवबृ १०३/११)

**१६** "ज्सौ स्यौ **कोल:"** (हे २/१९४). **१७ "प्रतिष्ठित"**; उपस्थित (हे २/१३४), शिखण्डित (गछ २/५७), "उपस्थितमिदं ज्सौ ताद्धकारौ" (के ३/४४). प्रतिष्ठितवृत्ताची मोडणी. [। ~ - ~ ~ ~ - । - - ~ - ऽ । -] अशी केल्यास ते पद्मावर्तनी होईल. **१८ "व्यवस्थित"**, "उपस्थितमिदं ज्सौ त्सौ यदि गुरु: स्यात" (गछ २/१०६). **१९ "समुपस्थिता,"** "तो जौ गौ उपस्थिता" (हे २/१३३). **२० वसन्ततिलका** (पि ७/८), सिंहोन्नता (विवृ ५/31); "त्भौ जौ वसन्ततिलकं गुरुकद्वयं चेत" (उवबृ १०३।३३)

**२१ ऋषभ** (हे २/२४३), "ऋषभाख्यमेतदुदितं सजसा: सयौ चेत" (गछ २/१४४). **२२** "त्जस्या: **शिशु:"** (हे २/२६०). २३ मो ज्सौ स्यौ स्वर्णाक्षी. हे नाव विद्याधर वा. भिडे यांनी भिजी १८४ व्या कवितेवर दिले आहे. या वृत्ताची मोडणी [। - - - ऽ ऽ । ~ - ~ ~ ~ - । ~ ~ - ~ - ऽ । -] अशी धरिल्यास ते पद्मावर्तनीहि होईल. **२४** "भ्यसस्या: **केतनं"** (हे २/२६१). **२५** "स्यौ **विमला"** (हे २/४१); याच्याच द्विरावृत्तीने केकिरव वृत्त सिद्ध होतें. या वृत्ताची मोडणी [। ~ ~ - ~ । - -] अशी धरल्यास ते हरावर्तनी होतें.

### ३ इन्द्रवंशा-वर्ग

#### वंशस्थ-रुचिरा-प्रहर्षिणी

| | | |
|---|---|---|
| २६ | इन्द्रवंशा | [- - ~ - - । ~ ~ - ~ - ~ -] |
| २७ | सुदन्त | [~ ~ - ~ - - । ~ ~ - ~ - ~ -] |
| २८ | वंशस्थ | [~ - ~ - - । ~ ~ - ~ - ~ -] |
| २९ | मञ्जुभाषिणी | [~ - ~ - - । ~ ~ ~ - ~ - ~ -] |
| ३० | मृदङ्ग | [- - ~ - ~ ~ ~ - । ~ ~ - ~ - -] |
| ३१ | लक्ष्मी | [- - ~ - ! ~ ~ ~ ~ - ~ - ~ -] |
| ३२ | रुचिरा | [~ - ~ - ! ~ ~ ~ ~ - ~ - ~ -] |
| ३३ | रुक्मिणी | [~ - ~ - । ~ ~ ~ ~ - ~ - ~ - -] |
| ३४ | "सु" रुचिरा | [~ - ~ - ! ~ ~ ~ ~ - - ~ - -] |
| ३५ | प्रहर्षिणी | [- - - ! ~ ~ ~ ~ - ~ - ~ - -] |
| ३६ | 'म्लेञ्छ' | [- - - ~ ~ - ~ - ~ - ~ - -] |
| ३७ | घनमाला' | [~ ~ - - ! ~ ~ ~ ~ - ~ - ~ - -] |
| ३८ | मधुमक्षिका | [- ~ ~ - ! ~ ~ ~ ~ - ~ - ~ - -] |
| ३९ | रमा | [ ~ ~ ~ ~ - ! ~ ~ ~ ~ - ~ - ~ - -] |
| ४० | "निर्मला" | [~ ~ - ~ - ~-] |

**२६ इन्द्रवंशा** (पि ६/२९). "ताविन्द्रवंशा जरसंहितौ मता" (उवबृ १०३/१८). २७. "स्यौ स्जौ ग: **सुदन्तं** (हे २/२१८). **२८ वंशस्थ** (पि ६/२८), वंशस्थविल (श्रुबो ३२, गछ २/६६), वसन्तमञ्जरी (विवृ ५/२६), अभ्रवंशा (हे); "जतौ तुं वंशस्थमुदीरितं जरौ" (के ३/४६). **२९** "ज्तौ स्जौ गो **मञ्जुभाषिणी"** (हे २/२०७), मञ्ज्जुहासिनी (गछ २/१०७), मत्तहासिनी (निस ९१). हे वृत्त जेव्हा [। ~ - ~ - - । ~ ~ ~ - ~ - । ~ -] असे पद्मावर्तनी मोडणीचे असेल तेव्हा त्याला मञ्जुहासिनी म्हणावें. **३०** "त्भौ जौ रो **मृदङ्ग:"** (हे २/२६२).

**३१** "लक्ष्मीरियं तभसजगैरुदाहृता" (उवबृ १०३/३६), (ह २/२१५), प्रभावती (श्रुबो ३४). 'युगग्रहै:' म्हणून श्रुतबोधकारच तेवढा यति सांगतो. **३२ रुचिरा** (पि ७/२), प्रभावती (भ १६/५८), सदागति (विवृ ५/३०). "जभौ सजौ गिति रुचिरा चतुर्ग्रहै: (उवबृ १०३/२१). **३३** ज्भौ स्जौ गौ **रुक्मिणी** धै: हे नाव मराठींत रूढ आहे पण याचा उगम गावत नाही. कुसुम्भिनी (रपि ९३६) या नावालाहि आधार दिलेला नाही. **३४ "सु"-रुचिरा**, "ज्भौ सरौ गोऽतिरुचिरा चतुर्भिर्नवभिर्यति:" (ममच १७), रुचिरा (निस ८७). **३५ प्रहर्षिणी** (पि ७/१), प्रहर्षणीय (वबृ १०३।२२), मयूरपिच्छ (विवृ ५/२९), "म्नौ ज्रौ गस्त्रिकदशकै: प्रहर्षणीयं" (उवबृ १०३/२२).

३६ म्सौ ज्रौ ग 'म्लेञ्छ'. ३७ स्भौ स्जौ गौ. घनमाला धै: हे नाव विद्याधर वा भिडे यांनी भिजी १४९ व्या कवितेवर दिले आहे; पण आधार दिला नाही. वंशमूल (रपि ९३४) यालाहि आधार दिलेला नाही. ३8 भौ स्जौ गौ **'मधुमक्षिका'**. ३९ न्जौ न्रौ य **रमा** डै: हे नाव मराठींत रूढ आहे; पण उगम गावत नाही. ४0 **"निर्मला"** "स्जौ गो विमला" (हे २/६२) आणि (भ ३२/१०३). या वृत्ताची मोडणी [। ~ ~ - ~ - ~ । -] अशी घेतल्यास ते पद्मावर्तनी आणि [~ ~ । - ~ - ~ । -] अशी घेतल्यास ते भृङ्गावर्तनी होते.

## ४ रथोद्धता-वर्ग

### प्रियवंदा-कनकप्रभा

| | | |
|---|---|---|
| ४१ | रथोद्धता | [- ~ - ~ ~ ~ - । ~ - ~ -] |
| ४२ | प्रियंवदा | [~ ~ ~ - ~ ~ ~ - । ~ - ~ -] |
| ४३ | ‘अभीष्ट’ | [~ ~ ~ - ~ ~ - । ~ - ~ -] |
| ४४ | ललिता | [- - ~ - ~ ~ ~ - । ~ - ~ -] |
| ४५ | कनकप्रभा | [~ ~ - ~ - ~ ~ ~ - । ~ - ~ -] |
| ४६ | बुद्बुद | [~ ~ - ~ - ~ ~ ~ - । ~ - ~ - । - ~ - ~ -] |

## टीपा

**४१ रथोद्धता** (पि ६/२२), अपरान्तिका (हे). “रौ नरौ लगुयुता रथोद्धता” (उवबृ १०३/३१). नागवर्मा सहाव्या अक्षरानन्तर यति सांगतो; तसा घेतल्यास वृत्त पद्मावर्तनी होईल. ४२ प्रियवंदा (हे २/१७५, कद ४/४८), मत्तकोकिल (हे), निरुपमा (ना १३१) “भुवि भवेन्नभजरैःप्रियंवदा” (के ३/५७). **४३** न्भौ लौं ग **अभीष्ट**. **४४ ललिता** (हे २/१७६); “धीरैरभाणि ललिता तभौ जरौ” (के ३/५९). **४५ कनकप्रभा** स्जौ स्जौ ग (पि ८/७), जया, सुमंगली (हे), मनोवती (भ, हे), नन्दिनी (स्वछ ३, हे २/२११), [अर्थात ‘सुनन्दिनीति शभ्भौ’ (गछ) हे चूक असावे], मञ्जुभाषिणी (के ३/७४), प्रबोधिता (गछ २/१०२). **४६** “स्जौ स्जौ त्रौ **बुदबुदं**” (हे २/३२१). [ । ~ ~ - ~ - ~ । ~ ~ - ~ - ~ । - - ~ - ~ । -] अशी मोडणी घेतल्यास हे वृत्त पद्मावर्तनी होतें.

## ५ स्वागता-वर्ग

### लड्का-कुटजा-प्रमिताक्षरा-यूथिका-द्रुतविलम्बित

| | | |
|---|---|---|
| ४७ | स्वागता | [- ~ - ~ ~ ~ - । ~ ~ - -] |
| ४८ | द्रुतपदा | [~ ~ ~ - ~ ~ ~ - । ~ ~ - -] |
| ४९ | अम्बुज | [- ~ ~ ~ - ~ ~ ~ - । ~ ~ - -] |
| ५० | चन्द्रवर्त्म | [- ~ - ~ ~ ~ - । ~ ~ ~ ~ -] |
| ५१ | मणिरड्ग | [- ~ - ~ ~ - । ~ ~ - -] |
| ५२ | ‘लड्का’ | [~ ~ ~ - ~ ~ - । ~ ~ - -] |
| ५३ | कुटजा | [~ ~ - ~ - ~ ~ ~ - । ~ ~ - -] |
| ५४ | प्रमिताक्षरा | [~ ~ - ~ - ~ ~ ~ - । ~ ~ -] |

हवी. एखाद्या आवर्तनाची अन्त्य मात्रा आणि पुढील आवर्तनाची आद्य मात्र मिळून एक द्विमात्रक गुरू अक्षर चालणार नाही. मोरोपन्ताच्या कल्याणरामायणांतील

"भरत-रिपुघ्न यांत बहुजोडी"
"तापसवृन्द हरषलें पुरतें"

या चरणांत वा गोविन्दाग्रजाच्या

"उगवे सूर्यकाल मावळतां" (गोवा ३९)
"जा जा नाच सर्व ही जगतीं" (गोवा ५३)
"ओढी वस्तुमात्र जग म्हणतें" (गोवा ५९)

या पादाकुलकाच्या चरणांत जाड ठशांनी मुद्रित केलेलीं अक्षरे ही आठव्या आणि नवव्या मात्रांच्या संयोगस्थानीं असल्यामुळे चरण कर्णकटु होतात इतकेच नव्हे तर त्यांची मोडणी निराळी वाटते. हे चरण [ । प । प ] असे पादाकुलक न वाटतां [- - । प । - - ] असे होतात.

(२) शब्दांत लागोपाठ येणारे जे दोन लघु एरव्ही एकत्र उच्चारिले जातात त्यांचा विग्रह करावा लागल्यास तो कर्णकटु होतो. उदाहरणार्थ, 'दशरथें' हा शब्द एरव्ही दशरथें (- ~ - ) असा उच्चारिला जातो तो जर 'द-शरथें' ( ~ - - ) असा उच्चारावा लागला तर तो कानाला कटु लागतो. मोरोपन्ताच्या पुढील चरणांत तसा कर्णकटु उपयोग आहे,

"। पुत्र वियोगें । व्याकुळ होऊनि । वरिला मृत्यु द-। शरथें"

याच प्रमाणे 'वचकोनि शब्दाचा उच्चार स्वाभाविकपणे वच-कोनि (- - ~) असा होतो; पण पद्यासाठी जर त्याचा उच्चार व-चकोनि ( ~, ~ - ~ ) असा केला तर तो श्रवणोद्वेजक होतो.

"ते गतगौरव कौरव रौरव पौर व-चकोनि पळतात"

या मोरोपन्ती रचनेंतील आरम्भींचे पदलालित्य जितकें हृदयङ्गम आहे तितकाच पुढील पदविच्छेद उद्वेगजनक वाटतो.

(३) एखाद्या शब्दांतील अन्त्य फटिङ्ग लघु आणि पुढील शब्दांतील आद्य फटिङग लघु यांचा योग आवर्तनाच्या पहिल्या नि दुसऱ्या मात्रांच्या ठिकाणी, आणि पाचव्या नि सहाव्या मात्रांच्या ठिकाणी युक्त वाटत नाही; तिसऱ्या नि चौथ्या वा सातव्या नि आठव्या मात्रांच्या ठिकाणी तो योग चालतो. मोरोपन्ताच्या कल्याणरामायणांतील

"निघतां प्रभु हा- । [१]ये [२]वदे पुरतें"
"सौमित्रिस धा- । [१]व [२]म्हणे सीता"

हे चरण कटु लागतात कारण ‘धाव’ शब्दांतील अन्त्य फटिङ्ग ‘व’ आणि ‘म्हणे’ मधील आद्य फटिङ्म ‘म्ह’ यांचा योग आवर्तनाच्या पहिल्या नि दुसऱ्या मात्रांच्या ठिकाणी होतो. शब्दक्रम

। “हाय[३] [४]वदे प्रभु । निघतां पुरतें”

। “धाव[३] [४]म्हणे सौ- । मित्रिस सीता”

याप्रमाणे फिरवून हा योग तिसऱ्या नि चौथ्या मात्रांच्या ठिकाणी आणला कीं चरण गोड लागतो. आणखीहि एक मोरोपन्ती आर्या घेऊ या.

“अर्जुनसम वीर[१] [२]नसे मागे आता पुढे न व्हायचा
हा वीर[५]-[६]रसौघ नगहि न उरेल उरेल जो लवायाचा”

दुसऱ्या आर्यार्धोतील र-र हा संयोग पाचव्या नि सहाव्या मात्रांच्या ठिकाणी आहे तो कटु लागतो. पुन्हा म्हणतांना नग या शब्दाचा न-ग असा जो विग्रह होतो तोहि कटु लागतो. शब्दाचा क्रम फिरवून जर ही ओळ

“वीर[३]-[४]रसौघच हा, नग नुरेल उरणार जो लवायाचा”

अशी केली तर र-र यांचा योग तिसऱ्या नि चौथ्या मात्रांच्या ठिकाणी येऊन तो गोड लागतो. मोरोपन्ताच्याच

“नलगे नमतें लागे आठा अङ्गांत करूनि आठ[७] [८]वण
उद्धरिशी दीनाते देवा, करितां मनांत आठवण” (मोम २/१२९)

या आर्येच्या पूर्वार्धांत ‘ठ-व’ यांचा योग ७ व्या नि ८ व्या मात्रांवर झाला असल्याने तो कर्णकटु लागत नाही.

(४) पद्मगणाच्या [- - , ˜ - ˜] या प्रकाराचा उपयोग क्वचितच होतो; पण कोठे तो असल्यास त्या गणाच्या मध्यावर आणि गणान्तीं खटका येतो तेथे पदसमाप्ति अवश्य व्हायला हवी. “फिरता फकीर। तू तव चरणीं” (गोवो १६) हा चरण मुळीच कटु लागत नाही; पण ‘छान्दिष्ट’ भिक्षु । तू, तव चरणीं’ असा चरण कटु लागतो. ‘। फिरवी तुझ्या य-। शाची महती’ (गोवा ५६) आणि ‘। तारे निळ्या न-। भीं लकलकती’ (गोवा ५९) हे चरण कटु लागतात. शब्दक्रम थोडा फिरवून हे चरण ‘तुझ्या यशाची फिरवी महती,’ ‘निळ्या नभीं लकलकती तारे’ असे केले की सारी कटुता पार निघुन जाते.

(५) चरणारम्भीं चार व पाच मात्रांचा जो आद्यतालकपूर्व गण (- -), (˜ - - ) वा (- ˜ -) या स्वरूपाचा येतो त्याच्या अन्तीं पदसमाप्ति व्हायला हवी.

(६) पण आद्यतालकपूर्व गण द्विमात्रक असल्यास त्याच्या अन्तीं यति मानिलाच पाहिजे असे नाही. त्या दोन मात्रांच्या गणाचा समावेश ज्या शब्दांत होतो तो शब्द आवर्तनाच्या तिसऱ्या वा चौथ्या मात्रेवर समाप्त व्हावा. तो आवर्तनाच्या दुसऱ्या मात्रेवर समाप्त झाल्यास कर्णकटु दोष उत्पन्न होतो. लागोपाठ येणाऱ्या दोन लघूंचा विग्रह आवर्तनाच्या सान्ध्यावर ज्याप्रमाणे उद्वेगजनक वाटतो त्याचप्रमाणे (- -) असा अक्षरी चतुर्मात्रक शब्दहि सान्ध्यावर तुटला तर त पदविच्छेद उद्वेगजनक होतो. [ - । प । - +] या मात्रावलीत 'हाणा हाणा म्हणतांना' हा सङ्ग्रामगीतांतील चरण म्हणूं लागलो की 'हा-। णा हाणा म्हण-। ताना' याप्रमाणे पदविच्छेद होऊन कटुता उत्पन्न होते.

**१४ प्राचीन पद्यांचे अनुकरण चौकसपणें व्हायला हवें.**

एकनाथाची पुढील दोन पद्यें पहा.

(१) "बाइ गे । क्षुधित वनीं गो-। विन्दू. ध्रु ०

। रवितनयातटि । शिशुंसह हा व्रज । चारित गोधन-। वृन्द्." १

(पस १ । २६)

(२) "भजनबिन । धिग् चतुराई। ग्यान् ! ध्रु ०

। लोक कहे हम् । आतमग्यानी । ग्यान नही, अभि-। मान्." १

(पस १ । ६२)

आता म्हणतांना गवई ध्रुवपदांतील आद्यतालकपूर्व गणावर वाटेल तितक्या मात्रा व्ययित करितात. त्यामुळे गाण्याकडेच लक्ष देऊन रचना केली की कशी शिथिल होते पहा.

(१) "भजो रे भय्या। राम गोविन्द ह-। री. ध्रु०

जप तप साधन । कछु नहि लागत । खरचत नहि गठ-। री."

(कबीर)

(२) "खचित बाई। व्यर्थ अम्ही अब-। ला. ध्रु०

वागविती नर। पशुसम आम्हां। मान नसे कस-। ला." १ (किग्र)

या उदाहरणांवरून ध्रुवपदांतील चार-पाच मात्रांच्या आद्‌यतालकपूर्वगणाची कशी दुर्दशा झाली आहे हे स्पष्ट होईल. त्याचप्रमाणे अन्त्य गण द्‌विमात्रक असल्याने दिसायला तो जर (- ˜) असा असला तर अन्त्याक्षर पाय मोडूनच लिहिले पाहिजे हेंहि दिसून येईल.

"विजयते रामदूत हनुमान्                ध्रु०

यो रघुपतिनासह सुग्रीव मैत्र्या योजितवान्" (विदप ८)

हे उदाहरण शुद्ध आहे त्याचप्रमाणेच

"पाखरा, येशिल कां परतून्?            ध्रु ०

मत्प्रेमाने दिल्या खुणांतुन एक तरी अठवून्" –१ (टिक १४१)

हेंहि शुद्ध आहे; परन्तु अन्त्य न् पाय मोडूनच लिहायला हवा.

## १५ तालसंयोग

अक्षरशः पाहतां दोन भिन्न आवर्तनांच्या पद्‌यविभागांचा संयोग कसा होऊ शकतो याचे एक उदाहरण मागे २५ व्या पृष्ठावर दिलेंच आहे. वृत्तविहारांत  भुजङ्गप्रयाताच्या उदारहणाखाली वियद्‌नङ्गा आणि भुजङ्गप्रयात यांच्या म्हणजे अग्न्यावर्तनी आणि हरावर्तनी वृत्तांच्या मिश्रणाचे उदारहण दिलें आहे. येथे जातिरचनेंतील दोन उदाहरणें देतो.

(१) "मन-। मोहन वाजवु-। नी सारङ्गी । कढी मञ्जुळ । सूर.    ध्रु०

।विश्‍व निजलें । शान्त झालें

।एक धरणी । मात्र डोले

गम्-। भीरपणाने । अन्धारांतुनि । छेडित जाई । सूर्." (गिका ३)

या प्रकाराचें अनुकरण किती तरी प्रसिद्ध आधुनिक कवींनी केले आहे.

(२) “वद। प्रेमबोल। आता

हस-।ण्यांत मजा । नाही. ध्रु०

। भासवी जा-। दूगिरी तव । हासण्याची । माधुरी

। साङ्ग कैसा । भासवीते । घाव हा मा-।झ्या उरी.

बस-।ला जरी जि-।व्हारीं.

तुज-।ला हसेंच । येई.” १ (सोका २५)

## १६ काही विशेष गुन्तागुन्तीच्या मात्रावली

१ ली मात्रावली अष्टमात्रक आवर्तनाची आहे. [- । - । + ऽ - ~ । + ऽ ऽ +] या मात्रावलींत आष्टमात्रकाची दोन आवर्तने आहेत. पहिल्या दोन मात्रा होतांच अवर्तनारम्भ होतो. आवर्तनाची तिसरी आणि चौथी मात्रा मिळून गुरूच अक्षर लागतें कारण प्रसंगविशेषीं तें प्लुतहि उच्चारावें लागतें. पुढे (- ~) हाच गण या आवर्तनांत येतो आणि एक मात्रेची उणीव उपान्त्य वा त्यापूर्वील अक्षर प्लुत उच्चारून भरून काढण्यांत येते. दुसऱ्या आवर्तनांत आरम्भी शुद्घ गुरूच लागतो; कारण त्याच्यावर चार मात्रांचा काळ व्ययित करायचा असतो; आणि पुढील गुरूला जोडूनच आद्यतालकपूर्व गण घ्यायचा असतो.

या मात्रावलीच्या द्विरावृत्तीने चरण साधितांना शेवटी एक अक्षर उणें करून दोन मात्रांच्या विरामाची सोय करण्यांत येते; जसें

[- । - + ऽ - ~ । + ऽऽ +, - । - + ऽ - ~ । + ऽऽ ]

“कधिं । करितीऽ लग्न । माऽऽझें, तुज । ठावेंऽ ईश्व-।राऽऽ“

या मात्रावलीच्या आवृत्तीने रेवतीजाति सिद्ध होते.

**२री** मात्रावलीहि अष्टमात्रक आवर्तनाचीच आहे. ही मात्रावली म्हणजे ‘काय पुरुष। चळले बाई । ऽऽ’ ची होय. ही मात्रावली म्हणण्याचा विशेष असा आहे की ज्या आवर्तनांत सहा मात्रांच्या आद्यतालकपूर्व गणाचा समावेश होतो त्याचा आरम्भ सशब्द मात्रेवर नाही; तर मागील आवर्तनांतील अन्त्याक्षराच्या लाम्बवलेल्या स्वरावर आहे अस म्हणतात. पद्यरचनेंत या

म्हणण्याच्या वैशिष्ट्याला महत्त्व नसावें. सहा मात्रांच्या आद्यतालकपूर्व गणाची घडण ही म्हणण्याच्या विशिष्ट पद्धतीसाठी अशी लागते की त्याचे तीन तीन मात्रांचे दोन तुकडे पडावेत. म्हणून या ठिकाणी (˜ - ˜ -), (˜ - - ˜), (- ˜ ˜ -), (- ˜ - ˜) असे चार प्रकार चालतात पण (- - -) असा त्र्यक्षरी गण चालत नाही. पहिल्या आवर्तनाच्या अष्टमात्रक गणाच्या ठिकाणीं सुद्धा (- - - +) हा पद्याचा पहिलाच प्रकार चालतो; इतर अष्टमात्रक गण चालत नाहीत.

या मात्रावलीची आवृति करून शेवटी काही मात्रांची उणीव ठेवण्यांत येते. अशा रीतीने तीन मात्रावली सिद्ध होतात :–

"जरी कुणा । श्रीमन्ताची । ऽऽ सून होय । शाऽरदा ऽऽ । ऽऽ"

"महाराष्ट्र । लक्ष्मी मातें । ऽऽ जगीं धन्य । वा ऽऽ टे ऽऽ । ऽऽ"

"आकळे न । अघटित घटना । ऽऽ हे दयाघ।-ना ऽऽऽऽऽऽ । ऽऽ"

**३ री** मात्रावली षण्मात्रकावर्तनी आहे. ती म्हणजे दिण्डीची होय.

"पहा । दिण्डी चा-।लली पण्ढ -।री ऽऽ ला । ऽऽऽ"

येथेहि आद्यतालकपूर्व गण तीन मात्रांचा असल्याने तो (˜ -) वा (- ˜) असाच असावा लागतो. पहिल्या आवर्तनांत षण्मात्रक गणाचा (- - -) हाच प्रकार चालतो, (- ˜ - ˜) वा (˜ - - ˜) वा (- ˜ - ˜) हे प्रकार चालत नाहीत. दुसऱ्या आवर्तनांत त्याचे तीन तीन मात्रांचे दोन तुकडे पडत असल्याने (˜ - ˜ -), (˜ - - ˜), (- ˜ ˜ -), (- ˜ - ˜) हेच प्रकार चालतात. (+ + +) हा गण चालत नाही. तिसऱ्या आवर्तनांत दोन्ही गुरू अक्षरेंच लागतात; कारण दोन्ही अक्षरांच्यावर अधिक मात्रांचा काल व्ययित करावयाचा असतो.

गाण्याच्या विशिष्ट चालीला महत्त्व आलें की आवर्तनांतील अन्तर्घटनाहि अधिकाधिक अलवचीक आणि दृढ होत जाते.

## १७ विषम जाति

निरनिराळ्या चार लगावली एका निश्चित क्रमाने घेऊन होणाऱ्या एका चतुष्पदीसारख्या जेव्हा अनेक चतुष्पद्या आढळतात तेव्हा तें एक विषम वृत्त होतें. त्याचप्रमाणे भिन्न भिन्न मात्रावली एका निश्चित अशा क्रमाने आणि यमक रचनेने बान्धून जें कडवें सिद्ध होईल त्याची अनेकदा आवृत्ति दिसल्यास ती विषम जाति समजावी. मराठींत विषमजातीचीं उदाहरणें अद्यापि

विरळ आहेत. केशवसुतकवीने ‘झपूर्झा’ या कवितेंत [। प । - - +] आणि [। प] या दोन मात्रावलींच्या मिश्रणाने एका विशिष्ट सांच्याचे कडवें साधिलें आहे तें येणेप्रमाणे:-

“हर्षखेद ते मावळले,
हास्य निवाले,
अश्रु पळाले,
कण्टकशल्यें बोथटलीं,
मखमालींची लव वठली,
काही न दिसे दृष्टीला,
प्रकाश गेला,
तिमिर हरपला,
काय म्हणावें या स्थितिला?
झपूऽर्झा गडे झपूऽर्झा !” (केक १०७)

### १८ जातीचें नामकरण

जातिरचना वृत्तरचनेहून सुकर आहे तशीच ती अधिक विविध आहे. या विस्तीर्ण जातिजालांत जे निश्चित जातिप्रकार आढळतात त्यांना आणि ते ज्या मात्रावलींनी सिद्ध होतात त्यांना नावें द्यायलाच हवींत. पद्याच्या शिरोभागी ‘चाल वा घाटी अमुक पदाची’ अशी सूचना देण्याची जुनी पद्धत आहे. पण सारे कवि सर्वपरिचित नि सर्वसम्मत अशा एकाच पदाची चाल देतात असें नाही. कित्येक कवी तर आपल्या स्वतःच्याच पण लोकांस अपरिचित अशा पद्याची चाल कवितेच्या शिरोभागी देतात! पुन्हा, चालीवरून विशिष्ट स्वरावलीचा बोध होईल, पद्याच्या घटनेचा बोध होणार नाही. यशवन्तकृत

‘कुणा तुझ्या वैभवाचा पडेल ना मोह?’ (यग ६१)

या कवितेच्या शिरोभागी चाल ‘प्रतिकूल होईल कैसा०’ या पदाची दिलेली आहे. परन्तु हे पद जातिस्वरूप आहे तर यशवन्तांची कविता छन्दः- स्वरूप आहे! पूर्वी गाण्याच्या पदावर राग आणि ताल देण्याची पद्घत होती. ख्रिस्तशतके १९२० मध्ये ताम्बे यांच्या कवितेचा पहिला भाग प्रसिद्ध झाल्यापासून कवितेच्या शिरोभागीं रागाचें नांव देण्याची टूम निघाली आहे. बहुजनसमाजाला चाल कळायला या टुमीचा काही उपयोग होत नाही; आणि रागाच्या नावावरून जातीची घटना कळण्याचा सम्भव तर सुतराम् नाही. अमुक एका पद्याची जाति अमुक एक म्हटल्याने वाचकास एका आदर्शभूत कवितेची आठवण व्हावी, आणि कवीसहि या ग्रन्थाच्या द्वारा त्या पद्याचे

शास्त्रशुद्ध स्वरूप समजून घेऊन त्याच्याशी आपली रचना ताडून पाहतां यावी यासाठी जातिनामकरण हे वृत्तनामकरणाप्रमाणेच अत्यवश्य आहे, गीति, आर्यागीति, दोहा इत्यादि नावे जातींना प्राचीन काळापासून चालत आलेलीं आहेत, त्याप्रमाणे नवीन जातिप्रकारांना नवीन नावें देण्यांत अनुचित असें काहीच नाही. नांवे होतां होईल तोंवर प्राचीन उदाहरणांतून, आखूड, सुटसुटीत आणि श्रवणसुभग अशीं निवडून देण्यांत वृत्तनामकरणाच्या प्राचीन पद्घतीचाच अवलम्ब होत आहे. ध्रुवपदाचा जातिनिर्णयाशी सम्बन्ध नसल्याने विषम जातींत निवडावयाचें नाव कडव्यांतून घेण्यात यावे हेच श्रेयस्कर आहे. आता जी वृत्तनामें निश्चित करण्यांत आलीं आहेत त्यांच्याशीं मात्र या जातीनामांचा घोटाळा होऊ देतां कामा नये. मञ्जरी हें नाव एका वृत्ताचे असल्यानें तें आता [- । प । प । ~ +] या मात्रावलीला देता येणार नाही. या मात्रावलीला लीलारति नवीन हे नावच ठेविलें पाहिजे.

### अध्याय ६ वा

# जाति-जृम्भण

पुढे दिलेल्या उदाहरणांत परिचयासाठी ध्रुवपद आणि अन्तरा ही जेथे जेथे आहेत तेथे तेथे दिलेलीं आहेत; तथापि जातिनिर्णय हा कडव्याच्याच घटनेवरून होतो हें विसरता कामा नये.

### वर्ग १ ला

समजाति

१ पद्मावर्तनी

१ 'वररमणी' [। प । प । प । प । प । +] ४२ मात्रा (सशब्द)
२ 'जीवितात्विमुखी' [- । प । प । प । प । - - +] ४० मात्रा
३ 'तुन्दिल' [। प । प । प । प । - - +] ३८ मात्रा
४ 'मदनतल्वार' [- । प । प । प । प । - +] ३८ मात्रा
५ 'कपिवीर' [। प । प । प । प । - +] ३६ मात्रा
६ 'वनहरिणी' [। प । प । प । प ।] ३२ मात्रा
७ 'बम्भरी' [- । प । + ऽ ~ +, - । ऽ ~ +, - । प] ३२ मात्रा.
८ 'विजया' [- । प । प । प । - - +] ३२ मात्रा
९ 'हरिभगिनी,' "स्वर्गङ्गा" [। प । प । प । - - +] ३० मात्रा
१० 'प्रियलोचना' [। प । प । प । + ऽ ~ +] २९ मात्रा
११ 'भवानी' [- । प । प । प । - +] ३० मात्रा
१२ 'लवङ्गलता' [। प । प । प । - +] २८ मात्रा
१३ 'दयिता' [। प । - - + ऽ ऽ । प । - +] २६ मात्रा
१४ 'शुक्रकला' [। प । - +, - + । प । - +] २८ मात्रा
१५ 'कमललोचना' [- । प । प । प । ~ +] २९ मात्रा
१६ 'आदिसुन्दरी' [- । प । ~ +, उ । प । ~ +] २८ वा २९ मात्रा

१७ “सूर्यकान्त,” ‘समुदितमदना’ [। प । प । प । ~ +] २७ मात्रा
१८ “सूर्यकला” [। प । ~ +, उ । प । ~ +] २६ वा २७ मात्रा
१९ ‘महाराष्ट्र’ [- । प । प । प । + ~] २९ मात्रा
२० ‘अरुणप्रभा’ [- । प । प । प । +] २८ मात्रा
२१ “चन्द्रकान्त”, ‘पतितपावन’ [। प । प । प । +] २६ मात्रा
२२ “चन्द्रकला” [। प । +, उ । प । +] २४ वा २५ मात्रा
२३ दोहा [। प । - - + ऽ ऽ । प । + ~] २५ मात्रा
२४ सोरठा [। प । + ऽ ~ ऽऽऽऽ । प । - - +] २५ मात्रा
२५ ‘अनलज्वाला’ [। प । प । प] २४ मात्रा
२६ ‘शुभगडा’ [। प । प । - - +] २२ मात्रा
२७ “वर्षा” [। प । प । + ऽ ~ +] २१ मात्रा
२८ ‘सुस्वर’ [। प । - - + ऽ ऽ । - - +] २० मात्रा
२९ ‘कृतिमण्डित’ [। प । + ऽ ~ +, - । + ऽ ~ +] २० मात्रा
३० ‘स्वैरगति’ [। - - + ऽ ऽ । प । - - +] २० मात्रा
३१ “गोपालन” [- - । - - + ऽ ऽ । प । - +] २२ मात्रा
३२ ‘भूपति’ [- । प । प । - +] २२ मात्रा
३३ ‘जगदीश्वरबाला’ [- । - - + ऽ ऽ । प । - +] २० मात्रा
३४ ‘वंशमणि’ [। प । प । - +] २० मात्रा
३५ ‘नगराज’ [। - - + ऽ ऽ । प । - +] १८ मात्रा
३६ ‘लीलारति’ [- । प । प । ~ +] २१ मात्रा
३७ ‘सन्तति’ [- । प । प । +] २० मात्रा
३८ “मालिबाला” [- । प । - + ऽ - ~ । +] १९ मात्रा
३९ पादाकुलक [। प । प] १६ मात्रा
४० ‘मुरजयी’ [। प । - - ~ +] १५ मात्रा
४१ “कर्णफुल्ल” [- । प । - - -] १६ मात्रा
४२ ‘राजसा’ [- । प । + ऽ ~ +] १५ मात्रा
४३ “बालानन्द”, ‘अचलगति’ [। प । - - +] १४ मात्रा
४४ ‘उद्धव’ [- । प । - +] १४ मात्रा
४५ ‘आनन्दरस’ [- । + ऽ ~ - - । - +] १३ मात्रा
४६ ‘शुद्धसती’ [। प । - +] १२ मात्रा
४७ ‘पर्वती’ [उ । प । ~ +] १५ वा १६ मात्रा
४८ ‘भरतखण्ड’ [- । प । ~ +] १३ मात्रा

४९ 'भुवनसुन्दर' [उ । प । +] १४ वा १५ मात्रा
५० 'सिंहनाद' [- । प । +] १२ मात्रा
५१ "पिशङ्ग" [। प । +] १० मात्रा
५२ 'रेवती' [- । - + ऽ - ~ । + ऽऽ +, - । - + ऽ - ~ । +] २४ मात्रा

१ **'वररमणी'** [। प । प । प । प । प । +]

"ललितविलासकलासुखखेलनललनालोभनशोभन-
यौवनमानितनववदने
अलिकुलकोकिलकुवलयकज्जलकालकलिन्दसुता-
विवलज्जलकालियकुलदमने
केशिकिशोरमहासुरमारणदारुणगोकुलदुरित-
विदारणगोवर्धनधरणे
कस्य न नयनयुगं रतिसज्जे मज्जति मनसिजतरल-
तरङ्गे **वररमणीरमणे**" (क्षेद ८/१७३)

२ '**जीवितविमुखी'** [- । प । प । प । प । - - +]

खालील उदाहरणांत चौथ्या आवर्तनांत सहाव्या मात्रेनन्तर खण्डन आहे. (प्रापै १/२०७ हि पहा).

"विरहानलतप्ता सीदति सुप्ता रचितनलिनदलतल्पतले
मरकतविमले
करकलितकपोलं गलितनिचोलं नयति सततरुदितेन
निशामनिमेषदृशा
न सखीमभिनन्दति रुजमनुविन्दति निन्दति हिमकरकर-
निकरं परितापकरं
मनुते हृदि भारं मुक्ताहारं दिवसनिशाकरदीनमुखी
**जीवितविमुखी**" (वाभू १/१२४)

**३ 'तुन्दिल'** [। प । प । प । प । - - +]

(१) "**तुन्दिल**मण्डित ताण्डवपण्डित धुण्डुनि दानव
दण्डित खण्डित त्रासुनि रे

मध्वमुनीश्वर कीर्तनिं तत्पर देखुनि सत्वर
धावत सङ्कटनाशन रे." (ममुक ३)

(२) "लिहून झाली कधींच कविता छापावी ती कशी
परी अन कुठे परी?
पहिल्या पानीं छापूं म्हटलें, वशिला लावूं कसा
परी अन कुठे परी? (केकु-रमा ६/१)

४ **'मदनतल्वार'** [- ।  प । प । प । प । - +]

(१) "सुन्दरा मनामधि भरलि जरा नहि ठरली हवेलिंत
शिरलि मोत्याचा भाड्ग
रे गड्या, हौस नहि पुरलि म्हणोनी विरली पुन्हा नहि
फिरलि कुणाची साड्ग ध्रु॰
जशि कळी सोनचाफ्याचि न पडु दृष्टि पाप्याचि दृष्टि
सोप्याचि (अशी) ती नार
अतिनाजुक तनु देखणी, गुणाची खाणि अशी
नवखणी चढुन सुकुमार
जशि मन्मथरति धाकटी सिंहसम कटी, उभी
एकटी गळ्यामधि हार
अडिंग तारुण्याचा बहर, ज्वानिचा कहर, मारिते
लहर **मदनतल्वार**." (राला ११३)

पुढील पद्यांत ध्रुवपदें भिन्न भिन्न असलीं तरी कडवें मदनतल्वारजातीचेंच एकचरणी आहे.

(२) "कधि करिती लग्न माझें तुज ठावें ईश्वरा! ध्रु॰
वाढली उन्च ही किती हसुनि बोलती नाक
मुरडिती स्त्रिय परभारा." १ (देशा २३)

(३) "श्रीशंकर शिवराया तव पाया नत व्हाया
सुमती दे या. ध्रु॰
संसारभार अनिवार फार अति मार देत तू तार
यांतुनी सदया!" (गोवा १५९)

(४) "जगिं धन्य खरी तू मुरली, गे तुज बघुनि प्रतिभा स्फुरली. ध्रु॰

अति हीन दीन जो वंश, असोनि तदंश, पाडिसी
भ्रंश, करिसि मति मुरली.'' (सुमौ ९५)

५ **'कपिवीर'** [। प । प । प । प । - +]

तें रूप देखिलें नयनीं ध्रु॰
जो **कपिवीर** महाधिर गम्भिर जोडुनिया कर
तत्पर राघवचरणीं. १
विध्वंसुनि वन मारित नन्दन दचकत आपण
रावण अन्तःकरणीं. २
देवनाथप्रभु दीनदयाघन अञ्जनिनन्दन
अद्भुत ज्याची करणी.'' ३ (देक २५)

६ **'वनहरिणी'** [। प । प । प । प]

(१) ''धाव विभो करुणाकर माधव देव दयानिधि
देवकिनन्दन! ध्रु॰
काममदादिक गाज्जितिं हे अति, धाव रमापति
सेवकहितकर!
जननमरणभय हरण कर त्वरें चरणिं शरण दृढ
केशव किङ्कर.'' (केस्वा-पस १/३९२ वें)

(२) ''सुन्दर खाशी सुबक ठेडगणी स्थूल न, कृशहि
न, वय चौदाची;
नयनमनोहर **वनहरिणीचे**, नाक सरळ जशि
कळि चाफ्याची.'' (देशा ८)
(३) कळ्या-कळ्यांत विहार करिशि तू कळ्या-
कळ्यांत विहार ध्रु॰
दिसशी तू बन्सीधर गिरिधर, तुझ्या छबीस न
पार सख्या रे! १
जादु बन्सिचा घुमतां तूझ्या येइ कळ्यांस
बहार फुगति या.'' २ (तासक ६५)

या पद्यांत चौथ्या आवर्तनांत तिसऱ्या मात्रेनन्तर खटका ठेवला असून सामान्य यमक चरणान्तीं नव्हे तर त्या ठिकाणीं जुळविलें आहे. कडवें वनहरिणी एकचरणी असल्यास ध्रुवपद बहुश: पादाकुलकाचें असतें.

(४) "ये गणराया मङ्गळमूर्ती! ध्रु॰
कीर्तनरङ्गीं नृत्य करी रे सङ्गीताची मिळवुनि पूर्ती." १ (ममुक १)

'भक्ताची मनीषा' (उस ३१०), आणि (तासक १३९, १६२, १७६, १७७) या पृष्ठांवरील कविता या जातीच्या आहेत.

७ '**बम्भरी**' [। प । + ऽ ˜ +, - । + ऽ ˜ +, - । प]

या मात्रावलींच्या दुसऱ्या आणि तिसऱ्या आवर्तनांत सहाव्या मात्रेनन्तर खण्डन असून आरम्भीं प्लुताक्षर आहे.

"हे वनभूमि मनोऽहरी सुमनोऽभरी शुककोकिळवृन्दें
करिती कलरव **बऽम्भरी** उदरऽम्भरी अरविन्दमरन्दें
चिन्तित कान्त निरऽन्तरीं हरिदऽन्तरीं निरखोनि न मन्दें
भीम जया कुसुमाऽकरीं स-सुमा करी माळ घालु आनन्दें." (दस्व १३३)

तथापि एकन्दरीने पहातां हे 'नळ नवरा मी नोवरी' पद्य फार शिथिल आहे.

८ **'विजया'** [- । प । प । प । - - +]

"चल उठ मुशाफर! तेज भरे, जग सर्व पहा गेलें विलया,
जो निद्रित त्यास अपेश सदा, जो जागृत तो मिळवी **विजया**.
बघ नेत्र अता उघडून जरा, प्रभुचिन्तनिं तन्मय होई झणी,
ही रीत असे का प्रीतीची? प्रभु जागृत, तू शयनीं अजुनी!" (गोत)

९ **'हरिभगिनी', ''स्वर्गङ्गा''** [। प । प । प । - - +]

(१) "हरिची भगिनी म्हणे सुभद्रा, रुक्मिणि वहिनी दय करा;
दादांना तुम्हि कळवुनि वळवुनि अर्जुनजीचा शोध करा."
(काक-पस ३/१८ वें)

(२) "भीमकबाळा म्हणे नृपाळा, त्या शिशुपाळा मी न वरीं.
कमलनयन हरि विमलचरित तो नवरा, त्याची मी नवरी."
(काक-पस ३/१७ वें)

(३) "सत्यं ज्ञानमनन्तं नित्यमनाकाशं परमाकाशं
गोष्ठप्राङ्गणरिङ्खणलोलमनायासं परमायासम
मायाकल्पितनानाकारमनाकारं भुवनाकारं
क्ष्मामानाथमनाथं प्रणमत गोविन्दं परमानन्दम" (शगो)

'दोन बाजी' (केक १६१), 'गोदागौरव' (च २४३), गिरीशकृत 'कला' इत्यादि काव्यें या हरिभगिनी जातीचीं आहेत. कित्येकदा या जातींत (। प । - - +] या मात्रावलीचा अन्तरा असतो. या जातीच्या सावेश उपदेशपर कडकडीत पद्याला **फटका** म्हणण्याचा प्रघात आहे. 'स्फुर्ति' (केक ११८) 'थकलेल्या भटकणाराचें गाणें' (केक ११५) 'तारा' (विक ३४) हीं या प्रकारचीं उदाहरणें आहेत.

कडवे एकचरणी असल्यास ध्रुवपद बहुश: [- । प । - - -] या कर्णफुल्लमात्रावलीचें असतें.

(४) "जगजीवन दीनदयाळा रे! ध्रु॰
नित्यनिरञ्जन सज्जनरञ्जन भक्तजनप्रतिपाळा रे! १
दीन तुका विनवी कर जोडुनि नाम तुझें जगपाळा रे! " २
(तुका-पस १/१४७ वें)

याला पुढील गाण्याची चाल उत्तम लागते.

(५) "जमुनातट राम खिले होरी ध्रु॰
दौर दौर पिचकारि चलावत अबिर गुलाल भरे होरी."

(६) "कुणि काहि म्हणा, कुणि काहि म्हणा,
अनुसरलें अपुल्याच मना
रीत म्हणा, विपरीत म्हणा कुणि, दिलें झुगारुनि आवरणा!
जळल्या साऱ्या आशा मनिंच्या, पुसल्या उरल्या त्याहि खुणा"
(उपो २१)

(७) "ऐसाच रहा ऽऽ जाऊं नको!
जाशि घरांतुनि, जाशि करांतुनि, हृदयांतुनि परि जाऊं नको."
(जअ-ओ १)

१० '**प्रियलोचना**' [। प । प । प । + ऽ ~ =]

(१) "कुरु यदुनन्दन चन्दनशिशिरतरेण करेण पयोधरे
मृगमदपत्रकमत्र मनोभवमङ्गलकलशसहोदरे
अलिकुलगज्जनमज्जनकं रतिनायकसायकमोचने
त्वदधरचुम्बनलज्जितकज्जल उज्ज्वलय **प्रियलोचने**"
(गीगो, प्र. २४ वा.)

(२) "आनन्दाचा कऽन्द हरि हा देवकिनन्दन पाऽहिला
भक्तासाठी तो जगजेठी भीमानिकटीं राऽहिला" (?)

सौभद्रांतील 'पावना वामना' (किग्र ४६१) आणि शापसम्भ्रमांतील "तिलक कपालीं, उटि सर्वाङ्गी" हें पद ही याच जातीचीं आहेत. कडवे एकचरणी असल्यास ध्रुवपद [- । प । + ऽ ~ +] या मात्रावलीचें असतें.

(३) "लम्बोदर गिरिजा-नऽन्दना
पूर्ण करीं मनकाऽमना
हे मनभावन तवपदसेवन विद्या द्यावि गजाऽनना."
(ए-पस १/१०१ वें)

(४) "नमितों तव पदसारसें
हो मृदु सखि करुणारसें
प्रिय तनया मम केकनन्दिनि वास न दे सीख, काननीं
कुवलयपेशल तो शिशु, यो तव अल्पतरी करुणा मनीं.
(वि. वा. भिडे)

"भवताप विभो मम वारि रे" (खाक ७० ) ही कविता याच जातीची आहे. निक (१/९६) ही कविता याच प्रकारची आहे. ध्रुवपद मात्र निराळें आहे.

११ **'भवानी'** [- । प । प । प - +]

(१) "जसु सीसइ गंगा गोरि अधंगा गिब पहिरिअ फणिहारा
कंठट्ठिअ बीसा पिंधण दीसा संतारिअ संसारा
किरणावलि कंदा बंदिअ चंदा णअणहि अणल फुरंता
सो संपअ दिज्जउ बहु सुह किज्जउ तुम्ह **भवाणी** कंता"
(प्रापै १/९८)

(२) "जी मला जन्म दे आइ तीहि या काळिं पारखी झाली,
तू दुजी माय गे माझि म्हणुनि तुजजवळि तातडी केली.
सप्रेम सुता घे उदरिं, फार ही भ्यालि ब्राह्मणीं छळिलीं.
समजली प्रीति वडिलांची काय ती,
उमजली नीति शास्त्रांची काय ती,
ये वीट कुडीचा बाइ, नको ही मेलि अमङ्गल असली!"
(देशा ८८)

'एकच क्षण' (कावि २९) ही कविता या भवानीजातीची आहे. भवानीजातींत कडवें एकचरणी वा द्विचरणी असल्यास ते चरण खण्डित असतात आणि ध्रुवपद उद्धव [- । प । - +] वा भूपति [- । प । प । - +] मात्रावलीचें असतें.

(३) "कुस्करूं नका हीं सुमनें! ध्रु०
जरि वास नसे तिळ यांस तरी तुम्हांस अर्पिलीं सु-मनें. १
घ्या करीं, क्षणाभीतरीं वाळतिल तरी तयांना जपणें." २
(तासक १)

(४) "बघ घटका भरली आता आयुष्याची! ध्रु०
उगवली बिजेची कोर, निराश चकोर करुनि मावळली." १
(अफु ३)

'ठावा न सुखाचा वारा!' (तासक २९), 'छळ!' (माभा ७०), 'नन्दा घलीं०' (माभा ७१), 'घात' (यध १२२), 'मावळ्यांचे गाणें' (गिका ४६), आणि 'दारूची लावणी' (गिआ ६८) या कविता याच जातीच्या आहेत. शेवटील पाच कवितांत खण्डन आवर्तनाच्या तिसऱ्या मात्रेनन्तर नसून सहाव्या

मात्रेनन्तर आहे.

१२ **'लवङ्गलता', साकी** (?) [। प । प । प । - +]

(१) "ललित-**लवङ्गलता**-परिशीलनकोमलमलयसमीरे
मधुकरनिकरकरम्बितकोकिलकूजितकुञ्जकुटीरे" (गीगो ३/१)

दीर्घ काव्यास ही जाति अनुकूल आहे. 'मेघदूत' (चिप १), 'गणिकोद्धार' (विक ५1), 'वनवासी फूल' (टिक २६), गिरीशकृत 'अभागी कमल' 'आम्बराई' इत्यादि काव्यें या लवङ्गलताजातींत आहेत. मोरोपन्ताने 'मन्त्रगर्भ साकीरामायण,' 'पञ्चशतीरामायण' आणि 'ध्रुवचरित्र' इत्यादि प्रकरणांत [- - । प । +] या मात्रावलीच्या द्विपदीचें ध्रुवपद घातलें आहे. गीतगोविन्दांत तर विविध मात्रावलींची ध्रुवपदें आहेत. 'नवा शिपाई' (केक १२७) या कवितेंत [। प । - - +] या मात्रावलीचा अन्तरा आहे.

या मात्रावलीला साकी हें नाव रूढ आहे; परन्तु नाटकांतून वा आख्यानांतून ज्या स्फुट साक्या आढळतात त्या पाहातां साकी ही विषम जाति ठरते. साकींत लवङ्गलतामात्रावलीच्या द्विपदीला [। प । +, उ । प । +] या चन्द्रकलामात्रावलीच्या एका चरणाची जोड असते. तेव्हा समजातीला लवङ्गलता हेंच नाव योग्य आहे; साकी ह नाव वापरूं नये.

कडवें एकचरणी वा द्विचरणी असल्यास ध्रुवपद बहुश: [- - । प । - +] या मात्रावलीचें असतें.

(२) "मजला झोप सदाची आली. ध्रु॰
विचार अवघे, कार्यें अवघीं समाप्त येथे झाली." १ (टिक १०५)

(३) "गे तू कवणे मुलखा जाशी? ध्रु॰
भार शिरावर, अपार सागर, फुटकी नाव जराशी-" १
(तासक १५१)

लवङ्गलतामात्रावलीचे [। प । - +, - - । प । - +) असे मधोमध जे दोन तुकडे पडूं शकतात त्यांची आलटापालट करून त्यांचे ध्रुवपद केलेलें प्राचीन कवितेंत आढळतें.

(४) “मर्जी । देवाची दे- । वाची!
। मिथ्या धाव म- । नाची! ध्रु॰
मनांत येतें हत्ती-घोडे-पालखींत बैसावें,
देवाजीच्या मनांत याला पायींच चालवावें.” १
(बक-पस ३/२१३ वें)

(५) “होऊनि गोसावी गोसावी
हरिकथाच परिसावी. ध्रु॰
गमत नसे ज्या गावीं तेथिल वाट कशास पुसावी? १
सुखें मिळो सम्बायत अथवा भगवीं हीं नेसावीं-“ २
(अक १३१)

या मात्रावलींत केव्हा केव्हा द्वितीय आवर्तनान्ती आणि चरणान्तीं यमक साधितात.

“भजभज मनुज श्रीगोपालम
मृगमदचन्दनचर्चित भालं धूसरितालकजालम
कुण्डलमण्डितचारुकपोलं कर्षितराधाचोलम” (विदम ३७)

१३ **‘दयिता’** [। प - - + ऽ ऽ । प । - +]

लवङ्गलतामात्रावलीच्या द्वितीय आवर्तनांत शेवटीं द्विमात्रक विरामाची कूस ठेविल्याने ही मात्रावली सिद्ध होते. विरहाडक आणि हेमचन्द्र यांच्या व्याख्येप्रमाणे (पुढे दोह्याचें विवेचन पहा.) हा दोहाच होतो.

(१) “जानाम्या हृदयाद **दयिता**ऽऽममृतयमूख निशां ते
प्रकटीकुरुते कुमुदमुखंऽऽया खरधामनि शांते (मश्री १२/७९)
(२) “शुक्र यत्तव पठनव्यसनंऽऽन गुण: स गुणाभास:
समजनि येन तवामरणंऽऽशरणं पञ्जरवास:” (शाप ८७४)

मश्री (१२/७४-८६) आणि जगद्धराच्या स्तुतिकुसुमाञ्जलींतील २४ व्या स्तोत्रांतील बहुतेक (म्हणजे पहिलीं २५) पद्यें याच दयिताजातीचीं आहेत.

मराठींत निशिगन्ध कृत ‘ज्योन्स्नागीत,’ आणि निशागीत’ हीं काव्यें आणि ‘सौन्दर्य म्हणजे-‘ (कास्फू ३) आणि ‘स्फूर्तिदेवतेस’ (कास्फू २५) हीं कवनें याच दयिताजातीचीं आहेत.

(३) “प्रेम तुझें माझ्यावरती ऽऽ माझे तुझियावरती
असतें तर किति सुख अपणा ऽऽ झालें असतें जगतीं!”
(निज्यो १)

‘k’ कृत ‘कसोटी’ हे सुनीत (ज्यो १७२) या दयिताजातींत आहे.

१४ **“शुक्रकला”** [। प । - +, - - । प । - +]

लवङ्गलता मात्रावली दुसऱ्या आवर्तनांत चौथ्या मात्रेनन्तर खण्डित करून होणाऱ्या दोन विभागांच्या अन्तीं यमक जुळविल्याने शुक्रकलाजाति सिद्ध होते. कडवें शुक्रकला एकचरणी असल्यास शुक्रकलेचीच शकलें उलटून [- - । प । - + ॥ प । - +] असें ध्रुवपद असतें. या ध्रुवपदाची मोडणी [- - । - - + ऽऽ । - - + ऽऽ ॥ प । - +] अशीहिं करितां येईल.

(१) “इतुकें दे मजला दे मजला ॥ मागतसे हरि तुजला ध्रु॰
येती सन्त घरासी भक्तीभावें पूजिन त्यांसी १
भगवद्भजनीं लागो तुझिये स्वरूपीं मन हें वागो. २
अक्षय वैभव देई अखण्ड केशवसद्गुरुपायीं.” ३
(केस्वा-पस १/४४७ वें).

(२) “हर हर सापडलों सापडलों ॥ कैसा फांसां पडलों! ध्रु॰
इतर नदीजलटाकीं टाकुनि आलों याच तटाकीं. १
सोडुनि मानस-केली कापुनि घ्याया आलों शेली. २ (दस्व ५०)

‘पापताप’ (उस २०३) ही कविता या शुक्रकलाजातींत आहे.

१५ **‘कमललोचना’** [- । प । प । प । ~ +]

(१) “गोविन्दा मधुसूदना **कमललोचना** सख्या यदुविरा,
हे दीनबन्धु माधवा, स्वामि केशवा, करुनि ये त्वरा. ध्रु॰
भवजीवनाब्धिचा थाट, उसळते लाट, प्राण घाबरा,
तुजविण स्मरावा कोण, (कोण) गणगोत? आप्त तू खरा.

जय दाशरथी श्रीराम योगिविश्राम, आज रघुविरा,
तू पूर्ण परात्पर गडी, नेई परथडी, धरुनिया करा.
दिनकरकुलदीपा, आदिरूपा विभो रे!
जग-गुरु जगदीशा, प्रार्थितों श्रीप्रभो रे!
अकळहि गुणलीला वर्णितां वेदवाचा
शेषहि शिणतसे जी काय केवा जिवाचा?
हा अरुष भक्तिचा भाव दयाळा धाव, घेई धनुकरा,
षड्रिपू गाज्जिती अशी वेळ ही भारि जानकीवरा." (देक ४०)

'संसार नव्हे हा सार' (देक-पद ७२ वें) हे पदहि याच जातीचें आहे.

(२) "वासुनि चोच जरि आशेची पाखडे पड्ख किति तरी
परि फोल जाहले यत्न सकल आदळे पुन्हा भूवरी." (कावि ३०)
ही एकच द्विपदी निराळ्या मात्रावलीच्या द्विपदीमालेमध्ये अनवधानाने आली आहे.

१६ **'आदिसुन्दरी'** । - । प । ~ +, ठ । प । ~ +]

कमललोचना मात्रावली दुसऱ्या आवर्तनांत तिसऱ्या मात्रेनन्तर खण्डित केल्याने जी द्विधा मात्रावली होते तिला आदिसुन्दरी हे नाव दिलें आहे.

(१) "रुक्मिणी **आदिसुन्दरी** चकाके वीजचि निजमन्दिरीं. ध्रु०
पदिं नूपुअ रुणझुण करी, अञ्जिरी पैठणि वर भरजरी. १
उरिं कञ्चुकि तटतट करी, जरीचा पदर शोभतो शिरीं." २
(किग्र १६)

(२) "ही साड्ग सखे सुन्दरी कुण्या ग सुभगाचि मदनमञ्जरी".
(राला ११९)

१७ **'समुदितमदना', "सूर्यकान्त"** [। प । प । प । ~ +]

(१) "**समुदितमदने** रमणीवदने चुम्बनवलिताधरे
मृगमदतिलकं लिखति सपुलकं मृगमिव रजनीकरे
घनचयरुचिरे रचयति चिकुरे तरलिततरुणानने
कुरबककुसुमं चपलासुषमं रतिपतिमृगकानने" (गीगो १५/२)

(२) "सहज चालतां मार्गी तुजला बघतां डोळे भरून
धरिलें किति आवरून, गेलें मन माझें बावरून!
हंसापरि चालणें, पदर तो दोन्ही गुच्छांवरून
वरचेवर सावरून बघशी मान वाकडी करून.
गालामधि हासशी साजणी, लाजुनि बघशी दुरून-
प्रेमखुणा या करून नेशी हृदय आमचें हरून." (दक ५)

'बघुनि उपवना विरहाग्नीची ज्वाला भडके उरीं' (किग्र ४८९), 'सोड्गटीचा खेळ' (विक ८५), राजकवि चन्द्रशेखरकृत 'उगडं गुपित' (सुगी १), 'पाखरास' (गोवा १६३), 'हिरवें तळकोंकण' (माक २१), 'मोऱ्यांची मोहाना' (माक ६३) इत्यादि अनेक कवितांत समुदितमदना मात्रावलीच्या द्विपद्याच आहेत. 'दुर्गावती' (विक २७), 'सप्प्रीतिमार्ग' (तासक ३७), 'स्वारी कशी येईल' (तासक १४०) इत्यादि कवितांत [- । प । प । ~ +] या लीलारतिमात्रावलीचा अन्तरा आहे.

समुदितमदनामात्रावलीच्या दोन द्विपद्यांच्या मध्ये [- । प । प । ~ +] या लीलारतिमात्रावलीची त्रिपदी घालून जे कडवें सिद्ध होतें अशा १४३ कडव्यांच्या मालेमध्ये शशिमोहन हें प्रो. यादव मुकुन्द पाठक यांचें काव्य रचिलेलें आहे.

'गुराख्याचें गाणें' (तासक ३०), या कवितेंत अन्तरा (उ । प । +) या भुवनसुन्दरमात्रावलीचा आहे.

कडवें समुदितमदना एकचरणी असलें तर ध्रुवपद बहुश: अकराव्या मात्रेनन्तर खण्डित केलेल्या त्याच मात्रावलीचें, सूर्यकलेचें असतें.

(३) "आम्रमञ्जरी तुला अर्पितें नमुनि मीनकेतुला ध्रु॰
निजधनु ओढुनि पहा कसा हा मन्मथ सरसावला" १ (किग्र ४०३)

(४) "अगाध काही तरी उमज हे अजरामर सुन्दरी. ध्रु॰
व्योमधरेचा चुम्बनविधि हा न सरे कल्पान्तरीं. १
कोठे प्रस्तर कुठे कौमुदी, अन्योन्यीं रति परी." २ (टिक १०२)

'१८९७ या वर्षाला' (दक ५९) ही कविता याच जातीची आहे. 'कशि काळ नागिणी वैरिण झाली नदी!' (तासक १४१). या कवितेंत ध्रुवपद [- । प । प । ~ +] या लीलारतिमात्रावलीचें आहे.

### १८ "**सूर्यकला**" [। प । ~ +, उ । प । ~ +]

समुदितमदनामात्रावली अकराव्या मात्रेनन्तर खण्डित केली कीं जी द्विधा मात्रावली होते तिला सूर्यकला म्हटलें आहे.

(१) "जीची आलोचना-॰ करितां नीरच ये लोचना.
धनिक करी वञ्चना-॰ नेदी तिळभरही काञ्चना." (दस्व १८३)

तथापि हें पद्य शिथिल आहे.

(२) "सुन्दर नृपमन्दिर तयाच्या सुन्दर सौधावर
रमणी कोणी तरी उभी ही चारुमूर्ति हांसरी
शुक्राची चान्दणी उतरली जणु अस्मानांतुनी
सौधाच्या कोन्दणी जणू ही लखलखते हिरकणी." (कास्फू ७८)

(३) "येऊनि माझ्याकडे एकदा मृत्यू असें बडबडे,
'सूर्य अवेळीं किती सारखे जाती अस्पाप्रती!
आकाशांतुनि गोल भराभर
तुटून खाली पडती भूवर
स्वाहा करितों मी एकन्दर-'
तेव्हा त्याच्यावरी त्याजला मीही उत्तर करीं." (उवा २/२७)

उवा (२/४९) ही कविताहि याच जातीची आहे.

१९ **महाराष्ट्र** [- । प । प । प । + ~]

रणशूर शहाजीसूनु पहा जी कीर्तिप्रतिपच्चन्द्र
नृपनीतिविशारद, सदैवसावध, वैराग्याचा कन्द
शिव छत्रपति प्रभु महाराष्ट्रभूप्रिय जनहृदयानन्द-
बघ शैशवांतही त्यास एक हिन्दवीस्वराज्यच्छन्द. (२५७)

या जातीला (प्रापै १/२०८) मरहट्टा छन्द म्हटलें आहे. हे नाव प्रथम कोणी आणि कां दिलें समजत नाही. या जातींतील अन्त्य अकार निभृत असेल असें वाटतें. तसा तो धरिल्यास या आणि पुढील अरुणप्रभाजातींत काही भेद रहात नाही.

२० **'अरुणप्रभा'** [- । प । प । प । +]

(१) " या हृदयाकाशीं उगवे अरुणप्रभा शरत्कालीं,
त्या विहगकूजनें भ्रमरगुञ्जनें जागृति मज आली.
मी पुसुनि उघडिलें नयना
मृदु सोडुनि सरलों शयना,

प्रक्षाळुनि करपदवदना,
हेमस्तक चरणी तिच्या ठेवितां हसली ती गालीं,
मज अठवुनि चुम्बुनि कवटाळी मग गुप्त कुठे झाली?" (सुभा)

(२) "परतन्त्रपणे जगतीं फिरणें ज्याहून बरें मरणें!
अतिदीनपणें अरितें नमणें त्याहून बरें मरणें!
न धराल जरी तरवार करीं, चिरडील अरी समरीं,
अधमाधमशा पावाल दशा, बकरीच बरी दुसरी". (विक १२४)

२१ **"चन्द्रकान्त", 'पतिपावन'** [। प । प । प । +]

(१) "पतिपावन नाम ऐकुनी आलों मी दारा,
पतीतपावन न होशि म्हणुनि जातों माघारा." (नाम-पस २/४४)

(२) "चन्द्रकान्त राजाची कन्या तरुण रूपखाणी
पतिव्रता सुद्‌गुणी शहाणी, पतिही वाखाणी." (देझु)

(३) "तीनी सान्जा सखे मिळाल्या, देईं वचन तुला-
आजपासुनी जिवें अधिक तू माझ्या हृदयाला. धृ॰
कनकगोल हा मरीचिमाली जोडी जो सुयशा,
चक्रवाल हे पवित्र, ये जी शान्त गभीर निशा,
त्रिलोकगामी मारुत, तैशा निर्मल दाहि दिशा-
साक्षी ऐसे अमर करुनि हे तव कर करिं धरिला." १ (तासक ३९)

(४) गोपीचुम्बित रागकरम्बित मानविलोकनलीन
गुणवर्गोन्नतराधासङ्गतसौहृदसम्पदधीन
तद्‌वचनामृतपानमदाहृत वलयीकृतपरिवार
सुरतरुणीगणमतिविक्षोभण खेलनवल्गितहार
अम्बुविगाहननन्दितनिजजन मण्डितयमुनातीर
सुखसंविद्धन पूर्ण सनातन निर्मलनीलशरीर" (रूस्तमा २७०)
या आणि पुढील पद्यांतील चरणान्त्य अकार निभृत आहे असें वाटतें.

(५) "मळकट बण्डी, जुनापुराणा अङ्गामध्ये कोट
टोपी डोईवरी फाटकी, कमरेला लङ्गोट.

पहा अशा थाटांत चालला कुणी भिकारी पोर

भिक्षा मागत, करीत गम्मत, हासत थट्टेखोर." (पारा ३२)

या जातींत अगणित कविता आहेत. 'कृष्णाकुमारी' (विक ३८), 'कमळा' (फुओ ६०), हिड्गणेकरकृत 'पावनखिण्ड' इत्यादि काव्यें या चन्द्रकान्त जातीचीं आहेत. देवनाथकृत 'एक दिनीं वृषभानुनन्दिनी जे हंसकचरणा' (देक १००) या चन्द्रकान्त जातीच्या पद्यांत पादाकुलकाच्या त्रिपदीचा एक आणि वसन्ततिलकाच्या चतुष्पदीचा एक असे दोन अन्तरे आहेत.

कडवें चन्द्रकान्त एकचरणी असलें तर ध्रुवपद, या मात्रावलींत दुसऱ्या आवर्तनांत दोन मात्रानन्तर खण्डन केल्यानें जी द्विधा मात्रावली [। प । +. ३ । प । +] होते त्या मात्रावलीचें म्हणजे चन्द्रकला मात्रावलीचें अथवा बहुश: [३ । प । +] या भुवनसुन्दरमत्रावलीचें असतें.

(६) "जाऊं कामाला ऽ चला गे दिवस किती आला ध्रु०

उपवनतरुवेलींना जल मी घालाया जातें." १ (देशाप ६३)

(७) "सुन्दर मी होणार ऽ आता मरणाने जगणार! ध्रु०

वर्षत्रय मम देह मरतसे तो आता मरणार. १

वर्षत्रय मम प्राण जातसे तो आता जाणार. २

आनन्दी आनन्द जाहला, मरतां मी हसणार. ३

हासत मरणें गोविन्दाचा प्रेमपन्थ ठरणार!" ४ (गोक ११४)

(८) तया वनिं खेळे भूपसुता. ध्रु०

खेळविता बहु मेळविला सखि मेळ तया सहिता. १

राजस ते द्विजराजमुखी गजराजगती ललिता" २ (दख ९४)

या पद्यांतील चरण वृत्तस्वरूप [। - ~ ~ - ~ ~ । - ~ ~ - ~ ~ । - ~ ~ - ~ ~ । -] या मात्रावलीचे आहेत.

(९) "सुलभ मनिं गणा न भूपसुता.

करूं बघतां कशि ती वनिता? ध्रु०

राजकुमारी उभि सामोरी त्यजा न किड्करता. १ (काम्)

(१०) "पाखरा, येशिल कां परतून? ध्रु०

मत्प्रेमाने दिल्या खुणांतुनि एक तरी अठवून-" (टिक १४१)

२२ **"चन्द्रकला"** [। प +, ३ । प । +]

चन्दकान्तमात्रावलींत दुसऱ्या आवर्तनांत दोन मात्रांनन्तर खण्डन केलें की जी द्विधा मात्रावली होते तिला चन्द्रकला हे नाव दिलें आहे.

(१) "गोविन्दा रामाऽऽजयजय गोपाळा रामा!
याऽदवा रामाऽऽजयजय माऽधवा रामा!
एऽक तू रामाऽऽजयजय अनेक तू रामा!" (ए-भमाप्र ३५)

(२) "घेऊनि हृदयासी-॰ सुतेला, स्थित मी दाराशी-
म्हातारी आली-॰ तरड्गत, मुलगीला दिसली." (केक १४८)

'इन्दुकला' (यध २५) आणि 'सन्त तुकाराम' (माक ७५) हीं काव्यें या चन्द्रकलाजातींत आहेत.

२३ **दोहा** [। प । - - + ऽ ऽ । प + ~]

ही मराठींत परिणत झालेल्या दोहयाची मोडणी आहे. अन्त्याक्षर अकारयुक्त असतें; आणि तो अकार दृग्गोचर असला तरी वस्तुत: अनुच्चारितच असतो.

(१) "स्वहृदय फाडुनि निजनखरीं ऽऽ चिवट तयाचे दोर
काढुनि गोफण वळितों ही ऽऽ सत्त्वाचा मी चोर." (केक १८९)

(२) "जोर मणगटांतला पुरा ऽऽ घाल घाल खर्ची.
हाण टोमणा, चळ न जरा ऽऽ अचुक मार बर्ची." (केक १८३)

मराठींत केव्हा केव्हा दुसरा गण (+ ~ +) असा येतो तेथे प्रथमाक्षर त्रिमात्रक होतें आणि तो (~ ~ ~ +) असा असल्यास चौथे अक्षर त्रिमात्रक होतें.

(३) "महाराष्ट्रभाषेंऽत ही ऽऽ दोहा रीति नवीचू
रची मयूरेश्वर हिला ऽऽऽ मनीं धरील कवीच." (मोविस्तु ९)

१३ मात्रांचा एक भाग आणि ११ मात्रांचा एक भाग मिळून दोहा होतो असें मानण्याचा प्रघात आहे.

"तेरह मत्ता पढम पअ पुणु एआरह देह
पुणु तेरह एआरहहि दोहा लक्खण एह" (प्रापै १/७८)

परन्तु दोह्याचें लक्षण देणाऱ्या छन्द:शास्त्रकारांतील प्राचीनतम असा विरहाङ्क दोह्याचें लक्षण निराळ्या रीतीने देतो.

"तिण्णि तुरंगा णेउरओ विप्पाइक्का कण्णु
दुवहापच्छद्धे वि तह वद लक्खणउ ण अण्णु" (विवृ ४/२७)

तुरङ्ग आणि पदाति म्हणजे चतुर्मात्रक गण, नूपुर म्हणजे एक गुरु आणि कर्ण म्हणजे दोन गुरु ही परिभाषा ध्यानांत घेतली की दोह्याची मोडणी [। - - - - - - + । - - - - + +] अशी होते आणि मात्रांची सङ्ख्या १४ नि १२ अशी होते! अर्थात विरहाङ्क हा लिखितापेक्षा उच्चारिताला महत्त्व देतो हें उघड आहे. कारण चरणान्त्य अक्षर हे दिसायला नेहमीच लघु असूनहि तें गुरु आहे असे तो स्पष्ट म्हणतो. त्याचप्रमाणे बारा मात्रांनन्तर येणाऱ्या लघु अक्षरालाहि गुरु मानतो हेंहि उघड आहे. त्याच्या लक्षणांतील 'ओ' हे अक्षर दिसायलाहि तो गुरु आहे. परन्तु खालच्या ओळींतील 'ह' हे दिसायला लघु असूनहि उच्चारत: गुरु आहे म्हणूनच तो गुरु मानीत असावा. जोइन्दुकृत योगसारांतील पुढील उदाहरणांत पहिले पाद दिसायलाहि चौदा चौदा मात्रांचे आहेत.

"वउतउसंजमुसील जिया-॰ इय सव्वाइ ववहारु'
मोक्खह कारण एक्क मुणी-॰ जो तइलोयहु सारु" (जोयो ३३)

हेमचन्द्र नेहमीच्या दोह्याप्रमाणेच उदाहरण

"पिअहु पहारिण इक्किणवि-॰ सहि दो ह्या पडंति
संनद्धओ असवारभौ-॰ अन्नु तुरंगु न भंति" (पृ ४१)

हे देतो पण लक्षण "समे द्वादश ओजे चतुर्दश दोहक:" असें देतो. त्यानेच दिलेलें

"मम तावन्मतमेतदिह-॰ किमपि यदस्ति तदस्तु
रमणीभ्यो रमणीयतर-॰ मन्यत्किमपि न वस्तु"

हे संस्कृत उदाहरणहि दिसायला १३ नि ११ मात्रांचेच आहे. यावरून असे दिसते की १२ आणि ११ मात्रांनन्तर येणारा पादान्त्य लघु हा विरामपूर्व असल्यामुळे उच्चारत: वस्तुत: गुरु होतो यांपैकी ११ मात्रांनन्तर येणाऱ्या पादान्त्य लघूविषयीं हेमचन्द्र स्पष्टच म्हणतो की

'अत्र समपादान्ते गुरुद्वयमित्याम्नाय:'

या चार ठिकाणीं दिसायला लघु पण उच्चारायला गुरु अशीं अक्षरें न घालतां दिसायलाहि गुरु अशीं अक्षरें घालून रचना केली तर ती ज्या जातीची होईल तिला (मागे पृ. ३७२ पहा) "दयिता" हे नाव दिलें आहे.

म्हणण्याच्या दृष्टीने पाहिलें तर विरहाङ्क-हेमचन्द्र यांचे म्हणणें योग्य वाटतें. अडचण

एवढीच राहते की जेथे विषम पादान्तीं दिसायला (- ~ -) वा (~ ~ ~ -) हा गण येतो तेथे मात्रांची सङ्ख्या चौदा होत नाही, ती तेराच भरते! आधी अशीं स्थळें थोडीच आहेत. परमात्मप्रकाशाच्या ६७४ पादांपैकी २७ च पादांच्या अन्तीं (- ~ -) हा गण येतो तेथे प्रथमाक्षर स्वाभाविकपणेंच प्लुत उच्चारितो येतें; आणि ४ च पादान्तीं (~ ~ ~ -) हा गण आल्याने अन्त्याक्षर प्लुत उच्चारावें लागतें. योगसाराच्या २०८ पादांच्या पैकीं १२ पादांच्या अन्तीं (- ~ -) हा गण असून एकाच (७१ इ) पादाच्या अन्तीं (~ ~ ~ -) हा गण आहे.

आधुनिक मराठींत

"मागे ऐसे दोन वर-॰ कैकेयी विषरूप
समजूनि तिचा लोभभर-॰ भी सत्यव्रत भूप". (मोदोरा)

अशा उदाहरणांत 'र' गुरूच उच्चारिला जातो आणि अन्त्य पकार मात्र स्वरविहीन उच्चारिला जातो.

२४ सोरठा ही जाति दोहयाचे पाद उलटविल्याने होते. जोइन्दुकृत योगसारांतील (३८, ४६) हीं दोन सोरठाजातीचीं प्राचीन उदाहरणें आहेत.

"जयजय जननी देवि! जयजय भगवति शारदे!
नमूं तुला मी केवि? वानूं कवण्या वाणिने?" (तासक १७३)

ही आणि हिच्या नन्तरच्या चार द्विपद्या सोरठा जातींत आहेत. यमकें विषम पादान्तीं साधिलीं आहेत, समपादान्तीं नाहीत. अशा ठिकाणीं ही शकलें उलटवून सोरठाजातीची दोहाजाति कां करूं नये कळत नाही.

२५ **'अनलज्वाला'** [। प । प । प]

(१) "शहामृगाच्या कोशासम तनु निस्तुल गोरी,
केश सुगन्धित काळे काळे जशि कस्तूरी,
चुनडि केशरी खुले, केशरी तशीच चोळी,
यज्ञवेदितें **अनलज्वाला** की लपेटली." (देवाना)

(२) "जागृत ठेवा लग्नाचीही स्मृति सारी.
व्हालचि माता दुहितांच्या कधि तरि संसारीं.?
होऊं न द्यावा तुम्हि त्यांचा विक्रय बाजारीं." २ (देशा १९)

प्राकृतांतील 'रोला' (प्रापै १/९१) या पद्यप्रकाराचा अन्तर्भाव या अनलज्वालाजातींत होतो.

२६ **‘शुभगड्गा’** [। प । प । - - +]

(१) “इद्राणी हे जेथे वाहे शुभगड्गा,
स्नानें पानें कर्ती पातक-गिरिभड्गा;
तारी पाहा केवळ जे दीन अनाथा,
चित्ती चिन्ता ज्ञानेश्वरसद्गुरुनाथा’. (निक १/९३)

(२) “आणा ध्याना विठ्ठल पण्ढरिचा राणा. ध्रु॰
याच स्वरूपीं येथे असणें विज्ञप्ती
दर्शनमात्रें सर्वजनां मोक्षप्राप्ती
स्वभक्तवचना मानुनी इटेसमचरणा.” १ (विप ६७ वें)

वासुदेव वामनशास्त्री खरे यांच्या समुद्रकाव्यांतील ८३ वी चतुष्पदी या शुभगड्गाजातीची आहे.

२७ **“वर्षा”** [। प । प । + ऽ ~ +]

“णच्चइ चंचल बिज्जुलिआ सहि जाणए
मम्मह खग्ग किणीसइ जलहर साणए
फुल्ल कअंबअ अंबर डंबर दीसए
पाउस पाउ घणाघण सुमुहि बरीसए (प्रापै १/१८८)

प्राकृतपैड्गलांतील प्लवड्गम नामक मात्रावृत्ताचा अन्तर्भाव या वर्षाजातींत होतो.

२८ **‘सुस्वर**’ [। प । - - + ऽऽ । - - +]

“उगवुनि आला पुनवेचा - ॰ चान्दोबा
सुस्वर गर्जे यमुनेचा - ॰ धबधऽबा
धवलित झालीं वाळूचीं - ॰ मैदानें
सारविलीं जणु शाडूच्या - ॰ रड्गाने
शीतळ वारा वाहे हा - ॰ झुळूझुळू
डुललीं रानें आनन्दें - ॰ हळूहळू”. (काविश-वाश्रीप ९३)

२९ **‘कृतिमण्डित’** [। प । + ऽ ~ +, + । + ऽ ~ +]

“हंस धराया लाऽगली हे भाऽगली ध्रु॰

मृदुल तनू कोमेऽजली घामेऽजली १
चाली करुनि न साऽवलींत विसाऽवली २
स्तविली रघुपतिपऽण्डितें कृतिमऽण्डितें." ३ (दस्व १०६)

३० **'स्वैरगति'** [। - - + ऽऽ । प । - - +]

"फुललिं फुलें-॰ त्यायोगें उपवन खुललें.
दरवळला-॰ परिमल सुखवाया सकला.
स्वैरगती-॰ अलिगण उडती बागडती.
मधुनादें-॰ गाती प्रभुगुण आनन्दें" (विक ९९)

माधवानुजकृत 'विसरलेलें गाणें' (मानुक १४४), गोविन्दाग्रजकृत 'कळ्यांची फुलें कशीं झालीं? (गोवा १५५), बालकविकृत 'फुलपाखरू-फुलवेली' (बाक ३), आणि 'पाऊस' (बाक ६) या कविता या स्वैरगतिजातींत आहेत.

३१ **"गोपालन"** [- - । - - + ऽऽ । प । - +]

"कुत्ना थमाल ले-॰ थमाल आपुल्या गाई
आम्ही दातो ले-॰ घलास दातों भाई
येथे यायाता-॰ अमुता इलाद नाई
तूदी थड्गत ले-॰ थड्गत कलली भाई." (नाम-पस २/५२)

हें मधुर, बोबडें, दीर्घ पद्य सबन्ध या गोपालनजातींतच आहे.

३२ **'भूपति'** [- । प । प । +]

या जातीला नाव 'भूपती खरे ते वैभवसुख सेवीती" (देमृ २५) या देवलांच्या पद्यावरून पडलें असलें तरी ही जाति प्राचीनच आहे. गोविन्दवणीकरकृत पुढील पद्य पहा.

(१) "किती अन्त पाहशिल माझा रे गुणवन्ता?
तुजविण पळ युग समजतों पण्ढरीनाथा." (पस २/३२५ वें)

(३) "येथेच गाइलीं असतीं आपण गाणीं
ऊर्जस्वल भरुनी स्फूर्ती रानोरानीं. ध्रु॰
लाभली जिवाला येथे प्रेमळ जोड,
निघाया संवादी स्वर गोड,

तरळली पुढे मधुसृष्टी लावुनी ओढ,
परि कशी निमाली मोहनसुन्दर वाणी!" १ (गिफ २१)

'मुग्धकलिका' (दक २२), ताम्बेकृत 'ते कान्त यापुढे'- (तासक १६५) आणि 'स्त्रीहृदयरहस्य' (तासक १७०) या कविता भूपतिजातींत आहेत. पुष्कळा भूपतिजातीच्या द्विपदीमालेमध्ये विषमचरण खण्डित असतो आणि तो तुकडे तुकडे करून लिहिण्याच्या पद्धतीमुळेच जाति वेगळी वाटते.

(४) "जन सकल जादुने विकल ठिकाणीं खिळले;
वदवे न, न हलवे, जणुं चित्रें ते बनले." (तासक २४)

'पाडवा' (तासक ६८), 'वियोगिनी' (तासक ६९), 'आईकडे न्या!' (तासक ८२) आणि 'शिशुवञ्चन' (तासक ८४) या कवितांत हा प्रकार आढळतो. 'पद्मिनी' (विक २३), 'हालत्या पिम्पळपानास' (गोवा १३१) इत्यादि कवितांत अन्तरा [- । प । - + ऽ - ~ । +] या मालिबालामात्रावलीचा आहे.

'द्राक्षकन्या' या भाषान्तरित काव्यांत भूपतिमात्रावलीच्या विशिष्ट यमक बान्धणीच्या चतुष्पद्या आहेत.

(५) "या इथे तरुतळीं एक वही कवितेची,
भाकरी एक, अन सुरई एक सुधेची,
आणखी एक तू जवळ गात या विजनीं,
अन हे न रान मग, नन्दनवन ते हेंची!" (माजूद्रा ११)

'कणिका' या काव्यप्रकारासाठी (पुढे पृ ३८७ पहा) लीलारतिजातीची योजना करण्यांत येते तशी भूपतिजातीचीहि होऊं शकेल.

पाठीस लागुनी पोट छळी मनुजाला
प्रच्छन्न जगावर उपकारच हा झाला.
पोटाची चिन्ता ज्यांस असे किति थोडे!
स्वास्थ्यांत परन्तु न त्यांचा जाई वेळ,
मग लावुनि जगतीं आग पाहती खेळ! (२५८)

३३ **'जगदीश्वरबाला'** [- । - - + ऽऽ । प । - +]

भूपतिमात्रावलीच्या पहिल्या आवर्तनांत शेवटीं द्विमात्रक विराम ठेविल्याने जी द्विधा मात्रावली होते तिला जगदीश्वरबाला हें नाव दिले आहे.

"हे सुन्दरते-॰ तू जगदीश्वरबाला,
त्या दर्शविशी-॰ गूढ दिव्य रूपाला. ध्रु॰
अधिकार तुझा-॰ थोर खरोखर आहे,
रमणीयपणा-॰ तुजलागी हा लाहे,
पावित्र्य खरें-॰ त्या ठायीं दृढ राहे,
सम्मोह पडे-॰ म्हणुनि अखिल जगताला." १ (सुभा)

३४ **'वंशमणि'** [। प । प । - +]

"त्रिभुवनपालक मानीं मम राम धणी.
एक अयोध्यावासी रघुवंशमणी
दशरथ, चार तयाला सुत फार गुणी.
राम ज्येष्ठ तयांमधि जो बाळपणीं
वधुनि ताटिका राहे मुनिवर्यजनीं." १ (विप ४९)

'गावीं गेलेल्या मित्राची खोली लागलेली पाहून' (केक १९) आणि 'स्वप्नामध्ये स्वप्न' (केक ९९) या कविता या जातीच्या आहेत. उमरखय्यामकृत रुबाया हे प्रस्तुत लेखकाचें मूळ फार्सीवरून भाषान्तर आणि त्या भाषान्तराची अर्पण पत्रिका? हीं याच जातींत आहेत.

"म्हणति, हुरींसह उद्या महोत्सव गोड,
मी म्हणतों, अजि हा द्राक्षासव गोड!
घे ही रोकड, उधार ती सोडुनि दे,
गमे दुरूनिच की दुन्दुभिरव गोड." (उखरु ३५९)
"स्वप्नहीन ती रात्रीं निद्रा गाढ,
दिनीं कष्ट अन पाणी, भाकर जाड,
सन्धाकाळीं विजन, स्नेही, कविता-
काय यापुढे साम्राज्याचा पाड?" (उखरु अर्पणपत्रिका २०)

३५ **'नगराज'** [। - - + ऽऽ । प । - +]

(१) "सोडुनिया-॰ तुज जातों नगराजा,
लीनाचा-॰ प्रणाम घेई माझा.
आताचा-॰ सरला ऋणानुबन्ध,
तोडावे-॰ म्हणुनि लागती बन्ध." (कावि ८२)

(२) "आलों शरण तुला. ध्रु॰
श्रीरङ्गा-॰ दे मजला सत्सङ्गा. १
रघुनाथा-॰ अवडो तव गुणगाथा. २
भगवन्ता-॰ तारीं विठ्ठलपन्ता ३ (विदप ६)

अनन्त काणेकरकृत 'एकाचें गाणें' (काचा ५१) ही कविता या नगराजजातींत आहे.

३६ **'लीलारति'** [- । प । प । ~ +]

(१) "उद्धवा, ऐक कृष्णाची लीलारती,
अबुगोनि कसा मज गेला मथुरेप्रती." ध्रु॰
रक्षीलें बहु वणव्यांत (चि) रविजाथडीं,
गोवर्धन धरिला इन्द्र वर्षतां झडी,
यमुनेंत मिळाले नन्द, मिळेना कुडी,
काढियले निजपुरुषार्थे घालुनि उडी,
यात्रेंत भुजङ्गें गिळितां प्राणेश्वरा,
धावोनि बळें सोडविलें त्या अवसरा,
अहिदेहांतुनि उद्धरिलें विद्याधरा-
आठवूं किती उपकार नाही मिती-
सद्गदित विलापे माय यशोदा सती." १ (राघव-पस ३/२१०)

'चोखयाच्या महारीची विनन्ति' (पोबा २७), 'नव्या युगाचा काव' (पारा १), 'रोहिणी' (पारा १०), 'हिंग्डणी' (पारा ४६), 'वाटसरू' (पारा ६४), 'दूर कोठे तरी' (पारा ७1), 'बालकवि' (पारा ९१), 'तिथे' (पारा ९६), 'माझ्या खेडेगावीं' (पारा १०७), 'मञ्जुळा' (कास्फू ४६), 'सन्धाकाळीं' (कास्फू ६३), 'खेड्यांतील देखावा' (कास्फू ११०) इत्यादि कविता या लीलारतिजातींत आहेत. मञ्जरी हें एका वृत्ताचें नाव असल्याने या जातीला मञ्जरी म्हणून जे नाव पूर्वी देण्यांत आले होते त्याचा त्याग करणें अपरिहार्य झालें आहे.

भूपतिजातीप्रमाणेच या जातीच्याहि द्विपदीमालेंत केव्हा केव्हा विषमचरण खण्डित असतात.

(२) "तो भासच सगळा, जरी स्वप्न तें तरी
हुरहूर जाणवे मनांत कां ही परी?
मावळली मोहक निशा, धवळल्या दिशा,
या अजून नयनीं खुपति तारका कशा?" (केगी ५०)

ही कविता या प्रकारची आहे.

"जपानी भाषेंत 'टांका' म्हणून एक काव्यप्रकार आहे. यांत पाच चरण असून पहिले दोन नि शेवटले दोन सयमक असतात. एक भावना, कल्पना अथवा एक विचार या पञ्चपदींत ग्रथित केलेला असतो. मात्रा काव्यार्थ रूपकात्मक भाषेनें बहुश: सुचविला जातो. कविवर्य रवीन्द्रनाथ यांनी अशा प्रकारची पुष्कळ रचना केली आहे." अशी प्रस्तावना करणारे रा. गोपीनाथ तळवळकर यांनी 'कणिका' हा प्रकार मराठींत आणून त्याच्यासाठीं या लीलारतिजातीची योजना केली आहे. ते म्हणतात,

(३) "काळाच्या पुलिनीं ठेवा निज पाउलें
हे थोर जनांनी सदैव उपदेशिलें;
परि दिनरात्रीच्या तुफान लाटांमधे
हे धुवूनि निघतें वाळवण्ट नेहमी,
नच पदचिन्हांच्या शाश्वततेची हमी." (विविमा १९३०)

(४) "ही मोट भरे भरभरा, चढे करकरा,
विहिरींत बघा वाकुनी जरा धाकुनी,
पाण्यांत लई भोवरे, फेस गरगरे,
हे काम राहिलें, करा, कसा कम्बरा." (देनाघ-सुगी ७८)

या गीतांतील मात्रावलींत दुसऱ्या आवर्तनांतील तिसऱ्या मात्रेनन्तर खण्डन आहे. 'शेत्याची शीळ' (सुरेश-कभा ४०) या पद्यांतहि याच ठिकाणीं खण्डन आहे.

पुढील कवितांत ध्रुवपदें भिन्न भिन्न असलीं तरी कडवीं [-। प । प । ~ +] या मात्रावलीच्याच चतुष्पदीचीं असल्याने त्यांची जाति लीलारति हीच ठरेल.

(५) "मज विफल गमे गे जीवित माझें सखे!
सुख किती जरी ऽऽ उणिव ही परी मिळति न शिशुचे मुके. ध्रु०

मी शिवत बसूं गे कुञ्ची झबलें कुणा?
मी माझ्या मुखिंचा घास भरवुं गे कुणा?
मुख बघुनि कोणतें स्वर्गहि मानूं उणा?
हो स्वर्गसौख्यही मातृपदाविण फिकें!" १ (यध १४३)

(६) "ही प्रभातकालीं राहुनि धावेवरी
हाकते मोट कुणी सुन्दरी. ध्रु॰
खोविला निरीवर पदर कसुनि कटितटीं,
झळकते कान्ति किति नील आरुणी पटीं!
ही मराठमोळा सुरत रम्य गोमटी,
आसूड उडवुनी मजेंत वाऱ्यावरी?" (राजस-सुगी ४४)

(७) "हासरीं नाचरीं मुलें अशीं हीं गुणी,
धावती भटकती साऽऽरीं हीं अशींच गगनाङ्गणीं. ध्रु॰
हीं उल्हासाने भुरुभुरु येऊनि किती
बघ जमलीं शेजारचीं मुलें भोवती,
ही गळ्यांत घालुनि गळा असें खेळती,
झळकती डोइचा तुरा मधे राहुनी." १ (कोदभि-बाबोमा ५१/८)

३७ **'सन्तति'** [- । प । प । +]

(१) "जो भेद विधीने स्त्रीपुरुषीं केला
देहींच मात्र तो सन्तति-कार्याला." (देशा ११)

(२) "अव्यक्त मूर्ति मी रचितों जगतातें
मृक्तिका घटिं, नगीं सोनें जैसें ते.
हीं माझ्या ठायी जाण सर्व भूतें,
परि त्यांत नसें मी, पाहीं शुद्ध मतें." (गबा)
'त्यज मना कामना विषयाची आता' (खाक ६७) ही कविता या सन्ततिजातींत आहे.

३८ **"मालि-बाला"** [- । प । - + ऽ - ~ । +]

उद्धवमात्रावलीला एक रगणाची जोड दिल्याने ही मात्रावली सिद्ध होते. छन्द:प्रभाकराच्या ५६ व्या पृष्ठावर सांगितलेली नरहरिजाति अशीच आहे. पण नरहरिजातींत अन्तीं रगण चालत नाही,

नगण आणि एक गुरु अशीं चार अक्षरें लागतात. या जातींत असे बन्धन नाही. या मात्रावलीचा अन्तरा पुष्कळदा भूपतिजातींत असतो. पुढील दोन पद्यें मात्र या मालिबालाजातींत आहेत. अन्तरें भिन्नभिन्न आहेत.

(१) "कुणि घ्या हो ताजीं ताजीं हीं फुलें.
घरिं वाट पहाती भाऊ तान्हुले.
घ्या गुलाबजाईचाफा- मोगरा.
कल्याण करिल देवाजी घ्या तुरा.
ही स्वस्त लाविली वेणी,
एकेक कळी अश्रुंनी
आभारयुक्त भिजवूनी
देईन तुम्हांलागोनी, घ्या फुलें." (दक ७४)

(२) "कोठुनी बोल रे येशी मारुता?
धरिशि कां अशा शान्तीशी मारुता?
टाकिलें कुठे गन्धाशी मारुता?
ही तुझी खिन्न वाणी
जणु शुष्क झऱ्यावाणी
मन्नयनिं येइ दिसुनी,
जाहले काय चित्ताशी मारुता?" (टेआ ३/७९)

३९ **पादाकुलक** [। प । प]

१ भामिनि, तुझिया या मधु रागें
वल्लभ होईल दूर कसा गे?
अशोक तुजला दिसोनि येतो
होतां पादाकुलक फुले तो. (२५९)

(२) "त्रिदशपतिमुकुटतटगतमणिगण-
करनिकरसलिलधाराधौत-
क्रमकमलयुगलजिनपतिरुचिर-
प्रतिबिम्बविलयविरहितनिलयात." (पून १)

(३) “मणिगणमुकुटीं दिनकरमेळा
उशनासुरगुरु सुघटित वेळा
कौस्तुभपदकीं तेज विराजे
मण्डित भाळीं मृग मद साजे.” (मुराउ ६४५)

(४) “बघुनि तया मज होय कसेसें,
झुरशि मना, कां भरुनि तुज पिसें? ध्रु॰
हीन दीन मी ब्राह्मण विधवा,
तृणसम जन मज टाकि जणु शवा;
वासना-भुतें भिवविति जीवा,
शरीर जीवा हे थडगेसे.” १ (तासक ११२)

(५) “अशी तुतारी द्या मज आणुनि
फुडिकन जी मी स्वप्राणाने
भेदुनि टाकिन सगळीं गगनें
दीर्घ तिच्या त्या किडकाळीने
अशी तुतारी द्या मज आणुनि.” (केक १०३)

या पञ्चपदीचा उपयोग ‘दसरा’ (गोवा ७०) या कवितेंत केला आहे; आणि ‘सुधारक’ काव्य सबन्ध याच प्रकारचें आहे.

(६) “मज गमे ऐसा जनक तो मांड साचा!
मुख सुरकुतले, मस्तक पिकलें,
शरीर रोगांनी पोखरिलें,
श्मशान ज्याने सन्निध केलें
त्या प्रेताला दुहिता विकितो.” १ (देशा ३७)

(१ “अमृतेश्वर कटिबन्ध जनाच्या रसनेने वदवी” हा अमृतरायाचा स्वत:च्या कटिबन्धरचनेविषयीचा उल्लेख मात्र एका ‘चन्द्रकान्तजातीय पद्याच्या अन्तीं केलेला आहे.)

या पद्यांत ध्रुवपद निराळ्या मात्रावलींचे आहे; पण कडव्यांत पादाकुलकाचीच चतुष्पदी असल्याने या पद्याची आणि यासारख्या ‘कोणता मानूं चन्द्रमा?” (देगुह) या कवितेचीहि जाति पादाकुलकच मानिली पाहिजे. गिरीशकृत ‘भलरी’ (गिफ ४६) हें कुणबाऊ बोलींतील शिथिल पद्य पादाकुलकजातींतच आहे. काही चरण मात्र [प । - - ~ +] असें मुरजयी आहेत.

मोरोपन्ताचें कल्याणरामायण ज्या पज्झटिकानामक पद्यप्रकारांत आहे त्याचा समावेश पादाकुलकजातींत होतो. पज्झटिकेंत पद्माचा पहिलाच प्रकार असतो आणि दुसऱ्या आवर्तनाच्या आरम्भीं गुरु अक्षर असावें लागतें असें छन्दोमञ्जरीकर गडादासाच्या मतें (गछ ६/१५) म्हणतां येईल. पण मोरोपन्त ही दुसरी अट पाळीत नाही.

कटाव वा कटिबन्ध म्हणून जो पद्यप्रबन्ध आहे त्यांत उद्धव द्विपदीचें ध्रुवपद असून पुढे पादाकुलकाच्या काही एका यमकाने जोडलेल्या चरणांचे गट असतात आणि एका गटावरून दुसऱ्या गटावर जायला मध्यें जो पद्माचा अष्टमात्रक अन्तरा असतो त्याच्याशी पुढील गटाचे यमक साधिलेलें असतें. कडव्याच्या अन्ताचा सम्बन्ध यमकाने ध्रुवपदाशी जोडलेला असतो. गटांतील चरणांची सङ्ख्या निश्चित नसते. धावती रचना करायला हा एक सोयीचा पद्मप्रबन्ध आहे. अमृतराय कवीचे कटाव जितके सुप्रसिद्ध तितकेच ते शिथिल आहेत.

४० **'मुरजयी'** [। प । - - ~ + ऽ]

"मण्डितहल्लीशकमण्डलाम
नटयन्राधां चलकुण्डलाम
निखिलकलासम्पदि परिचयी
प्रियसखि पश्य नटति मुरजयी
मुहुरान्दोलितरंतवलयम
सलयं चलयन्करकिसलयम
गतिभडिगभिरवशी कृतशशी
स्थगितसनातनशङ्करवशी" (रूस्तमा २६८)

४१ **"कर्णफुल्ल"** [- । प । - - -]

या मात्रावलींत अन्तीं विराम नाही पण खटका येतो त्यामुळे अन्तीं लघु अक्षर येऊ शकतें. प्राकृतपैङ्गलांतील सिंहावलोकन आणि पञ्झटिका हे पद्यप्रकार या कर्णफुल्लजातींतच बसतात. यांची उदाहरणें

(१) "हणु उज्जर गुज्जर राअदलं
दल दलिअ चलिअ मरहट्ठबलं
बल मोलिअ मालब राअकुला
कुल उज्जल कलचुलि कण्णफुला" (प्रापै १/१८५)

(२) “जे गंजिअ गोला हिबइ राउ
उद्दंड ओड्ड जसु भअ पलाऊ
गुरुविक्कम विक्कम जिणिअ जुज्झ
ताकण्णॅ परक्कम कोइ बुज्झ (प्रापै १/१२६)

(३) “मुनि नारद नारायणवाणी
ऐकुनी हासे पिटि पाणी.
किति उत्सुक होशी गोपाला,
मनुजापरि करिशी या लीला
तव अन्त न लागे निगमाला,
आनन्दें नयनीं ये पाणी.” १ (किग्र १६)

(४) “सरदारि तुझी ती नको अम्हां!
लखलाभ आमुचा गरिबपणा.
या जगीं आमुचे अम्ही असूं,
इतरांना तैसे इतर दिसूं.” (टेआ ३/१०३)

‘वीजपाऊस’ (सुमौ २५) आणि ‘मोत्या’ (माशि १५) या कविता या कर्णफुल्लजातींत आहेत.

४२ **‘राजसा’** [- । प । + ऽ ~ +]

“मन्मानस-हंसा **राजसा**,
कां विषयीं टपशी काकसा? ध्रु॰
जे विषयजनित बघ भोगही
व्यापूनि राहती ही मही
ते प्राप्त कराया धर्महि
सोडूनि बसशि रे भ्याडसा.” १ (पस्वै २९)

४३ **‘अचलगति’**, “बालानन्द” [। प। - - +]

(१) “दीनजनावन दाशरथी
चरित सरस दे अचलगती.” (निक १/३)

(२) "तारकदीक्षा देऊनिया
भजनी कर्णे लेऊनिया" (केस्वा-पस १/३५६)

(३) "दिवस बोलतो, 'उठा झणी'
रात्र, 'विसावा घ्या' म्हणते,
या दों वचनीं दिनरजनी
बहुत सुचविती मज गमतें." (केक १६२)

(४) "अजि पुनवेची शारदि रात
झिङ्त आला तारानाथ
आल्या मुखरिणी या बाहेर
चन्द्राभोवति धरिती फेर." (तासक १५०)

केशवस्वामीची या जातीची रचना विपुल आहे. निरज्जनमाधवकृत 'निर्वोष्ट राघवचरित,' नि निरज्जनमाधवाच्या श्रीज्ञानेश्वरविजयाच्या ८ व्या अध्यायाचा उत्तरार्ध हीं या जातींत आहेत. 'भृङ' (केक ६३), 'निर्झरास' (बाक १४), 'कारन्जें' (च १०३) इत्यादि कवितांत अन्तरा नाही. 'हरपलें श्रेय' (केक १९६) या आणि अनेक सुप्रसिद्ध कवितेंत पद्मगणाचा अन्तरा असतो. 'आवाहन मन्त्र' (तासक २०) या कवितेंत मात्र अन्तरा [। - - +] या मात्राअलीचा आहे.

४४ **'उद्धवा'** [- । प । - +]

हें नाव मध्वमुनीश्वराच्या 'उद्धवा शान्तवन कर जा' (ममुक ६३) या सुपरिचित पदावरून घेतलें आहे.

(१)"उद्धवा सुखी आहे की
तो मनमोहन हरि माझा? ध्रु॰
उद्धवा, जन्मला येथे
हरि, पाहीं त्याची न्हाणी.
या स्थळीं घातले पायीं
कृष्णास उष्ण मी पाणी.
ऐकुनि त्या हरिशी छळिले
गोपींची बहु गाऱ्हाणी

पाठविला धेनूपाठी,
त्याची ही घोडगडि-काठी.
घालितां जेवुं या ताटीं.
वदला मज पान्हा पाजा
तो मनमोहन हरि माझा." १ (राप्रा-पस ३/२८२)

(२) "दुन्दुभी दुमदुमें भारी,
बिजली जशि चमके स्वारी! ध्रु॰
दुन्दुभी दुमदुमे भारी,
नभमण्डल भरिती भेरी,
किती धुन्द दिशा या चारी!
रणकन्दन माजे भारी!" १ (तासक ४७)

या जातींत अगणित कविता आहेत. 'राजहंस माझा निजला' (गोवा ६५) आणि तिवारीकृत 'मर्दानी झांशीवाली' या दोन कवित विशेष प्रसिद्ध आहेत. जळगावचे कवि दु. आ. तिवारी यांची सुप्रसिद्ध सङ्ग्रामगीतें याच उद्धव जातींत आहेत. 'मुरली' (गोवा ९९) या कवितेंत, पुढील ध्रुवपद जोडून म्हणतां यावें म्हणून कडव्याच्या अन्तींचा ईकार ऱ्हस्व केला असला तरी तो दीर्घ घ्यायला अडचण नाही. तसे केलें म्हणजे गोविन्दाग्रजांची 'मुरली' ही सुप्रसिद्ध कविता उद्धवजातीचीच ठरते.

(३) "हे प्रभो विभो ऽऽ अगाध किति तव करणी
चान्दवा नभाचा केला,
रविचन्द्र लटकती त्याला
जणु झुम्बर सुबक छताला,
मग अन्थरिली ही धरणी." १ (कोमू)

आणि मग या चालीवरील 'प्रीतीचें गाणें' (गिआ १०६) हेंहि उद्धव जातीचेंच ठरतें. आर्षरचनेंत अन्त्य गण केव्हा केव्हा (~ +) असा आढळतो.

(४) "नग पलून जाऊं तु नारी,
जरा थाम्ब फीर माघारी!
त्यो मोऽर तू मोरिन
का जातिस त्येला टाकुन
मागं लागून माझा धनी
आला धावत कुत्र्यावानी." १ (देमृ ८)

यशवन्तकृत ‘न्याहारीचें गाणें’ (यध १२१) ही कुणबाऊ बोलींतील कविता याच प्रकारची आहे.

४५ **‘आनन्दरस’** [- । + ऽ ~ - - । - +]

(१) “आनऽन्दरस हा प्याला
भवताऽप शान्तचि झाला.” (?)

(२) “कमलांऽत मधुकर आला,
आकऽण्ठ तो मधु प्याला,
तरिहिऽ न तृप्त जहाला,
उठवेऽ न तेथुनि त्याला. (बेश्रीगो-यमा ४७-४८/९०)

४६ **‘शुद्धसती’** [। प । - +]

(१) “शुद्धसतीव्रतविता
अहमतिनिर्मलचित्ता
प्रथयसि सुजनविमुक्तम
नर्मदं किमयुक्तम” (रूस्तमा २७१)

(२) “नारायण नारायण जय गोविन्द हरे
नारायण नारायण जय गोपाल हरे ध्रु॰

करुणा पारावारा
वरुणालय गम्भीरा १
घननीरदसङ्काशा
कृतकलिकल्मषनाशा” २ (बृस्तो ५१)

(३) भावें भज त्यासी भज त्यासी. ध्रु॰
दाखवि सर्वनिवासी
चिन्मय भाग्यविलासी
केवळ निजसुखराशी
भजनें भवभय नाशी. (केस्वा-पस १/६९४)

(४) “विवेक जागा केला म्हणुनी सुख झालें, सुख झालें. ध्रु॰

अनुभवतरुवरि चढलों
समाधिडोहीं बुडलों
अद्‌वयरामीं जडलों
स्वयम्प्रकाशें घडलों." (केस्वा-पस १।३३२)

४७ **'पर्वती'** [नि । प । ~ +]

(१) "हीच का नानांची पर्वती?
खाली हत्ती झुलती किती?
वाजे सनइ गोड मञ्जुळ
वाटे गातो की कोकिळ." (अना १२)

(२) "मी झुरत सदा अन्तरीं, नाथ कधि येतिल गे मन्दिरीं? ध्रु॰
वाजतें हळुच कुठे पाऊल
तीच हो श्रवणांची चाहुल
पडे का अशी मनाला भुल
झालि गत चुकल्या हरिणीपरी." १ (सोका २८)

'माझ्या सोपीचा मृत्यू' (सुमौ ७४) ही कविता या पर्वतीजातींतच आहे.

४८ **'भरतखण्ड'** [- । प । ~ +]

(१) "हा भरतखण्ड आमुचा!
त्याच्याचसाठि कीं जगूं
त्याच्याचसाठि की मरूं
जो देव साच आमुचा,
हा भरतखण्ड आमुचा." (टेआ ३/१७६)

(२) "जणु नील मण्यांच्या द्रवीं
पाचूचा पडला खडा,
तेंच हे जुवें जरि खरें,
या खड्यास गेला तडा.

मेघांच्या अजुनी इथे
स्वागता सज्ज जरि कुडे,
नच दिसती आता परी
हासरीं इथे स्त्रावडें."
(माधव-नजी दिवाळी अङ्क १९३५)

'शोफर (माअ १९) ही कविता या भरतखण्डजातीची आहे.

पुष्कळदा या जातीच्या पद्यांत त्रिपद्यांची माला असते आणि ध्रुवपदच तेवढें सूर्यकलेचें [। प । ~ +, नि । प । ~ +] असतें (पृ ३३७ पहा).

(३)"सुरेख सङ्गम किती ऽ कृष्णा भेटलि कोयनेप्रती. ध्रु॰
किति विशाल तट हें अहा!
प्रिय सखे, उभी तू रहा,
क्षण येथिल शोभा पहा." १ (मानुक ११९)

पुढील पद्यांत प्राचीन बायकी पद्यांतील शैथिल्याचें अनुकरण आहे.

(४)"गेलें तुझ्यावर जडून रामा, मन गेलें तुझ्यावर जडून! ध्रु॰
किति नटून सजून मी आलें!
किति अलङ्कार हे ल्यालें!
किति नाजूक गेलें बाइ होऊन!" १ (गिका ८६)

(५)"सखे गे प्रशान्त किति यामिनी ॥ ही तशीच जलवाहिनी. ध्रु॰
ही विशाल कितितरी
तव उदार हृदयापरी!
करूं विहार चल तीवरी." १ (यध १४५)

४९ '**भुवनसुन्दर**' [उ । प । +]

(१) "आरती भुवनसुन्दराची
इन्दिरावरा मुकुन्दाची"

या सुप्रसिद्ध प्राचीन पद्यावरून या जातीचें नाव ठेवण्यांत आलें आहे.

(२) "गड्यांनो, घ्या हरिच्या नामा!
लिहितां कशास ओनामा?" (विप ४९)

(३) “सुकालीं भूमी पेरियली,
फलाशा महा मनीं धरिली.” (किग्र ४१९)

या जातीच्या काही पद्यांत (उ । - ~) या मात्रावलीचा अन्तरा असतो. पण

“सन्तत धरि तू सनमतिला
मनुजा, भज भज यदुपतिला”
आणि “हाती धरुनि नरा माला
का रे स्मरशि न रामाला”? (खाक ७४)

(४) “सुरवर-मधुकरसत्कमला,
शेजारती करूं तुजला. ध्रु॰
रञ्जितजटाजूटगङ्गा
उमावदनाब्जदृष्टिभृङगा
गुणगणमण्डितभस्माङ्गा
कोटिरविदीप्ति वदनि झळके
फणामणि सर्वाङ्गीं झळके
जेवि धगधगित
वीज झगझगित
गौरि चकचकित,
चकवी विधि-हरि-नेत्रांला. १” (किग्र ८२)

“न हे दिन सौख्यविलासाचे” (विक १२०) आणि ‘नटेश्वराची आरती’ (तासक १२५) या कविता या भुवनसुन्दरजातींत आहेत.

५० **‘सिंहनाद’** [- । प । +]

(१) “गोविन्दा रामा हो,
गोपाळा रामा जी. ध्रु॰
जय भीमातिरवासा
भवभऽयहारका जी
गोकूळगोपवेषा
रुक्मिणीनायका जी
दिनबन्धु दीननाथा

भवतापहारका जी
पावना विश्वपाळा
चित्सौख्यदायका जी." (देक २८)

(२) "स्वातन्त्र्यदेवतेचा
गाऊं या धन्यवाद;
पर्वणी थोर आली
गर्जवू सिंहनाद!" ध्रु॰
सौभाग्यतिलक लावी
हिन्दभू आज भाळीं.
स्वातन्त्र्यमन्दिराची
स्वामिनी पूर्ण झाली
हिमधवल यशोध्वज तो
फडकवी अन्तराळीं,
आजचा दिव्य महिमा
वर्णितां थकति वेद." १ (उपो ७१)

देवनाथाचें 'सद्‌गुरू मायबापा । ये त्वरें नाथराया' हे पद्‌यहि याच सिंहनाद जातींत आहे. सड्‌गी निस्सडग महाराष्ट्ररड्‌ग हा एक पिशड्‌ग

५१ **"पिशड"** [। प । +]

"भगव्या बाण्याचे
असड्ख्य रणगाजी
कलिजा रायाचा
परन्तु तानाजी
काटक उमराठी
मराठि उमराव
मालुसरा मर्द
रण-रुस्तुमराव
रण-रुस्तुमराव
चौं मुलुखीं नाव." (माधव, सुवर्ण-सप्टेंबर १९३४)

५२ **'रेवती'** [- । - + ऽ - ˜ । + ऽऽ +, - । - + ऽ - ˜ । +]

(१) "रुचती कां तीर्थयात्रा या समयीं त्यास ती?
मजवरची प्रेमबुद्धी कां हरिची लोपती?
दादांना अन्धजांची भक्ती कां लागती?
या कृत्या साह्य होती कां वहिनी रेवती?" (किग्र ४८७)

(२) "शैवालें युक्त जैसें पङ्कज ते शोभतें,
शशिमाजी लाञ्छनाची बहु शोभा दीसते,
तैशी ही वल्कलाने किति नामी वाटते!
जातीच्या सुन्दरांना काहीही चालतें." (किग्र ३२९)

विनायककृत "पन्ना" (विक १९) हे काव्य या रेवतीवृत्तांत आहे.

५३ **'धात्री'** ------------------------------------------

५४ **'शारदा'** ---------------------------------------

५५ **'मोहिनी' वा**
**'महाराष्ट्रलक्ष्मी'**--------------------------------

५३ **धात्री** -----------------------------------

"माय-बाप रूपें धरिशी,
योग्य समय पाहुनि देवा,
पूर्ण बालकाशा करिशी. ध्रु.
झोप मुला लागे रात्रीं,
सुखे निजे ते तव गात्री,
पाजिशी स्वरस तू धात्री
तृषा त्या नकळतां हरिशी." १ (सुभाल)

५४ **'शारदा'** -----------------------------------

शारदा हे नाव देवलकृत ‘जरी कुणा श्रीमन्ताची सून होय शारदा’ या चरणावरून दिलें आहे. त्या पद्याच्या कडव्याची घटना निराळीच आहे.

(१) “प्रिया काय घेतां निद्रा मृत्युची भयङ्करा?
उठा अहो धीरा वीरा शूरसिंह सुन्दरा! ध्रु॰
सोडुनिया पाठीवरची रक्तमिश्र भाकरी
दोन प्रहर भरले कान्ता, करा चला न्याहारी,
तुम्हांवीण सेना सारी लेश अन्न ना वरी,
उठा चला येतिल आता शिवप्रभू गम्भिरा!” १ (गोक ४०)

याच कवितेंतील इतर कडवीं पुढील म्हणजे मोहिनीजातींतील आहेत.

५५ **‘मोहिनी’ वा**
**‘महाराष्ट्रलक्ष्मी’** -----------------------------

(१) “महाराष्ट्रलक्ष्मी मातें जगीं धन्य वाटे,
यशोगीत तीचें गातां मनीं हर्ष दाटे.
पूर्व दिव्य ज्यांचें त्यांना रम्य भाविकाळ,
बोध हाच इतिहासाचा सदासर्वकाळ,
कासया वहावी चिन्ता मनीं मग जहाल?
रात्र सरे तेव्हा उगवे दिनहि पूर्ववाटे.” १ (विक ६)

(२) “सोड सोड आता अपुल्या गोड मोहिनीला!
मधुर गान ऐकायाला जीव हा भुकेला. ध्रु॰
जोड नको सारङ्गीची साथ द्यावयाला,
नको गडे वीणेवरती फिरवूं उङ्गुलीला,
सूर नको, ठेवी खाली ठेव सतारीला,
एक तार ही बोलेना ऐकुनी सुराला!” १ (गिका १४३)

‘खरे क्षत्रियब्रीद’ (विक ११५), आणि ‘मनमोहिनी’ (यध १०८) इत्यादि कविता या जातींत आहेत.

मोहिनीचें कडवें एकचरणी असल्यास ध्रुवपद ‘परवशता पाश दैवें ज्याच्या गळा लागला’ या चरणाप्रमाणे लिहिण्यांत येतें. परन्तु ‘ज्याच्या’ या शब्दांतील दुसरे अक्षर उच्चारत: लघु आहे. ते तसें लघु रचिल्यास ध्रुवपद जातिदृष्ट्या रेवती या पद्मावर्तनी मात्रावलीचें होते; अथवा तें [। - ~ ~

- । - ~ - ~ । - ~ ~ - । - ~ -] या भृङ्गावर्तनी मात्रावलीसारखेंहि असेल.

"मज म्हणशी 'भूर जाऊं' आई कुठे सांग तें. ध्रु॰
थवा पाखरांचा जातो उडुनि काय तेथे?" १ (पारा ७०)
"जगताच्या सूत्रधारा लीला तुझी निष्टुरा! ध्रु॰
विसंवाद निर्मुनि सारा हासशी कठोरा." १ (यग ११०)

२ अग्न्यावर्तनी

५६ 'जीवकलिका' [~ - - - । ~ - - - । ~ - - - । ~ - - +] २८, मात्रा
५७ 'वल्लभा' [- - ~ - । - - ~ - । - - ~ - । - - ~ +] २८ मात्रा
५८ 'मध्यरजनी' [। - ~ - - । - ~ - - । - ~ - - । - ~ - +] २८ मात्रा
५९ 'कालगङ्गा' [। - ~ - - । - ~ - - । - ~ - - । - ~ +] २६ मात्रा

५६ '**जीवकलिका'** [~ - - - । ~ - - - । ~ - - - । ~ - - +]

"जरी तू गोड वाणीने मला उपदेश करितास
विमल मी जाहलें असतें सकल जाऊनिया दोष;
परी मग जीवकलिका ही अकालीं फुलुनि येईल,
तिचा हो गन्ध मग अपुरा, खुरटती पाकळ्या लोल." (दे-निमा १३)

निर्माल्यमाला या पुस्तकांतील पूर्वार्ध 'माला' म्हणजे सौ. विमलाबाई देशपाण्डे यांची २२ पद्यें या जीवकलिकाजातींत आहेत.

५७ **'वल्लभा'** [- - ~ - । - - ~ - । - - ~ - । - - ~ +]

(१) "चल वाकुनी बघतेस का? चल वल्लभे बघुं वाकुनी! ध्रु॰
वरती सभोती हे धुकें लांटावरी लाटा किती
तव कुन्तलीं वस्त्रावरी कणिका हिऱ्यांच्या फेकिती!
वेणींतल्या पुष्पांवरी जलमौक्तिकें झालीं जमा,
मुख रडलें श्रमविव्हले, धरि सिक्तचम्पकविभ्रमा.
-कां हासशी टक लावुनि अधरोष्ठ दांते रोकुनी-" (गोदल-उषा ४९)

प्राकृतपैङ्गलांतील हरिगीतिकेचें उदाहरण याच जातींत बसेल.

(२) "गअ गअइ ढुक्किअ तरणि लुक्किअ
तुरअ तुरअहि जुज्झिआ
रह रहहि मीलिअ धरणि पीलिअ
अप्पपर णहि बुज्झिआ
बल मिलिअ आइअ पत्ति जाइउ
कंप गिरिवर सीहरा
उच्छलइ साअर दीण काअर
बइर बड्डिअ दीहरा" (प्रापै १/१९३)

(३) "सीतावरं गुणसागरं भज सादरं अनुवासरम
कनकाम्बरं रविभास्करं दमितासुरं करुणाकरम" (विदम ३६)

गज्जलाञ्जलींतील 'मूक मागणी,' 'तू आणि मी,' 'निर्माल्यसमर्पण, 'तेथेच,' 'येथेच' आणि 'प्रेमाचा उदय' (पृ. २५-३०) या कवितांत प्रत्येक गणाच्या पहिल्याच गुरूच्या ठिकाणीं विकल्पाने दोन लघू येत असले तरी त्या कविता या वल्लभाजातींत आहेत असें म्हणायला प्रत्यवाय नाही.

५८ '**मध्यरजनी**' [- ~ - - । - ~ - - । - ~ - - । - ~ - +]

"जाहली मम मध्यरजनी, झोपतों मी गाढ शयनीं. ध्रु॰
जाग तू भरदिवस तव ये, तीव्र तापें ताप सखये,
मित्र-मैत्री जोड समयें, विसर मज दे ठाव न मनीं," १ (सुजी)

"काय घेऊनि करिशी छाया? ज्योतिवाचुनि दीप वाया! ध्रु॰
सोड सुहृदा तू तृषा ही, हो न अन्तरि खिन्न काही,
प्रेम देतों घे सदाही, स्नेह जडला सुदृढ व्हाया!" (सुभा)

५९ **'कालगडा'** [- ~ - - । - ~ - - । - ~ - - । - ~ +]

"ऐकला हा जीव जोंवर फिरत होता या जगीं
अन्धतेने काळ नेई, जात तिकडे सहजची.
कालगडा ओढि सृष्टी काष्ठवत शून्याप्रती,
प्रीतिमय तव दृष्टिने मज विलग केलें त्यांतूनि." १ (देनिमा ३७)

निर्माल्याला या ग्रन्थाचा ‘निर्माल्य’नामक उत्तरार्ध म्हणजे रा.पु.य. देशपाण्डे यांचीं २६ पदें ही या कालगडाजातींत आहेत. ‘निशागीत’ (माजूग ५१) हेंहि याच कालगडाजातींत आहे.

३ भृङ्गावर्तनी

| | |
|---|---|
| ६० ‘सुखराशि’ | [। भृ । भृ । भृ । भृ । - +] २८ मात्रा |
| ६१ ‘दासी’ | [। भृ । भृ । भृ । भृ] २४ मात्रा |
| ६२ ‘मदनरड’ | [। भृ । भृ । भृ । - ˜ +] २३ मात्रा |
| ६३ ‘परिलीना’ | [। भृ । भृ । भृ । - +] २२ मात्रा |
| ६४ ‘रुचिरवदना’ | [- । भृ । भृ । भृ । +] २२ मात्रा |
| ६५ ‘धवलचन्द्रिका’ | [। भृ । भृ । भृ । +] २० मात्रा |
| ६६ ‘जीवनलहरी’ | [। भृ । भृ] १२ मात्रा |
| ६७ ‘विनोद’ | [- । - ˜ - ˜ । - +] १२ मात्रा |
| ६८ ‘रसना’ | [विनोद द्विरावृत्ता] |
| ६९ ‘कामदा’ | [। - ˜ - ˜ । + ॥ - ˜ - ˜ । +] |
| ७० दिण्डी | -------------------------------- |

६० **‘सुखराशि’** [। भृ । भृ । भृ । भ । - +]

थाम्ब जराशी
चपलचरण सखि, जाशी? धृ॰
मुरड परत, अशी त्वारति, बघिन खचित पळ या दिव्याशी.१
भरूं दे मन, करित मनन मग रेखिन सखि या चित्राशी. २
पुसतिल जन, रमणि कवण? मी म्हणेन केवळ **सुखराशी**.” ३
(तासक १६९)

६१ **‘दासी’** [। भृ । भृ । भृ । भृ]

या जातीचें नाव “दासि असें मानुनिया कार्य मला सांगतसे’ (देमृ १९) या पदावरून घेतले आहे.

(१) “गगनाच्या पोकळींत भिरभिर वारा वाहे,
आनन्दुनि मुक्त मनें पक्षीगण उडताहे;

वाऱ्यवरि सुटलेले दोन सुबकसे पतङ्ग
विहरोनी भूषविती गगनाचें अन्तरङ्ग." (कास्फू १२१)

(२) "डोळे हे जुलमि गडे रोखुनि मज पाहुं नका.
जादुगिरी त्यांत पुरी, येथ उभे राहुं नका.
घालुं कशी कशिदा मी? होती किति सांगु चुका!
बोचे सुइ फिरफिरुनी, वेळ सख्या, जाय फुका.
खळबळ किति होय मनीं!
हसतिल मज सर्वजणी.
येतिल त्या सन्धि बघुनि आग उगा लावुं नका!" (तासक ५)

६२ **'मदनरङ्ग'** [।भृ । भृ । भृ । - ~ +]

(१) "वदन **मदनरङ्गसदन** हे त्वदीय सुन्दरी,
नयन रङ्गभूमि तिथे नटत तो नटपरी.
विविध तो करी विलास भूषवोनि त्या करीं;
कधि चपलेसम चमके; स्थिर कधी ध्रुवापरी." (तासक ३८)
(२) "गान पुरे हास्य पुरे दूर फेक बासरी;
होवो तिमिरांत लीन ही उषाहि हासरी." (रेक १/१७३)
'महाराष्ट्र-यशोगीत' (कुयशो ८१) हें याच मदनरङ्ग जातींत आहे.

६३ **'परिलीना'** [। भृ । भृ । भृ । - +]

(१) "राधे निजकुण्डपयसि तुङगीकुरु रङ्गम
किं च सिञ्च पिञ्छमुकुटमङ्गीकृत भङ्गम
अस्य पश्य फुल्लकुसुमरचितोज्ज्वलचूडा
भीतिभिरतिनीलनिबिडकुन्तलमनुगूढा
धातुरचितचित्रवीथिरम्भसि **परिलीना**
मालाप्यातिशिथिलवृत्तिरजनि भृङगहीना" (रूस्तमा २८४)

(२) "घडिघडिघडि चरण तुझे आठवती रामा!
हीन दीन आस तुझी पूर्णकाम आम्हां." (केशवस्वामी)

(३) "अजुनि चालतोचिं वाट माळ हा सरेना,
विश्रान्तिस्थळ केव्हा यायचें कळेना.
कुठुनि निघालो, कोठे जायचें न ठावें,
मार्गांतच काय सकळ आयु सरुनि जावें?
पुरे पुरे ही असली मुशाफरी आता!
या धूळिंत दगडावर टेकिलाच माथा." (रेक १/४००)

केशवसुतकृत 'आईकरिता शोक' (केक १५९) आणि यशवन्तकृत 'झाल्या तिनि सान्जा' (यग ३६) या कविता या परिलीनाजातींत आहेत.

६४ **'रुचिरवदना'** [- । भृ । भृ । भृ । +]

"तेथेच गड्या, राहि उभा क्षणभरी तरी.
जन नयन मधुर **रुचिर वदन** पाहुं दे हरी.
बघ टाकुं नको एकहि रे पुढति पाऊला,
नच घेई तिळाहि पाठीशी तेवि त्या जला,
मुळि इकडे ना तिकडे ना वळविं दृष्टिला;
रे स्थिरनयनें स्थिरचरणें स्थिरपणा धरिं." १ (टेआ ३/१३६)

'वैशाखमासिं' (किग्र ४५२), आणि 'प्रीतीस पात्र॰' (किग्र ४६५) या पद्यांत कडव्यांतील अन्त्य चरण निराळ्या म्हणजे धवलचन्द्रिका मात्रावलीचा असल्याने त्यांची जाति वेगळी होऊन ती विषमजातींत पडते (पुढे कामना पहा).

६५ **'धवलचन्द्रिका'** [। भृ । भृ । भृ । +]

(१) "धन्य दिवस आज साधुसङ्ग लाधला!
सर्वहि शुभयोग पर्वकाळ साधला." (गोव-पस २/३०३)

(२) "**धवलचन्द्रिकाच** काय पूर्ण साचली,
सत्पुष्पें अथवा जलरूप पावलीं?
स्फटिक शिलामन्दिर हें काय भूमिचें
कीं द्रवले विमल हास्य चन्द्रमौलिचें
विरघळलेले शुभ्र मेघ काय शरदिंचे,
कीं निर्मळ साधुमनें सकळ वितळलीं?" (देशाप ४/२)

गोव-पस (२/३०५), श्रीपाद कृष्ण कोल्हटकरकृत 'महाराष्ट्रगीत,' गोविन्दाग्रजकृत 'निद्रागीत' (गोवा ३८), आणि उपाध्येकृत 'बाळ' (उपो २३) इत्यादि कविता या धवलचन्द्रिकाजातींत आहेत. आपल्या 'गोमान्तक' काव्यांत धावत्या दीर्घ रचनेसाठी या जातीचा उपयोग महाराष्ट्रभाट विनायकराव सावरकर यांनी करून दाखवून तीस नवें महत्त्व प्राप्त करून दिलें आहे. तथापि ही जाति नवीन आणि स्वकृत आहे अशा समजुतीने त्यांनी तिला वैनायक असे जे नाव दिले आहे ते योग्य नाही. 'नोहे हा जवन पवन' (देमृ ५५) या पद्याच्या कडव्याची घटना वेगळी असल्याने तें या धवल चन्द्रिकाजातींत बसूं शकत नाही.

६६ **'जीवनलहरी'** [। भृ । भृ]

(१) "उदय हृदय समज नरा
शमन शमन शमन शमन.
उतराया भवजलधी
वासना समूळ वधीं,
भणभरही विषयिं कधी
रम न, रम न, रम न, रम न." १ (खाक ६५)

(२) "एक करीं मधुगीतें
हात तुझा अन्य करीं
शीळ निशा वाजविते
चन्द्रकला डोइवरी,
पर्णावर अर्धफुल
वाऱ्यांतुनि गन्ध हले,
स्वर्ग कुठे? स्वर्ग कुठे?" (कुजी)

कुसुमाग्रजकृत जीवनलहरी हे काव्य समग्र आणि 'अन्तरङ्ग उघडतांना' (पपि १) हीं या जातींत आहेत.

**कडाका** हा एका कटिबन्धासारखाच धावता पद्यप्रकार आहे. कटाव पद्मावर्तनी असतो तर कडाका हा भृङ्गावर्तनी दिसतो. यमकें चरणान्तच असतात असें नव्हे. ती चरणादिकहि असतात.

'कृष्णगीत गात गात समाधिस्थ उभा राहि, शुभाचरणसहित सर्व सुभाषणें आवरोनि नभामधे उभारिला' इत्यादि (अक ९) पहा.

६७ **'विनोद'** [- । - ˜ - ˜ । +]

"जाता अता कशाला?
आलांत मग कशाला?
ही जाळपोळ करुनी?
जातां कसे पळोनी?
हृदयांतल्या हिऱ्याला
जा ठेवुनी हवाला.
कां लागलात जाया?
केला विनोद राया!
मीतूपणा निमाला,
रागावतां कुणाला?" (घा-मधुमा २३)

६८ **'रसना'** [- । - ˜ - ˜ । - +, - । - ˜ - ˜ । - +]

"रसने न राघवाच्या थोडी यशात गोडी. ध्रु॰
निन्दास्तुती जनांच्या, वार्त वधूधनांच्या,
खोट्या व्यथा मनाच्या, काही न यांत जोडी."
(मोस्फुका ४/२०६)

पृ. २९९ वर अनुराग या वृत्ताखाली दिलेलीं उदाहरणें पहावीत.

६९ **कामदा** [। - ˜ - ˜ । + ॥ - ˜ - ˜ । +]

"कृष्णवस्त्र हे भयद घेऊनी
अखिल विश्वही त्यांत झाकुनी
रमणिसङ्गमा हृदयिं उत्सुक
जाय अष्टमी-कुमुदनायक." (तासक ८)

ही 'मार्गप्रतीक्षा' नामक कविता सबन्ध या कामदाजातींत आहे. ज्या वृत्ताला कामदा हे नाव केव्हा केव्हा देतात त्याला मन्दारमरन्दचम्पूकाराने दिलेलें मरालिका हे नाव निश्चित केलेलें आहे.

७० **दिण्डी** दोन व्रीडा (˜ - - -) वा पुष्प (- ˜ - -)

या गणांच्या मध्ये एक रगण वा तगण घातल्याने दिण्डीचा चरण सिद्ध होतो.
अन्त्य आणि उपान्त्य ही अक्षरें गुरु हवींत; इतरत्र एका गुरूच्या ठिकाणीं दोन लघू चालतात.

(१) घोष ऐका 'ग्यानबा तुकाराम!'
राउळाची ही वाट सुखाराम!
गूढ भक्तीची दाखवीत लीला
पहा दिण्डी चालली पण्ढरीला. (२६१)

(२) "मणी पडिला दाढेसि मकरतोण्डीं
सुखे हस्तेंची काढवेल प्रौढीं;
परी मूर्खाचे चित्त बोधवेना
दुधीं कूर्मीच्या पाळवेल सेना." (तुकारा पृ. २/५८८)

हें ४२८० वे पद्य द्वादशपदी आहे. वणीकर गोविन्दकवीचें 'काय सांगू सौदर्य मानवीचें' (पस २/२९२) आणि आनन्दतनयकृत पूतनावधांतील 'कथा ऐके कल्याण कौरवेशा' आणि 'देव जाणे हा भाव सखे माझा' आणि पुढील पद्यहि हीं सारी दिण्डी जातीचीं आहेत. ध्रुवाव्याख्यानांतील दिण्ड्यांची रचना शिथिल आहे परन्तु एरव्ही इतकें बान्धेसूद लिहिणाऱ्या रघुनाथपण्डिताच्या दमयन्तीस्वयंवरांतील दिण्ड्यांची रचना शिथिल असावी याचें मात्र आश्चर्य वाटतें.

(३)"रामानामाची गती कोण जाणे?
जाणताती कैलासपती राणे. ध्रु॰
किटकपक्ष्यादी मोक्षपदी जाती
तेथ इतरांची कोण कथा गा ती?

मन्त्र माझ्या शिकविला मायबापें,
म्हणे गेलीं आनन्दतनय पापें."
सर्वसङ्ग्रह मासिकांतील पदसङ्ग्रह (१/४)

४ हरावर्तनी

७१ 'किडिकणी' [। - - ~ । - - ~ । - - ~ । - - ~]
७२ 'अविनाशी' [। - - ~ । - - ~ । - - ~ । - -]
७३ 'दन्तरुचि' [। - ~ - । - ~ - । - ~ - । - ~ - । - ~ - । - ~ - । - +]
७४ 'वरमङ्गला' [। - ~ - । - ~ - । - ~ - । - ~ -]
७५ 'सुरमन्दिर' [। - ~ - । - ~ -]

७६ 'वीणावती' [। ~ - - । ~ - - । ~ - - । ~ -]

७१ '**किडिकणी'** [। - - ~ । - - ~ । - - ~ । - - ~]

(१) "णवजलहरेहिं व जललब मुअंतेहि
दढकढिणपविवलय परिबद्धदन्तेहिं
रणझणिय मणि**किडिकणी**सोहमाणेहि
अणवरयपरियलिय करडयलदाणेहिं" (पुणा ७/१३/१)

णायकुमारचरिउ या प्राकृत काव्यांत ७ वा सन्धि, १३ वे कडवें, ९ वा सन्धि, २० वें कडवें हीं या जातींत आहेत.

(२) "उरला दिवस अल्प, घोडें थकुनि चूर
पथ रानिं चढणींत, घर राहिलें दूर. ध्रु०
असशील घरिं आज, तू गे बघत वाट,
प्राण स्वनयनांत, पोटांत काहूर"! १ (तासक २०४)

७२ **'अविनाशि'** [। - - ~ । - - ~ । - - ~ । - -]

**"अविनाशि** सुख ते ऽ मज पामराला
प्रभु दइ तर शोक करूं मी कशाला?
स्वर्गी नसे दुक्ख, मरणाचि वार्ता
परि प्रीति सुखशान्ति प्रभुची मनाला." (उस ६३५)

७३ **'दन्तरुचि'** } [। - ~ - । - ~ - । - ~ - । - ~ - । - ~ - । - ~ - । - -]

"वदसि यदि किञ्चिदपि **दन्तरुचि**कौमुदी हरति दरतिमिरमतिघोरम
स्फुरदधरसीधवे तववदनचन्द्रमा रोचयति लोचनचकोरम
सत्यमेवासि यदि सुदति मयि कोपिनी देहि खरनखरशरघातम
घट्य भुजबन्धनं जनय रदखण्डनं यनें वा भवति सुखजातम"

हा (गीगो १९ वा) सबन्ध प्रबन्ध या दन्तरुचिजातींत आहे.

७४ '**वरमङ्गला**' [- ~ - । - ~ - । - ~ - । - ~ -]

वरमङ्गला हे नाव ज्या प्राचीन प्राकृत पद्यावरून दिलें आहे ते पद्य मागे (पृ. २१-२२ वर) दिलेंच

आहे. येथे काही एकीकडेला पडलेलीं उदाहरणें देतो.

(१) "विकचकर्णोत्पलस्पर्धितरलेक्षणा:
केलितालक्कणत्कनकमयकङ्कणा:
सरसनखराजिविच्छुरितभुजमण्डला:
काञ्चिकोल्लासवशदर्शितोरुस्थला:" * (सोय १/१५-१६)

(* हे पद्य गद्य समजून गद्यासारखें छापलेलें आहे. परन्तु हे एक नवीन प्रकारचें पण पद्यच आहे हे Dr. A. Venkatasubbiya यांनी प्रकाशित केलें. वस्तूत: हा पद्यप्रकार नवीन नाही.

(२) "या भविष्याचिया दिव्य कारागिरा
कोण रोधील? दे कोण कर सागरा? ध्रु॰
शूल राजा, तुझा रक्त त्यांचे पिवो,
गृध्रगण भक्षण्या पुण्यगात्रां शिवो,
दुर्गिं त्यांची शिरें अधम कुणि लोम्बवो,
अन्त समजूं नको हा नृपा पामरा!" १ (तासक १५८)

गीतगोविन्दांतील १३ वा प्रबन्ध, 'हिन्दभू वाञ्छिते॰' (गोक २४) रेन्दाळकरकृत 'अमृतसरिता जिथे गर्जती उसळती' हे पद्य, 'पूर्णहुति' (तासक २०३) आणि 'रोहिणीस' (पारा १०३) हीं या वरमङ्लाजातींत आहेत.

७५ **'सुरमन्दिर'** [। - ~ - । - ~ -]

"अतुल तव कृति अति भ्रमवि मति ईश्वरा! ध्रु॰
वर्षती मेघजल
शान्तविति भूमितल
सलिल मग त्यजुनि मल
जात सुरमन्दिरा" (गोवा १)

'वधूवरयो: शुभं भवतु!' (तासक १८९) ही कविता याच जातींत आहे.

७६ **'वीणावती'** [। ~ - - । ~ - - । ~ - - । ~ -]

“घुमे नाद तो सुन्दरीच्या करीं
मनीं अन्तरींही विराल्या परी
तशा हृदयिंच्या सर्व तारा त्वरें
म्हणूं लागल्या गान एकस्वरें-
म्हणोनी करीं शान्त झाली गती
विचारान्तरीं लीन वीणावती,
तिने उधळितां नादरत्नाकरा
मनोवृत्ति साऱ्याहि आल्या भरा.” (गोवा १९६)

कोल्हटकरांचे ‘कपोला कपोलाचि ईच्या सरी’ हे पद्य या वीणावतीजातीचेंच आहे.

**वर्ग २ रा**

अर्धसम जाति

१ पद्मावर्तनी

७७ ‘तामसी’ [- । प । प । प । प । - +]
[- । प । प । - +]
७८ ‘विजयिनी’ [- । प । प । प । प । - +]
[- । - + + ऽ ~ । +]
७९ ‘मणिहार’ [- । प । प । प । प । ~ +]
[- । प । प । प । ~ +]
८० “कुसुमवल्ली” [। प । प । - +]
[। प । प । प । प - +]
८१ ‘मन्मथसुन्दर’ [। प । प । प । - - +]
[। प । प । प । प]
८२ ‘सदामण्डिता’ [। प । प]
[। प । प । प । - - +]
८३ ‘सीमारेषा’ [। प । प । प । - - +]
[। प । - - +]
८४ ‘हरिपद’ [। प । प । प । + ऽ ~ +]

| | |
|---|---|
| | [। प । - +] |
| ८५ ‘विहड्गमाला’ | [। - - + ऽ ~ । +] |
| | [। प । प । प । + ऽ ~ +] |
| ८६ “श्रीरंग” | [- । प । प । प । - +] |
| | [- । प । प । - +] |
| ८७ “विषचषक” | [- । प । प । - +] |
| | [- । प । प । - +, - + । - +] |
| ८८ ‘मदनमञ्जरी’ | [- । प । प । प । - +] |
| | [- । प । - +] |
| ८९ ‘रत्नमाला’ | [। प । प । प । +] |
| | [। प । प । प । - +] |
| ९० ‘माया’ | [- - । प । - +] |
| | [। प । प । प । - +] |
| ९१ “रक्षा” | [। प । प । प । - +] |
| | [। प । - +] |
| ९२ “गगनचपला” | [। प । - +] |
| | [। प । प । प । - +] |
| ९३ ‘जन्मभू’ | [- । प । प । प । ~ +] |
| | [- । प । - + ऽऽ - । प । ~ +] |
| ९४ ‘मुद्रिका’ | [- । प । प । ~ +] |
| | [- । प । - + ऽऽ - । प । ~ +] |
| ९५ ‘तर्कयुक्ति’ | [- । प । प । प । ~ +] |
| | [। प । प । प । ~ +] |
| ९६ ‘स्वर्गदारिका’ | [। प । ~ +, उ । प । ~ +] |
| | [- । प । प । प । ~ +] |
| ९७ ‘सवत्सा’ | [उ । प । ~ +] |
| | [- । प । प । प । ~ +] |
| ९८ ‘राजेश्वरी’ | [प । ~ +, उ । प । ~ +] |
| | [। प । प । प । ~ +] |
| ९९ “रणरड्ग” | [। प । प।] |
| | [। प । प । प । ~ +] |
| १०० ‘केशवकरणी’ | [। प । प । प । ~ +] |

[उ । प । ~ +]

१०१ ‘जीवनध्वनि’ [उ । प । प ~ +]

[। प । प । प । ~ +]

१०२ ‘जानकी’ [। प । प । प । ~ +]

[- । प । ~ +]

१०३ ‘यदु’ [- । प । ~ +]

[। प । प । प । ~ +]

१०४ ‘सत्कीर्ति’[। प । प । प । ~ +]

[। प । ~ +]

१०५ ‘नन्दनन्दन’ [। प । ~ +]

[। प । प । प । ~ +]

१०६ ‘नवतरुणी’ [। प । +, उ । प । +]

[- । प । प । प । +]

१०७ ‘शरण’ [- । प । प । प । +]

[- । प । +]

१०८ ‘वल्लिका’[- - । + ऽ ~ + ऽऽ । +]

[- । प । प । + ऽ ~ + ऽऽ । +]

१०९ ‘सुन्दरयादव’ [प । +, उ । प । +]

[। प । प । प । +]

११० ‘स्वतन्त्र’ [। प । प । प । +]

[ । प । +, उ । प । +]

१११ ‘बन्धु’ [। प । प]

[। प । प । प । +]

११२ ‘माधवकरणी’ [। प । प । प । +]

[उ । प । +]

११३ ‘गाधिज’ [उ । प । +]

[। प । प । प । +]

११४ ‘‘मूढा’’ [। प । +]

[। प । प । प । +]

११५ ‘अभिमन्यु’ [उ । - +]

[। प । +, उ । प । +]

११६ ‘‘श्रामती’’ [ । प । प]

[। प । प । प]

११७ 'आर्योद्धरिणी' [। प । - - +]

[। प । प । - - +]

११८ 'चरणरज' [। प । प]

[। प । - - + ऽ ऽ । - - +]

११९ 'कोमलगात्री' [। - । - - + ऽ ऽ । प । - +]

[- । प । प । - +]

१२० 'सर्वगामिनी' [। - - + ऽ ऽ । प । - +]

[- । प । प । - +]

१२१ 'सुखकन्द' [- । प । प । - +]

[- । प । प । +]

१२२ 'बालमनीषा' [- - । प । - +]

[- । प । प । - +]

१२३ 'यशोदा' [- । प । प । - +]

[ - । प । - +]

१२४ 'मदनशर' [- । प । - +]

[- । प । प । - +]

१२५ 'अक्रूर' [- । - - + ऽ ऽ । प । - +]

[- । प । - +]

१२६ 'चन्द्रभागा' [। - - + ऽ ऽ । प । - +]

[ - - । - - +]

१२७ 'श्रीकान्त' [- । प । ~ +]

[उ । प । ~ +]

१२८ 'विजयश्री' [- । - - + ऽ ऽ । प । ~ +]

[- । प । प । ~ +]

१२९ 'चिदघन' [- । प । ~ +]

[- । - - + ऽ ऽ । प । ~ +]

१३० 'सुमकलिका' [। प । +]

[- । प । प । +]

१३१ 'नृपममता' [- । प । प । - +]

[- । प । - +, ऽ - ~ । +]

१३२ ‘मृगपडिक्त’ [- - । - - + ऽऽ । - - + ऽऽ]
[। प । - +]
१३३ ‘शशिकान्ति’ [। प । - +]
[- । प । प ।]
१३४ ‘शशिचारुमुखी’ [। प । + ऽ ~ +]
[- । प । + ऽ ~ +]
१३५ ‘नवरङ्ग’ [। - - + ऽ ऽ । - - +]
[। प । - - +]
१३६ “मुक्ताफलमाला” [प । - +]
[। प । +]

७७ **‘तामसी’** [- । प । प । प । प । - +] मदनतल्वार
[- । प । प । - +] भूपति

“पाहुनी आर्त गणगोत पेटला पोत तयाची
ज्योत तरल जी उठली
हृदयांत एकदा तीच कृतीमधि वठली;
**तामसी** शक्तिला लाथ मारुनी मात ऐन
जोमांत करीं दर वेळीं
बन्धांत कोण कल्लोळ तिचे कवटाळी?” (सा-स्फूमा २।१)

७८ **‘विजयिनी’** [- । प । प । प । प । - +] खण्डित
[- । - + + ऽ ~ । +]

“तळहातीं टेकुनी ही स्वशिरातें बैसली! ध्रु॰
मस्तकीं केश विखुरले, श्वास चालले, अश्रु
लोटले, गळे जळ खाली,
चिन्तेने पोळली.
होती ती सिंहासनीं भाग्यशालिनी धनी

**विजयिनी** परी तिज खाली
दुर्दैवें ओढिली." (विक ८)

'विरही' (विक १०५) आणि 'प्रभुराया धाव' (उस ४०६) या कविता याच विजयिनीजातींत आहेत.

७९ **'मणिहार'** [- । प । प । प । प । ~ +]
[- । प । प । प । ~ +] कमललोचना

"चट उठावल्या घनघटा, पडति पटपटा बिन्दु
कटितटासि बळकट धरा.
आता पूर नद्यासि भरपूर येईल मग शूर
कसा येतो घरा?
हा पवन भयंकर भूवनसख्याविण अवन
कोण करि, पवनघनाहुनि बरा
ही शङ्का मज भयकम्पा देति, कुणि सम्पा-
दणि तरि करा.
किति सञ्चित हिनमति वञ्चित मज गडे
किञ्चित सुख नये दिसून
अतिसुन्दर तनु, कुच मन्दरगिरिसम, कुन्द-
रदन काय असून
अशि मण्डित तनु केली खण्डित पति कुठ
धुण्डित बसला रुसून?
अकलडिकत कुल, मन शडिकत, केलि तनु
अडिकत मन्मथ घुसून,
**'मणिहार'** सकल तनुभार, विकल संसार, करिल कोण
पार? कठिण साकडें!
किति चिन्ता करूं भगवन्ता मनामधि? सन्तापुनि
येतें रडें!" (राला ५६)

८० **"कुसुमवल्ली"** [। प । प । - +] वंशमणि
[। प । प । प । प - +] कपिवीर

"या वेलीवर फुललें मोहक फूल,
कुणि साङ्ग़ावें प्रभुमस्तकिं हे जाईल, अथवा
होय तिथेच मलूल?
हा पडलेला दिसतो फत्तर काळा,
कुणि साङ्गावें पडतिल कण्ठीं माळा, किंवा
लाथा नित्य कपाळा? (फागकृ-ज्ञाप्र २३/२/३४)

८१ **'मन्मथसुन्दर'** [। प । प । प । - - +] हरिभगिनी
[। प । प । प । प] वनहरिणी

"**मन्मथसुन्दर** चिन्मय माधव सन्मतिमोहन नीलतनू
ती रतिसन्निभ, कीरगिरा, नवनीरजनेत्र युगाकृति केली
सत्य सनातन नित्यनिरञ्ज्न कौस्तुभकन्धर लोकमती
पीनकुचा, लघुमीनसुचञ्चल मानवती अभिधान नव्हाळी
तो स्मर, हे रति, तो घन हे विज, तो तरुनायक हीच लता,
मानवरूप, धरानत होऊनि अनन्दनन्दन वन्दित भाळीं." (आपस ८२ नात्र)

कवीला आपले नाव ग्रथित करायचें असल्याने अन्त्यचरणांत भेद पडला आहे. नाहीतर हे मदिरा आणि हेमकला मिळून होणाऱ्या अर्धसमवृत्ताचेंच उदाहरण झालें असतें.

८२ **'सदामण्डिता'** [। प । प] पादाकुलक
[। प । प । प । - - +] हरिभगिनी

"ब्रिटॅनिये जय ब्रिटॅनिये ! ध्रु॰
जगदीशाची तू प्रिय भारी
तोच दयाघन तव कैवारी, तूहि तयाला वश विनयें. १
किती सङ्कटें आलीं गेलीं,
सोपानासम तीं तुज झालीं, **सदामण्डिता** तू विजयें. २" (टिक २२२)

वा. रा बोकिल यांची 'प्रेमा नलगे मुळि कारण तें' (माल ५२) ही कविता या सदामण्डिताजातींतच आहे.

८३ **'सीमारेषा'** [। प । प । प । - - +]
[। प । - - +]

(१) “चित्रपटावर रम्याकृतिच्या **सीमारेषा** परोपरी
रङ्ग कधी वठतील परी?” (गोवा ७८)

(२) “वसन्तांतली फुलली वेली पल्लवपाशीं वृक्ष धरी
वठुनी झाला दीन जरी.
सहस्त्रकर रवि नको, कुमुदिनी हासे बघुनी चन्द्राला
उरली एक कला ज्याला.” (कुमार-रमा सप्टे॰ १९२६)

‘काही इंग्रजी कविता वाचून’ (गोवा ७६) आणि ‘का?’ (गोवा २२९), ‘परक्या देशांतील गृहस्था’ (अशोक १३२) या कविता या सीमारेषाजातींत आहेत.

८४ **‘हरिपद’** [। प । प । प । + ऽ ~ +] प्रियलोचना
[। प । - +] शुद्धसती

“**हरिपद**कमलीं निवास बा ऽऽ करिं मम सतत मना रे! ध्रु॰
धन मिळवाया झिजवुनि काया शेवटिं वदशी ‘हाय!’ रे
सेवुनि धनिकजना रे. १
परवनितेशी लम्पट होशी, ढङ्ग तुझे हे काय रे?
जाशिल यमसदना रे. “ २ (खाक ६५)

८५ ‘**विहङ्गमाला’** [। - - + ऽ ~ । +]
[। प । प । प । + ऽ ~ +] प्रियलोचना

“सुमना डोल रे
**विहङ्गमाला** चित्तविनोदा काढिल मग मधु बोल रे.” (टेआ ३/७१)

८६ **‘श्रीरंग’** [- । प । प । प । - +] भवानी खण्डित
[- । प । प । - +] भूपति

(१) ''**श्रीरंग** गोपिकोत्सङ्ग धरुनि करि रङ्ग
हरी हा बाई!
कुज्जांत मातला वसन्त सांगू काई?'' (राला ८४)
(२) ''कामिनी हंसगामिनी कि सौदामिनी
चमकती व्योर्मी,
सखिवृन्द जाति वारुळा गात आरामीं.
लाऊनी उटण, न्हाऊने, केस उदवुनी
गुम्फुनी वेणी
मुद, चन्द्रकोर, केवडा फुलांची श्रेणी.
सावरून मस्तकावरुन पदर करिं धरुन
चालतां झोकें
स्मरध्वजा गोल नारळी पाठिवर फडके.
श्रीरंगपदाब्जीं दङ्ग पन्त कविभृङ्ग
गुज्जतो रामीं-
सखिवृन्द जाति वारुळा गात आरामीं.''
(वि. सो. सरवटे वाग्विहार १२९)

'हे मना सोड कल्पना' (किग्र ३३६), 'सुकुमार असुनि तू फार' (किग्र ५७३), माधवानुजकृत 'पर्वती' (मानुक ३९) इत्यादि कविता या श्रीरंग जातींत आहेत, 'मला काय मिळाले आहे!' (टिक १०३) या पद्यांत समचरण केव्हा केव्हा [- । प । प । +] असे आहेत.

८७ ''**विषचषक**'' [- । प । प । - +] भूपति
[- । प । प । - +, - + । - +] भवानी

श्रीरंगजातीच्या व्यत्ययाने ही विषचषकजाति सिद्ध होते. समचरणांत तिसऱ्या आवर्तनाच्या मध्यावरच तेवढें खण्डन असतें.

''टाकिला पिऊनि एकदा विषाचा प्याला
प्रीतिचा, तुझ्या हातचा; मीपणा गेला, त्वन्मय झाला.
आन्धळा दाण्डगा बाई! मम विश्वास
चढविलें तुला वर देवच तू मम खासऽया समयास.''
(घा-मधुमा १०)

या लावणींतील इतर द्विपद्यांतील समचरणांत दोन दोन मात्रा उण्या आहेत.

८८ **‘मदनमज्जरी’** [- । प । प । प । - +] भवानी
[- । प । - +] उद्धव

(१) “ही कामाची तल्वार करिल ज्या वार ठार तो समजा
नव **मदनमज्जरी** उमजा.” (देमृ ५४)

(२) ”चहुकडे ढगांच्या माळा,
उभि दरडीवर ती बाला.
वायुची बसे थाप ती, चिरगुटें उडति, केस भुरभुरती,
कां चढली दरडीवरती?” १ (तासक १५५)

ताम्बेकृत ‘जगाहून भिन्न’ (तासक ५) आणि कुमारयशोदकृत ‘आवाहन’ ‘गोड वेड’ (कुयशो ४, ५९) या कविता मदनमज्जरीजातींत आहेत.

८९ **‘रत्नमाला’** [। प । प । प । +] चन्द्रकान्त
[। प । प । प । - +] लवङ्गलता

(१) “येई कविबाला भेटाया रसिकाला. ध्रु॰
इन्दु वितरि तिज रुचिर कान्ति निज, उदधि **रत्नमाला,**
सुगन्ध अर्पी फुलें सुगन्धित, मारुत दावि पथाला.”
(टे-आमा जुलै १९२८)

(२) ”ब्रह्माड व्यापुनि उरला, तो हा धर्मसखा अपुला. ध्रुऽ
ज्या वृक्षाचें मूळ रोविलें शेषशिरावरती
शेवट जाई भेदुनि गगना, शेषभाग या जगतीं.” १ (टेआ ३/९२)

९० **‘माया’** [- - । प । - +]
[। प । प । प । - +] लवङ्गलता

“**माया** मला भ्रमविते वाया
दया करा, तुजवीण कोण मज अन्य क्षम ताराया?
छाया स्वकृपेची गणराया,
दीन लीन या दासावर कर, पोटीं घे अन्याया.
पायां अर्पण केली काया
ध्यान तुझें मानसा लागलें, अन्य सुचे न जना या.” (विक १२८) गोविन्दविकृत “कोठे जाशी

राष्ट्रप्राणा?" (गोक ३०), आणि 'अवमानिता' (तासक १९०) या कविता या मायाजातींत आहेत.

९१ **"रक्षा"** [। प । प । प । - +] लवङ्गलता
[। प । - +] शुद्धसती

"येशि कशाला दारीं
ऐसा ऐन दुपारीं? ध्रु॰
भीक हवी जरि झोळि रिती परि दिसते कां तरि सारी?
रीत दिसे तव न्यारी!
हुकलें खल्बत, नेई गल्बत परमुलुखा व्यापारी,
श्रमशी व्यर्थ किनारीं.
राखेचे थर बसुनि जिच्यावर ठिणगी जी पिचणारी,
फुड्कर तिजसि न मारी." (यग ७०)

९२ **"गगनचपला"** [। प । - +] शुद्धसती
[। प । प । प । - +] लवङ्गलता

रक्षाजातीच्या व्यत्ययाने गगनचपलाजाति सिद्ध होते.

(१) चपला गगनीं तुटली
तनमन लागुनि प्राण वेधले चन्द्रज्योत जशि सुटली." (प्रक १९५)

'ध्यान तुझें दिनरजनी' या चरणाने आरम्भित होणारी ही लावणी गगनचपलाजातींत आहे.

(२) "सा विरहे तव दीना
माधव मनसिजविशिखभयादिव भावनाय त्वयि लीना"

हें गीतगोविन्दांतील ८ व्या प्रबन्धाचें ध्रुवपद तेवढें या संयुक्तमात्रावलीचें आहे.

९३ **'जन्मभू'** [- । प । प । प । ~ +] कमललोचना
[- । प । - + ऽऽ - । प । ~ +]

या द्विपदींतील दुसरा चरण मुख्यत्वें पुढील म्हणजे मुद्रिकाजातींत आढळतो. तो [ - । प । - +] आणि [ - । प । ~ + ] अशा दोन मात्रावली मिळून होतो. मधला दोन मात्रांचा काल १४ व्या मात्रेवर न घेतां बहुश: १२ व्या मात्रेवर घेण्यांत येतो. तसें करावयाचें असेल तरच ११ वी नि

१२ वी मात्रा मिळून गुरु अक्षर असावे लागतें.

> “मा सान्जफेरि उरकुनी डोङ्गरावरी निमुट बैसलों,
> **जन्मभू**कडे पाहूनी -॰ अस्वस्थ क्षणिं जाहलों.
> मातींत रोखिले नयन तरल होऊन आर्द्र जाहले,
> चिमटींत ढिपल घेवोनी-॰ नभाकडे फेकिले!’
>
> (आ-किमा, जा १९३३)

९४ **‘मुद्रिका’** [- । प । प । ~ +] लीलारति
[- । प । - + ऽऽ - । प । ~ +]

या जातीला नाव ‘मुद्रिके राम टाकूनि अलिस तू कशी?’ या अत्यन्त शिथिल अशा स्त्रीगीतावरून पडलें आहे. हे पद्य, जिज्ञासूंस, खण्डेराव विनायक पुरंदरे यांनी प्रकाशित केलेलें ‘स्त्रियांची गाणीं’ या पुस्तकांत २४ व्या पृष्ठावर सापडेल. आधुनिक मराठी कवितेंत या जातींत गाणीं रचायला आरम्भ ताम्बे यांच्या ‘तू हुबेहूब साऊली त्याच मूर्तिची’ या सरस कवितेच्या प्रसिद्धीपासून झाला.

(१) ”तू हुबेहूब साऊली त्याच मूर्तिची-
हरपली दिवङ्गत झाली-॰ जी मूर्ति साऊली तिची.” (तासक ८९)

या कवितेंत अन्तरा नाही; पण [- । प । ~ +] या मात्रावलीचा अन्तरा घातल्याने रमणीयता वाढते.

(२) तू लावण्याची सखे, पुष्पवाटिका-
”ही स्तुति समजूं का टीका-॰ ही प्रेमचाटुनीति का?”
कोकिळाच गमशी, गळा तुझा चांगला-
”का सूचवितां मग माझा-॰ हासुनी वर्ण सावळा?
निर्दोष अहां का स्वता
मी बरें कलडिकत चन्द्र नि तू चन्द्रिका.
ही प्रेमखूण पटली का? -॰ घालूं दे स्वर्ण-**मुद्रिका**!” (२६२)

‘वियोगिनीचें पुण्यस्मरण’ (गिका ७६) ही कविता अशी अन्तऱ्यासह आहे.

९५ **‘तर्कयुक्ति’** [- । प । प । प । ~ +] कमललोचना
[। प । प । प । ~ +] समुदितमदना

“हा जरठकुमारीविवाह शास्त्रें अधमाधम मानिती
नरकपात निश्चयें घडवि तो, **तर्कयुक्ति** शिकविती.” (देशा १२).

९६ **‘स्वर्गदारिका’** [। प । ~ +, उ । प । ~ +] सूर्यकला
[- । प । प । प । ~ +] कमललोचना

“अहा उषासुन्दरी पातली, अहा उषासुन्दरी
ही **स्वर्गदारिका** मुखासि दावित आली अवनीवरी.
दूरी तिमिरावली दवडुनी दूरी तिमिरावली
ही उडिगरसांची राणी दावित मार्गा सरसावली.
अयि उषे देवते नयीं अम्हां जागवीं,
दे साह्य सम्पदा जिड्कायाला नवी.
उदार दे वैभवा मनुजसखि, उदार दे वैभवा,
जे वैभव अमुचें होईल देवी नवल सदा मानवां”
(भाद-सद्वै १४/६)

पण या पद्यांत शिथिलता आहे. काही द्विपद्या नवतरुणीच्या आहेत.

९७ **“सवत्सा”** [उ । प । ~ +] पर्वती
[- । प । प । प । ~ +] कमललोचना

“बघा ती पवळी मज हिणविते,
माझ्याच देखतां वत्साला ती रोज रोज पाजिते;
काढिल्या राड्गोळ्या अड्गणीं
बाहेरुनि येतां प्रियकर हासे आनन्दाने मनीं.” (सोचौ)

९८ **‘राजेश्वरी’** [प । ~ +, उ । प । ~ +] सूर्यकला

[। प । प । प । ~ +] समुदितमदना

(१) “रामकृष्ण नरहरी, विठोबा रामकृष्ण नरहरी!
कधि रे कधि रे कधि रे डोळां दाखविशिल पण्ढरी?
(माधव-पस ३/४७३)

(२) “दाविं मला श्रीहरी सखये, दाविं मला श्रीहरी
ललिते नमितें तव पदपङ्कज, दया करी मजवरी. ध्रु॰
पातळ हे चन्दिरी सखये, पातळ हे चन्दिरी
गाडे न लागे बाई, मला गे कञ्चुकि ही भरजरी.
न रुचे कण्ठीं सरी सखये, न रुचे कण्ठीं सरी,
मुदराखडिचा भार होतसे, साजणि माझ्या शिरीं.” (खाक ८२)

(३) “दूर दिसे टेकडी जेथुनी सूर्य घेतसे उडी;
राङ्ग पऱ्यांची तेथे राही सदासर्वदा खडी.
बाग तिथे मोहरे, हिण्डती रङिगत फुलपाखरें;
परागांत रङ्गल्या पऱ्यांचे रूप किती साजिरें!
महाल मोठा भला पऱ्यांनी रमणीस्तव बान्धिला,
शोभा त्याची पाहुनि चित्ती चन्द्रहि वेडावला.
फूलपाकळ्यावरी दवाच्या चकचकती झालरी,
आणि झोपली मधे पऱ्यांची सुन्दर राजेश्वरी.” (गोत)

‘विपस’ (६) आणि उदासकृत ‘काट्याच्या पञ्जरीं’ (दाम ३२) या कविताहि या राजेश्वरीजातींत आहेत.

९९ **“रणरङ्ग”** [। प । प।] पादाकुलक
[। प । प । प । ~ +] समुदितमदना

“चल, निशाण धर हे करीं, पुढे चल नेटाने वरिवरी. ध्रु॰
युद्ध माजलें चहुंबाजूला
वीराला प्रतिवीरहि भिडला, उठली दङ्गल खरी. १
सम्शेरींची खणखण चाले,
तुटती भाल्यावरती भाले, चमकुनि बिजलीपरी.” २
(गिका ४५)

१०० **‘केशवकरणी’** [। प । प । प । ~ +] समुदितमदना
[उ । प । ~ +] पर्वती

या जातीचें नाव रामजोशीकृत ‘केशवकरणी’ अद्भुत लीला नारायण तो कसा’ (राला १३) या पद्यावरून दिलें आहे.

(१) “भक्तासाठी तो जगजेठी बसून माळ्यावर
पाखरें उडवी सारङ्धर” (तुका-पस १/१३७)

हें पद्य अधिक जुनें आहे. ‘सख्या वसन्तवाता’ (दक १९) ‘आलिंगन’ (रेक १/४७), ‘बालकवीचें गायन’ (माक ५७), ‘पाटिल’ (पारा ८), ‘जिवलगेच्या हृदयासाठी’ (पारा ४५) इत्यादि कवितांत अन्तरा नाही. बहुश: [- । प । प । ~ +] या लीलारतिमात्रावलीचा अन्तरा असतो. याचें उदाहरण मागे ३३८ व्या पृष्ठावर दिलेंच आहे.

१०१ ‘**जीवनध्वनि’** [उ । प । प ~ +] पर्वती
[। प । प । प । ~ +] समुदितमदना
केशवकरणीच्या व्यत्ययाने जीवनध्वनिजाति सिद्ध होते.

“खळखळे प्रीतीची वाहिनी
चहूंकडे मधुमञ्जुळ निघतो कसा जीवनध्वनी?
रडशि कां तूच गान भङ्गुनी?
घे धुवुनी गङ्गेंत वाहत्या हात तूहि रङ्गुनी.” (तासक १२९)

‘दास्यविमोचन’ (उस २१९), ‘हृदयपरीक्षा’ (पपि १०४), आणि ‘कळी खुडणारास’- (पपि १०६) या कविता जीवनध्वनिजातीच्याच आहेत. मात्र विषम चरणांतील आद्यतालकपूर्व गण उलटून पुढे ढकलिला आहे.

“बापा करुणाकरा ईश्वरा
हा माझा तू म्हणशि जयाला धन्य मनुज तो खरा.”
ही द्विपदी वस्तूत:
”ईश्वरा बापा करुणाकरा
हा माझा तू म्हणशि जयाला धन्य मनुज तो खरा”
अशीच आहे.

१०२ **'जानकी'** [। प । प । प । ~ +] समुदितमदना
[- । प । ~ +] भरतखण्ड

(१) "स्वहित पाहिजे तरि तुज सखया ऐक सांगतों मती,
स्मर राम **जानकी**-पती." (विपस ६४ वें)

(२) "बाळपणींचा काळ सुखाचा आठवतो घडिघडी,
अशि न ये फिरुनि कधि घडी.
किति हौसेने टाकिलि असती त्यांत मागुती उडी,
परि दुबळी मानवकुडी." (देशा २२)

(३) "स्वयंवराच्या समयीं पाहुनि राममूर्ति सावळी
किति लाज मला वाटली!" (मामाह-कस २/११७)

१०३ **'यदु'** [- । प । ~ +] भरतखण्ड
[। प । प । प । ~ +] समुदितमदना

जानकी जातीचा व्यत्यय पुढील एकुलत्या एक पद्यांत पहायला मिळतो:-

"**यदु** घालुनिया धनुवरी
सरसर ररRर बाण सोडितां गिळिलें रजनीचरीं." (पाग)

१०४ **'सत्कीर्ति'** [। प । प । प । ~ +] समुदितमदना
[। प । ~ +]

"एकपट होऊनि थोरलहाना समदृष्टीने भजा,
अन्यायपथें न जा.
सदसद्विचार करुनी लोकीं सत्कीर्तीने सजा,
द्या कोणा नच इजा.
सत्यवचन राखण्यास न टळा, कथितों या हितगुजा,
व्हा सावध, नच निजा." (अनन्त फन्दी.)

या जातीचा व्यत्यय म्हणजे पुढील पद्याची नन्दनन्दनजाति होय.

१०५ **‘नन्दनन्दन’** [। प । ~ +]
[। प । प । प । ~ +] समुदितमदना

(१) “नन्दाच्या नन्दना
नवनीरदतनु कोमलगात्रा दानवकुलकन्दना.” (देक २९)

(२) ”हृदयसागरामधी
कुणी लोटिली आशानौका समजणार हे कधी?
नभांत घनदाट या
कुठुनि बरें हा किरण धावतो? कोण धाडितें तया?”
(मस-रमा ७/११)

ना. धो. ताम्हनकर यांची ‘वञ्चना’ (स्त्रीमा ७७ वा) ही कविता या नन्दनन्दनजातींत आहे.

१०६ **‘नवतरुणी’** [। प । +, उ । प । +] चन्द्रकला
[- । प । प । प । +] अरुणप्रभा

या जातीचें नाव ‘माळिण नवतरुणी’ या पद्यावरून ठेविलें आहे. ‘तरुण कुलिन गोरा’ हे शारदेंतील पद, ‘सृष्टीची करमणुकीची घटका’ (टिक ५४) ‘प्रियकर हिन्दीस्तान’ (टिक २२१), ‘देइ असे वरदान’ (उस २६१ वें) ‘वसन्तकाल’ (सुमौ ९९) इत्यादि पद्यें याच जातीची आहेत. अन्तरा बहुश: [- । प । प । ~ +] या मात्रावलीचा असतो; पण पुढील पद्यांत तो भूपतिमात्रावलीचा आहे.

“अजुनि किती निजशी-सुन्दरा, अजुनि किती निजशी?
ही प्रभात झाली तरी पुरेशी होय न झोप कशी?
हा प्रभातवायू मन्द सुशीतल वाहे,
चहुंकडे उषेचें हास्य भरुनिया राहे,
उठ नेत्र उघडीं-सुन्दरा, उठ नेत्र उघडी,
शुभ शान्तिरसाची चिरमङ्गलमय आहे हीच घडी.” (रेक १/२९३)

१०७ **‘शरण’** [- । प । प । प । +] अरुणप्रभा
[- । प । +] सिंहनाद

“वद जाऊं कुणाला शरण करी जो हरण सङ्कटाचें,
मी धरिन चरण त्याचे.
बहु आप्तबन्धु बान्धवां प्रार्थिले कथुनि दुक्ख मनिंचे,
ते होय विफल साचें.” (किग्र ४८५)

१०८ **‘वल्लिका’** [- - । + ऽ ~ + ऽऽ । +]
[- । प । प । + ऽ ~ + ऽऽ । +]

(१) तुजविण शान्ति नाही
जीवनज्योति गे स्नेहाविण तव राहिना ही.
भलती केलि कां ही?
आलिङ्गुनि तरुला सखि बघ खेळे वल्लिका ही! (२६३)
(२) “अम्हि होऊं । घाऽगऱ्याऽऽ।ग
अम्हि । वाजूं छुम छुम । येतां तुम्ही । नाऽचण्या ऽऽ।ग़
अम्हि होऊं । वऽल्लिकाऽऽ।ग
अम्हि । हासूं खुदकन । या तुम्हि कलिका । तोऽडण्याऽऽ।ग
(माअ २२)

१०९ **‘सुन्दरयादव’** [प । +, उ । प । +] चन्द्रकला
[। प । प । प । +] चन्द्रकला

(१) “झडकरि आणा हो-॰ सुन्दरयादव राणा हो,
पञ्चप्राण व्याकुळ झाले हरिविण जाणा हो.” (केस्वा-पस १।४८६)
(२) “माया जळली का? -॰ तिळही ममता नाही का?
आली पोटी पोर एकटी तीही विकतां का?” (देशा ६५)
(३) “गौऽळणी होऊं-॰ सयांनो, गौऽळणी होऊ
घागरि घेऊनि पाण्यालागी यमुनेला जाऊं.” (माशि २१)
‘जगन्नाथाचा रथोत्सव’ (सारा १४९) हे काव्य या जातींत आहे.

११० **‘स्वतन्त्र’** [। प । प । प । +] चन्द्रकान्त
[ । प । +, उ । प । +] चन्द्रकला

सुन्दरयादवजातीच्या व्यत्ययाने पुढील पद्याची जाति सिद्ध होते.

"**स्वतन्त्र** होतां देश उद्या हा शिलेदार होणार
शिलेदार होणार-॰ पगडी शिरावरी चढणार." (टेआ ३/१४९)

१११ 'बन्धु' [। प । प] पादाकुलक
[। प । प । प । +] चन्द्रकान्त

"श्रान्ताला या भ्रान्ताला
दया हो आश्रय तुम्हि मजला. ध्रु॰
पापदुक्खमय पन्थीं फिरलों,
सर्व जगाला पाहुनि आलों, ठाव न शान्तीला. १
प्रिय भक्तांनो, न्या हो मजला,
पायीं देवाजीच्या घाला, लाव सेवेला.
एकाकी मी नाही आता,
झालों तुमचा बन्धू पुरता, मजला साम्भाळा. ३ (उस ४६२)

'आवाहन' (उस ४५५) हे पद्यहि याच जातीचें आहे.

११२ "माधवकरणी", 'प्राणसखी' [। प । प । प । +] चन्द्रकान्त
[उ । प । +] भुवनसुन्दर

(१) "प्राणसखे राजसे जिवाला लाविलीस झुरणी,
करीं तळमळ अ न्तःकरणीं." (प्रक २०१)

(२) "रत्न निपजलें ते भूगर्भी पडे अन्धकारीं,
येई वरी गारगोटी;
रविकिरणें चुम्बिती तिशी, कुतुकती मुलें भारी;
प्रतिष्ठा परि ती का मोठी?
साधी वाङ्मोहिनी सहज जो असा रसाळ कवी
स्वस्थळी राही अज्ञात;
चन्द्रशेखरा, तव 'कविता-रति' परि मला झुकवी
फुलाला जसा उषावात.
रसिक नसेना कुणी? जन्म ये मला गुलाबाचा,
स्वतःला का लेखूं तुच्छ?
ख्रिस्तशिरीं बैसला म्हणुनि का कण्टकमुकुटाचा

होईल कधी सुमनगुच्छ?
विहङ्गम होऊनि गाईन
साद जरि दे वनराई न;
इन्द्रधनुस न बघे अभागी कुणी दृष्टिहीन,
म्हणुनि का वैभव तें दीन?’ (माजूस्व २६)

‘अविवेकी हृदयास’ (सुमौ ४४), ‘वनवासी लोकवीर’ (गोदू २१), ‘प्रेमळ हृदयास’ (गोदू २३), ‘उपासक’ (यध १५५) ‘वनविहार’ (यज ३६) इत्यादि कविता या माधवकरणीजातींत आहेत.

११३ **‘गाधिज’** [उ । प । +] भुवनसुन्दर
[। प । प । प । +] चन्द्रकान्त

माधवकरणीच्या व्यत्ययाने ही गाधिजजाति होते. गाधिज हे नाव ‘वसन्ती बघुनि मेनकेला । गाधिजमुनिने निज सुतपावर उदकाञ्जलि दिधला’ (किग्र ५०१) या पद्यावरून दिलें आहे. मेनका नावाचें स्वतन्त्र वृत्त असल्याने ते नाव या जातीला देतां येणार नाही. पुढील जुनें पद्य थोडे शिथिल आहे.

“चान्दणे काय सुन्दर पडलें?
त्यांत तुम्हासारखे पाखरूं अवचित सापडले. ध्रु॰
स्वरुपलावण्य हृदयिं ठसलें,
पदकमलापासून मुखापर्यन्त जिवीं वसलें.
मुलायम चित्र कुठे असलें?
लिम्बापरि तारुण्य विसाबाविसांत मुसमुसलें.” (प्रक २०२)

या पद्यांत [- । प । प । ~ +] या मात्रावलीचा अन्तरा आहे. ‘बाई लतिके!’ (दक १६) आणि ‘दयाघन, ज्याचा प्रभु झाला’ (रेक १/१८९) इत्यादि अनेक कविता या गाधिजजातींत आहेत.

११४ **“मूढा”** [। प । +] पिशङ्ग
[। प । प । प । +] चन्द्रकान्त

“अगादिच तू वेडी,
वयांत या अविचारमदादिक पुरुषां बहु खोडी.

बघशि न दूरवरी,
स्वयंमन्य ते व्यसनी चञ्चल, बोधाचे वैरी." (देशा २८)

११५ **'अभिमन्यु'** [उ । - +]
[। प । +, उ । प । +] चन्द्रकला

या जातीस नाव 'सकाळीं उठुनी । धर्मानी काय केलें-अभिमन्यूस बोलवीलें, या पद्यावरून देण्यांत आले आहे; पण हे पद्य फारच शिथिल आहे.

(१) "मिळाले सन्त
सन्तांचा भार- ० हर्षलें मन माझे फार." (तुका-पस १/१३८)
(२) "लागला तोबा
तोबा मज बाई- ०हरिहरविठ्ठलरखुमाई!"
(माधवकवि-पस ३/४६६)

ही पद्यें हि फार शिथिल आहेत.

'तस्करा हातीं० (किग्र ४७२), 'मुशाफिर आम्ही' (तासक ४९), 'चौघडा झडतो' (तासक ६१) आणि गोविंद कवीचें 'मुरली' हे दीर्घकाव्य (गोक १०६) ही या अभिमन्युजातींतील पद्यें शुद्ध आहेत.

११६ **'श्रीमती'** [ । प । प] पादाकुलक
[। प । प । प] अनलज्वाला

(१) "तू श्रीमन्तिण खरी शोभशिल
डौल किती येईल तुला! मग अम्हा विसरशिल.
कधी पालखिंत मिरवत जाशिल,
कधि अम्बारी मेणा कधितरि रथांत बसशिल' (देशा ५८)
(२) "सङ्गीतार्णवि लीना हो मम गायनलहरी! ध्रु०
अवचित उसळे, पुनरपि मिसळे,
मोदफेन का विखरुनि जिरली गायनलहरी?" (विम १०२)
(३) "तू नटरङ्गी खरा शोभशी,
नित्यनवीं बहुरूपें अम्बरिं धारण करिशी."
विष्णुसुत उम्ब्रजकर (आमा, जू १९३१)

११७ **'आर्योद्धरिणी'** [। प । - - +] अचलगति

[। प । प । - - +] शुभगड्गा

“आर्योद्धरिणी श्रीभूजननी ही प्रणती
तुझिया चरणीं.
राष्ट्रामाजी धन्यतमा
अध्यात्माची, सकल कलांची तू जननी. १
तव सेवेशी देह दिला
स्मरुनी आधी शिवरायादी वीर-मणी. २
उत्कर्षास्तव तव माते,
क्लेशा साहूं, प्राणचि वाहूं तव चरणीं. ३
कुवलयानन्द (लोशिमा)

११८ **‘चरणरज’** [। प । प] पादाकुलक
[। प । - - + ऽ ऽ । - - +] सुस्वर

“चरणिं तुझ्या मज देई रे-॰ वास हरी! ध्रु॰
चरणतळीं तव कमल विराजे
तेंच करि मज देवा रे-॰ कल्पवरी. १
मी घाली ना सड्कट तुजवरि,
केवळ मज चरणाचे रे -॰ रजच करीं.” २ (तासक १७७)

११९ **‘कोमलगात्री’** [। - । - - + ऽ ऽ । प । - +] जगदीश्वरबाला
[- । प । प । - +] भूपति

(१) “या प्रियपात्रा -॰ सुचिन्ह कोमलगात्रा
अजि कुणीकडे तरि दिवस उगवला चित्रा?
प्रतिपाळ करा -॰ राजहंस सुकुमारा,
चालवा स्नेह शेवटवर परम उदारा.” (प्रक २०७)
(२) “दम धरूं किती -॰ राहुनि लहरा येती,
हा मदन, विखारी सर्प छळी एकान्तीं.
रे मजवाणी -॰ नसेल दुक्खी कोणी,
किती शहरपुण्यामधि सुखांत निजती प्राणी!” (प्रक १८३)

या पद्यांत [- । प । प । ˜ +] या मात्रावलीचा अन्तरा आहे.

१२० **‘सर्वगामिनी’** [। - - + ऽ ऽ । प । - +] नगराज
[- । प । प । - +] भूपति

“हे काला - ॰ अगम्य तव ही करणी;
चि न्तिती परन्तु न अन्त काढिती ज्ञानी.
अमित तुझी - ॰ **सर्वगामिनी** शक्ती,
जो गर्व धरी त्या क्षणांत खर्व करी ती.” (कोगु)

१२१ **‘सुखकन्द’** [- । प । प । - +] भूपति
[- । प । प । +] भूपति

(१) “मी दीन जाहलें लीन तुझ्या चरणीं रे
तू आश्रय माझा, समाधान सारें. १
दे मला लाभ आपुला प्रभो, दुक्खाशी
हा लाभ लोपवा सकळ अनिष्टांशी. २
तव छन्द खरा सुखकन्द! तूच मम माय,
तू बाप, सखा तू, तूच बन्धुराय!” ३ (उस ३९३)

(२) “नर्तनी हर्षवर्तना करीना प्राणी
नच दुजा अभागी त्यासम जगिं कोणी. ध्रु॰
ही धरा दिसे सुस्थिरा तरी ही नाचे
रविभवती चालूं रङ्गण हे हीचें.
हा शशी पहा दिननिशीं पृथ्विच्या भोती
करि नृत्य, नाचवी तया हिची प्रीती.
हे खगोल वेडे पिसे -॰ भासती
हे सदा नाचती कसे -॰ हासती
क्षण विश्रान्तीची नसे -॰ या स्मृती.
बघ गडे या ढगाकडे नाचती सारे,
ही नाचे चपला, नाचतात वारे.” (टिक ९३)

’नववर्षगीत’ (उस ६०९) हेंहि याच सुखकन्द जातींत आहे.

१२२ “**बालमनीषा**” [- - । प । - +]
[- । प । प । - +] भूपति

(१) प्रार्थुनि बसतों स्वस्थ न आम्ही,
किति यत्न करुनिही विफलताच परिणामीं!
आणिक, सांग तरी जगदीशा,
पुरविशी काय तू अनुक्त बालमनीषा? (२६४)

(२) “मजला काय वाटतें व्हावें
कुणि कुणी मला पुसतात, काय सांगावें?
कधि मज गाढव वाटे व्हावें,
अभ्यास सर्व टाकून खूप खेळावें.” (माअ २९)

१२३ ‘**यशोदा**’ [- । प । प । - +] भूपति
[ - । प । - +] उद्धव

(१) “कारटा तुझा हा द्वाड यशोदा बाई!
कां पडला अमुचे डाई?
बैसुनिया यमुनेकाठीं डोळे मोडी,
भलतीची घागर फोडी.
सोसावी कुठवर तस्ती?
कशि टिकल अशाने वस्ती?
कर याची बन्दोबस्ती, ठायि ग ठायिं!
हा द्वाड यशोदा बाई!” (राला ७३)

(२) “अडकाठि तुला जिवलगा र केली कोणी?
ये दिवसा नवऱ्यावाणी.
या शहरपुण्यामधि वाजुनि चुकला ड्ङ्का,
न हि मुळीच धरिली शङ्का.
घडु नये गोष्ट ती सहज एकान्तीं घडली!
कशि काय तव्हा ते तुझि मज मुर्वत पडली?
जिवघेणि कठिण ही ममता कुणिकुन नडली?

पहा प्रभाकराचे छन्द चुनन्दावाणी
रस भरून अक्षर छाणी." (प्रक १७६)

'पहाट' या पुस्तकांतील कान्तकृत 'वञ्चिता' (पृ. ३३) आणि 'गाऱ्हाणें' (पृ. ४८) या कविता यशोदाजातीच्या आहेत.

'ये धावत कृष्णाबाई' या पद्याच्या चालीवर म्हणून ज्या कविता रचण्यांत येतात त्या यशोदाजातीच्याच असतात, ह्यांत विषमचरणांत दुसऱ्या आवर्तनांतील तिसऱ्या मात्रेनन्तर एकदा खण्डन असतें.

(३) "हा दीन तुला वनमालि शरण या कालीं,
तुजविणें कोण या वाली"? (टेआ १/३४)

परन्तु विषमचरण सगळाच खण्डित करायला काय अडचण आहे?

(४) "नाचते क्षणीं हासते, लोपते, येते,
नववधू मला ती गमते;
आडुनी क्षणीं पाहुनी पळे चपला ती,
लागते कशाला हातीं?" (नाभा ६)

यशोदाजातीच्या व्यत्ययाने 'मदनशर' जाति सिद्ध होते.

१२४ **'मदनशर'** [- । प । - +] उद्धव
[- । प । प । - +] भूपति

(१) "हा वसन्त ऋतु अनिवार
करि मदनशरांचा मार बहुत बेजार.
आता काय करुं मि संसार?
सर्पापरि गमती गडे गळ्यामधि हार." (राला ५९)

(२) "मी सांगुनि चुकतें कान्हा
कर सोड, मला दाण्डगेपणा सोसेना." (राला ५४)

१२५ **'अक्रूर'** [- । - - + ऽ ऽ । प । - +] जगदीश्वरबाला
[- । प । - +] उद्धव

(१) "अजि अक्रुर हा -॰ नेतो श्रीकृष्णाला
सखे काऽळ वाईट आला." (एक जुनें पद्य)

(२) "बा नीज गडे -॰ नीज गडे लडिवाळा!
निज नीऽज माझ्या बाळा. ध्रु॰
बहु दिवसांच्या -॰ जुन्या कुडाच्या भिन्ती
कुजुनी त्यां भोकें पडती.
त्यांमधुनी त्या -॰ दाखविती जगताला
दारिद्र्य आपुलें बाळा.
हे कळकीचें -॰ जीर्ण मोडकें दार
कर कर कर वाजे फार;
हे दुक्खाने -॰ कण्हुनी कथी लोकांला
दारिद्र्य आपुलें बाळा.
वाहतो फटींतुनि वारा,
सुकवी तो अश्रुधारा;
तुज नीज म्हणे सुकुमारा!
हा सूर धरी -॰ माझ्या या गीताला,
निज नीऽज माझ्या बाळा!" (दक ४६)

या जातींत अनेक सुन्दर कविता आहेत; परन्तु मनोरज्जनाच्या दुसऱ्या दिवाळीअङ्कांत प्रसिद्ध झालेल्या बालकवीच्या कवितेची आठवण थोड्यांनाच असेल:-

"सुखशयनीं मी -॰ निजलें होतें बाई,
स्वप्नें मज पडलीं काही.
त्या स्वप्नांच्या -॰ मनोमयी लीलांही
मन माझे गुड्गुन जाई."

१२६ **'चन्द्रभागा'** [। - - + ऽ ऽ । प । - +] नगराज
[ - - । - - +]

(१) "विठूऽचा -॰ गजर हरिनामाचा
झेण्डा. रोविला.
वाळवण्टीं -॰ चन्द्रभागेचे काठीं
डाऽव माण्डीला." (प्राचीन पद्‌य)

(२) "निज माझ्या -॰ छकुल्या चिमण्या राजा!
निज रे लडिवाळा!
बाळ गुणी -॰ झोप नेलि रे कोणी?
जो जो जो बाळा"! (तासक १५६)

१२७ **'श्रीकान्त'** [- । प । ~ +] लीलारति
[उ । प । ~ +] पर्वती

"दुडदुडा हरी कानडा रिघे मन्दिरीं,
माझी सासु गेलि बाहिरीं.
एकान्त वेळ श्रीकान्त न्याहळुनि बरी,
धावत जवळी आला हरी.
घाली हात गळ्याभीतरीं,
दोहीं करीं कुचांतें धरी,
माझी तोडियली गरसोळी
निज बळें मला ओढिलें भुरळ घालुन
मोहिलें चित्त कान्हयानं" (देक १०३)
अन्त्य चरण मात्र उद्धव दिसतो!

१२८ **'विजयश्री'** [- । - - + ऽ ऽ । प । ~ +]
[- । प । प । ~ +] लीलारति

"किति अधिर पहा-॰ अब्लख घोडा गुणी
मम वाट बघतसे स्वार व्हावया झणी.

ती विजयश्री-。 आणिन मी खेचुनी
अम्हि वीर मराठे सदा यशाचे धनी." (सोका ७७)

१२९ **'चिदघन'** [- । प । ˜ +]  भरतखण्ड
[- । - - + ऽ ऽ । प । ˜ +]-

"गुरु मुखेंशि उमजुनि खुण,
मम आत्मा हा-。 देवचि की आपण.
आढळे द्वैत मीपण,
उप्पर तोरे-。 स्वयंसिद्ध स्वरूप चिदघन
असं असतां भ्रमलें पण
हे वृथाच रे-。 भुललें चञ्चळ मन.
घे विवेक-अङ्कुश करीं,
मग चहडुनि माथ्यावरी
त्वरें मन-गज हा आवरी
पेलावा सत्ता-करीं
करिं राज्य नको विव्हल
मग काळाच्या -。 मुखिं माखीं काजळ." (देक ८०)

१३० **'सुमकलिका'** [। प । +] पिशङ्ग
[- । प । प । +] सन्तति

"गगनांतुनि गळतो
तो बाष्पबिंदु सुमकलिकेस्तव असतो.
रुचिकर बहु राहे
तो पुष्पांतिल रस मधुपास्तव आहे.
मण्डप लतिकांचा
तो वन्य खगास्तव असे पहा साचा.
प्रीति तशी युवती,
ती तुजमजसाठी उद्भवली जगतीं." (सुमौ ५७)

१३१ **'नृपममता'** [- । प । प । - +] उद्धव
[- । प । - +, ऽ - ˜ । +] मालिबाला

या जातीचें नाव 'नृपममता रामावरती' (किग्र ५२१) या पद्यावरून ठेविलें आहे.

(१) "सुटलासी दीन अनाथा,
धरिलेंसी मृत्यूपन्था शेवटीं." (दक ५३)

(२) "तव ठाव कळे न विराटा
वर्षे या तुझिया लाटा सागरा.
हे गहन शोकजल सारें
अश्रूंच्या लवणें खारें सागरा." (च ११४)

या दोन कविता, 'बालानन्दास' (सुमौ २८) आणि 'कवितेंतुनि' (पाशा-माल १११) इत्यादि कविता अशा सरळ आहेत. पण बहुश: कडव्यांतील उपान्त्य चरण तेवढा [- । प । प । प । - +] भवानी खण्डित असतो. 'यापुढे' (विक ९), 'पहिलें चुम्बन' (गोवा १२५), प्रेम आणि मरण' (गोवा ८७) या प्रसिद्ध कविता या प्रकारच्या नृपममताजातींत आहेत. रा. त्र्यम्बक गङ्गाधर घारपुरे यांचे 'लीलेचा संसार' हें दीर्घकाव्य याच प्रकारच्या नृपममताजातींत आहे.

१३२ **'मृगपडिक्त'** [- - । - - + ऽऽ । - - + ऽऽ]
[। प । - +]

(१) "फुगडी खेऽळ गे -॰ तू पिङ्गा
आलिस माझ्या सङ्गा.
फुगडी खेऽळ रे -॰ श्रीरंगा
सोडुनि धाङ्गडधिङ्गा." (तुकाराम-पस १/१६१)

(२) "चारा सोडुनिया -॰ गोकुळ हें
तरुतलिं बसलें आहे;
तृषितचि मृगपङ्क्ती -॰ बघ पीती
रविकरतप्त जलें ती." (देमृ ७०)

'बाळा वत्सरा' ॰ (दक ९), 'पाळणा' (बाक ४१), 'रजनीस आव्हान (बाक ८०), 'जादुगारीण (बाक ८५), 'घुङ्गुरवाळा' (गोवा १५१), इत्यादि कविता या मृगपडिक्तजातींत आहेत. मृगपङ्क्तीच्या

प्रथमचरणाच्या उत्तरार्धाला दुसरा चरण जोडून घेऊन पूर्वार्धाचा दुसरा चरण केला की चन्द्रभागाजाति होते; वा मृगपडिक्तजाति म्हणजे चन्द्रभागाजातीचा व्यत्यय मानावा.

१३३ **'शशिकान्ति'** [। प । - +]शुद्धसती
[- । प । प ।]

भवानी मात्रावली [- । प । प ॥ प । - +] दुसऱ्या आवर्तनाच्या अन्तीं तोडून जीं दोन शकलें होतात ती उलटवून जोडल्याने ही शशिकान्तिजाति होते.

(१) "अवचित या मेघांनी
शशिका न्ति चोरिली सन्धी साधुनि." (देमृ ५५)

(२) "अरसिक किति हा शेला
त्या सुन्दर तनुला सोडुनि आला!" (किग्र ४८९)

(३) "ही का देवी वनिंची,
की लक्ष्मी विचरे मधुमासाची?" (देशाप १)

'ओझरतें दर्शन' (टिक ९९) ही कविता या शशिकान्ति जातींत आहे.

१३४ **'शशिचारुमुखी'** [। प । + ऽ ~ +]
[- । प । + ऽ ~ +] राजसा

"नीज न ये नळराजया
तजवीज दिवारजनी जया.
रूप लिहूनि तिचें करीं
अनुरूप म्हणोनि उरीं धरी.
चार जरी भलता दिसे
**शशिचारुमुखी** (हि?) तया पुसे." (दस्व २९)

१३५ **'नवरङ्ग'** [। - - + ऽ ऽ । - - +]

[। प । - - +] अचलगति

उठ मुला -॰ उठ मुला!
बघ हा अरुणोदय झाला.
नवरङ्गी -॰ किरणांनी
भूषविली बघ ही अवनी.” (बाक ४४)

टिळककृत ‘भावधरा’ -॰ प्रेमकरा’ (बाबोमा ५१/८) आणि ‘सोनावळ’ (माक ५) या कविता या नवरङ्गजातींत आहेत.

१३७ **‘मुक्ताफलमाला’** [प । - +] शुद्धसती
[। प । +] पिशङ्ग

साहस एकाचें
  तत्फल दुसऱ्याला
कुठली नृपकण्ठीं
  मुक्ताफलमाला? (२६५)

भृङ्गावर्तनी

१३८ **‘महालोल’** [। भृ । भृ । भृ । - +]
[। भृ । भृ । भृ । भृ]

१३९ **‘प्रफ्फुल’** [। भृ । भृ । भृ । - ~ +]
[। भृ । - ~ +]

१४० **‘हृदयमोहन’** [। भृ । +]
[। भृ । भृ । भृ । +]

१३८ **‘महालोल’** [। भृ । भृ । भृ । - +] परिलाना
[। भृ । भृ । भृ । भृ] दासी

”सकलकलाऽऽभिराम कान्त न ये काय करूं?
विकल हृदय होय सये, सांग किती धीर धरूं! ध्रु॰
सर्व सखा सदय शान्त म्हणति सन्त ज्याशी
तोचि आज कठिण, कासयासि? कसा पार तरूं?
म्हणति **महालोल** तशी फोल मात झाली,
डौल कसा नेणवेचि जाण मनस्ताप हरूं.” (आपस ९१ वें)

१३९ **‘प्रफ्फुल’** [। भृ । भृ । भृ । - ˜ +] मदनरङ्ग
[। भृ । - ˜ +]

“नि तान्त शान्त चान्दरात पसरली जगावरी,
उमलली धरा खरी.
रातराणिचा सुमन्ध दरवळे चराचरीं,
ओढ लावि अन्तरी.
वाटतें प्रफुल्ल काय अन्तरांत जाहलें,
देहभान हरपलें.” (रजनी-सपा ४-१०-३४)

१४० **‘हृदयमोहन’** [। भृ । +]
[। भृ । भृ । भृ । +] धवलचन्द्रिका

(१) **“हृदयमोहना**!
अजुनि किती अन्त बघशि, देशि यातना?
दृष्टि आतुरा,
एकवार दाविं तुझी मूर्ति सुन्दरा!’ (उपो ४)

‘समर्पण’ (उपो ६) ‘गायकास नजराणा’ (यध १३२), ‘क्षणिक चान्दणें’ (यग ७३) इत्यादि कविता या हृदयमोहनाजातींत आहेत. पहिल्या चरनासारखाच आणखी एक चरण मध्ये घातला तर तो जातिप्रकार विषम होऊन तिसऱ्या मोडेल (पुढे जीवितेश्वरी जाति पहा).

(२) ‘चन्द्र चवथिचा
रामाचा ग बागेमध्ये चाफा नवतिचा’.

हे उदाहरण फार शिथिल आहे.

हरावर्तनी

१४१ **‘मोहमाया’** [। - ˜ - । - ˜ - । - ˜ - । - ˜ -]
[। - ˜ - । - ˜ - । - ˜ - । -]

(१) “अता रामपायीं मना, लाग वेगें
सोशिले बहुत अन्याय मागे. ध्रु॰
साधुदर्शन पहा, सतत भजनीं रहा
लाविशी देह जरि कामकाजीं;
रङ्गशी निजपदीं, मोहमाया-नदी
आटली जाण घे भाष माझी.” (रङ्गनाथ, पस ३/९८)

(२) “उठ गोपाळजी जाई धेनूकडे
पाहती संवगडे वाट तूझी.” (कृके-पस ३/पृ. १९२)

(३) “सावळा वर बरा गौर वधुला!
नियम देवादिकीं हाचि परिपाळिया-ध्रु॰
गौरतनु जानकी राम घननीळ तो;
रुक्मिणी गोरटी कृष्ण काळा’
शुभ्र गङ्गानदी सागराला वरी,
वीजा मेघास ती घालि माळा.” (देशा ३३)

(४) “अता शान्त होई सख्या, मानसा रे!
विषय विषतुल्य हे मान सारे! ध्रु॰
केलि केलीस तू शैशवीं यौवनीं,
स्त्रीस तू निशिदिनीं मोहलसी;
वागुराबन्धनीं हरिण गुन्ते जसा

गुन्तलासी तसा तद्विलासीं.
वित्तमदमत्तजनचित्तसन्तोषणीं
आप्तजनपोषणीं कावलासी,
ग्रीष्म-भीष्मातपीं सहुनि बहुयातना
पावलोपावलीं पावलासी.'' (खाक ६४)

'शेवटचें प्रेमगीत' (गोवा २२५), 'हृदयेश्वरीस' (कावि ७०) 'आराध्य देवतेस' (माक १), वि. ह. आपटेकृत 'घे उडी' (आमाला ६) इत्यादि कविता या मोहामायाजातींत आहेत.

## वर्ग ३ रा.

### विषमजाति

### प्रकार १ ला

एका मात्रावलीचे दोन वा अधिक चरण (असंयुक्त वा क्वचित संयुक्त) आणि दुसऱ्या एखाद्या मात्रावलीचा एक (क्वचित दोन) चरण मिळून या प्रकारांत कडवें सिद्ध होतें.

पद्मावर्तनी

पुढील तीन जातींच्या कडव्यांत लवङ्गलता मात्रावलीचे अग्रेसरत्व आहे.

१४२ **'साकी'** [। प । प । प । - +] दोन
[। प । +, उ । प +] एक

१४३ **'मुनिरमणी'** [। प । प । प । - +] दोन
[। उ । प । +] दोन

१४४ **'गौतमजाया'** [। प । प । प । - +] दोन
[। प । - +] दोन

१४५ **'नीलमणि'** [- । प । प । प । +] दोन वा अधिक
[- । प । प । प । - - +]

१४२ **‘साकी’** [। प । प । प । - +] लवङ्गलता दोन
[। प । +, उ । प +] चन्द्रकला एक

भोवतील हे तिमिर करूनी कर्मशून्य मज टाकी
काय करूं मी शरण ध्येया, तुज तनुवाङ्मनसा की!
दावी पूर्ण शशी-॰ अथवा चन्द्रकला मजशी. (२६६)

अशा स्फुट साक्या नाटकांतून आढळतात. परन्तु अशा साक्यांची माला क्वचितच कोठे आढळते. ‘सन्धाकाळची प्रार्थना’ (उस ४२२), ‘वेषभूषाकारास सादरार्पित पद्यभूषा’ (गोवा १२) आणि ‘दैन्य न गेलें काही’ (कोका २/२६६) या तीन कवितांत मात्र अशा साक्यांची माला आहे.

“असो क्षण, असो घटिका किंवा दिवस असो तो तूझा
उसना मजला दिलास देवा, नाही नाही माझा,
परत तुला देतों-॰ दिन हा वापरिला तव तो. १
विचार केले आज दयाळा, उच्चारहि जे केले,
जगीं आज आचार जेवढे माझ्या हातुन झाले
त्यांसह दिवस तुला-॰ अर्पी, स्वीकारीं याला.” २ (उस ४२२)

१४३ **‘मुनिरमणी’** [। प । प । प । - +] लवङ्गलता दोन
[उ । प । +] भुवनसुन्दर दोन

१४४ **‘गौतमजाया’** [। प । प । प । - +] दोन
[। प । - +] दोन

१४५ **‘नीलमणि’** [- । प । प । प । +] दोन वा अधिक
[- । प । प । प । - - +] एक

१४३ **‘मुनिरमणी’** [। प । प । प । - +] लवङ्गलता दोन
[उ । प । +] भुवनसुन्दर दोन

एकन्दर ११ कडव्यांच्या मोरोपन्तकृत अहल्योद्धार काव्यांतील ५ वें, ६ वें आणि १० वें ही कडवी निराळ्या घटनेची आहेत.

(१) "राम म्हणे, "गुरुराया, हे की साध्वी, मुनिची भार्या.
पाय कसा लावावा? माझी माता तैशी आर्या.
वाटे सङ्कट हे प्राज्ञा,
कैशी लङ्घावी आज्ञा?"

विश्वमित्र म्हणे, 'बा रामा, ईतें म्हणशी माय.
माय न सुख लोकीं पुत्राचा जरि ही लागे पाय.

वत्सा, मातेला नेटें.
धावुनि धन्य करीं, भेटें.

श्रीरामाच्या पदपद्माचा रज साचा स्पर्श-मणी
केली सुवर्णवर्णी पातकलोहमयी **मुनिरमणी.**

स्तविती सुरवरमुनि रामा
शुद्धा अतुला सुखधामा." ३ (मोस्फुका २/२६-२७)

(२) "धेनुमुखी का व्याघ्रचि किंवा मधुमुख विषघट समजा.
अनुभव येतां रडाल मग की आता यातें उमजा
पोशिल भरतचि तुम्हांला
जरि तो राज्यपदीं बसला." १ (किग्र ५५३)

१४४ **'गौतमजाया'** [। प । प । प । - +] लवङ्गलता दोन
[। प । - +] शुद्धसती दोन

मोरोपन्तकृत अहिल्योद्धार (द्वितीय) (मोस्फुका २/२५) या प्रकरणांतील बहुतेक कडवीं या घटनेची आहेत. ही जाति साकीहून भिन्न आहे हे उघड आहे.

"विश्वामित्रें प्रावृटकाळें करुणामेघश्याम
**गौतमजाया**मरुभूमीप्रति आणियला अभिराम

दीनोद्धारसमर्था
भजकां देशि पुमर्था. १
इन्द्रें छळिली सती, पतीने कोपें दिधला शाप,
झाली शिळा सुशीळा, आता वारावे सन्ताप.
रामा परमपवित्रा
त्रिभुवनगीतचरित्रा!" (मोस्फुका १/२५)

१४५ **'नीलमणि'** [- । प । प । प । +] अरुणप्रभा दोन वा अधिक
[- । प । प । प । - - +] विजया एक

रघुराज जिवीं वरिला -॰ सये कृतनिश्चय हा धरिला ध्रु॰
मज मानवला नवरा नवनीरद**नीलमणी**सरसा,
घनराजित राजसभेंत सभाजनवीक्षणिं केसरिसा,
उडुमाजि सुधाकर देवि, पुरन्दरकाननिं कल्पगसा,
सखि त्याविण भूपगणीं न गणीं मनिं सांग विकल्प कसा सहसा." १
(आपस ६५ वें)

'नळराज हिरा वरिला॰' (दस्व २३४) हे पद्यहि याच जातीचें आहे. आनन्दतनयाच्या पद्यांत पद्माचा (- ˜ ˜ - ˜ ˜) हाच प्रकार योजिलेला दिसतो. त्यामुळे त्याची रचना वृत्तस्वरूप दिसते. परन्तु जातींत इतर प्रकार चालत नाहीत असें नाही.

पुढील दोन जातींच्या कडव्यांत चन्द्रकान्त मात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

१४६ **'परेश-श्वसन'** [। प । प । प । +] दोन वा अधिक
[। प । +, उ । प । +] एक

१४७ **'मधुघोष'** [। प । प । प । +] दोन वा अधिक
[। प । प । +] एक

१४६ **'परेश-श्वसन'** [। प । प । प । +] चन्द्रकान्त तीन
[। प । +, उ । प । +] चन्द्रकला एक

"श्वसन परेशाचें -॰ प्रार्थना **श्वसन परेशाचें** ध्रु॰

भक्तांच्या हृदयांत सञ्चरे, परतोनी जाई,
अन्त:करणीं प्रेमाग्नीला उत्तेजन देई,
ज्वाला त्याची सुरम्य, निर्मल, दिव्य उभी राही,
ह्या हो ज्वालेचें -॰ प्रार्थना नाम असे साचें." १ (उस ३०९)

ही नारायण वामन टिळकांची सुन्दर कविता तीन कडव्यांची आहे.

१४७ **'मधुघोष'** [। प । प । प । +] चन्द्रकान्त दोन वा अधिक
[। प । प । +] सन्तति एक

"चला चला जाऊं -॰ जगाचा उद्धारक पाहूं. ध्रु॰
प्रीती आली देह धरोनी आम्हां ताराया,
हस्त धरोनी मृतांस आम्हां पुनरपि उठवाया,
'जय जय येशू!' ह्या **मधुघोषें** भुवना व्यापाया,
प्रभुला हृदयी साठवुनी घेऊं." १ (उस ७६)

हें पद्यहि नारायण वामन टिळकांचेच आहे.
पुढील दोन जातींच्या कडव्यांत चन्द्रकला मात्रावलीचें अग्रेसरत्व असतें.

१४८ **'सुराभरण'** [। प । +, उ । प । +] दोन वा अधिक
[। प । प । प । प] एक

१४९ **'विवशा'** [। प । +, उ । प । +] दोन वा अधिक
[। प । प । प । +] एक

१४८ **'सुराभरण'** [। प । +, उ । प । +] चन्द्रकला दोन
[। प । प । प । प] वनहरिणी एक

"साम्ब सुराभरणा -॰ आधी नमितों तव चरणां.
विघ्नतमा जो दिनमणि केवळ, करितों मग गणपतिच्या स्मरणा. ध्रु॰

रामकथापाकीं -॰ जडले बहु कवि परि तिस की
आणी या लोकीं -॰ पहिला कविवर वाल्मीकी;

तत्पद सेवुनि बलवत्कवि या सङ्गीताची करितो रचना." १ (किग्र ५४७)

१४९ **'विवशा'** [। प । +, उ । प । +] चन्द्रकला दोन वा अधिक
[। प । प । प । +] चन्द्रकान्त एक

(१) "आली दिपवाळी -॰ गड्यांनो, आली दिपवाळी. ध्रु॰
रोज रोज शाळा -॰ पुरे ती, आला कण्टाळा.
चार दिवस आता -॰ मनाला कसली ना चिन्ता.
उडूं बागडूं जशीं पाखरें स्वैर अन्तराळीं." १ (मानुक १८६)

(२) "बाल्यींच्या आशा -॰ भयंकर चेटकिणी विवशा
मोहाचें जाळें -॰ पसरुनी करिती वाटोळें.
मोहित होऊनि फसतो मानव करितो दुक्खाला." १ (मानुक २५४)

पुढील चार जातींच्या कडव्यांत भूपतिमात्रावलीचें अग्रेसरत्व असतें.

१५० **'सत्ताधारी'** [- । प । प । - +] दोन वा अधिक
[- । प । प । प । - +] एक

१५१ **'वनराजी'** [- । प । प । - +] दोन वा अधिक
[। प । प । प । ~ +] एक

१५२ **'सृष्टिकवि'** [- । प । प । - +] दोन वा अधिक
[। प । प । प । +] एक

१५३ **'महात्मवती'** [- । प । प । - +] दोन वा अधिक
[- । प । - +] एक

१५४ **'विश्राम'** [। - प । - +, ऽऽ - । - +] दोन वा अधिक
[- । प । प । प । +] एक

१५५ **'महती'** [। प । प । - +] दोन वा अधिक
[। प । - +, - - । प । - +] एक

१५६ **'ग्रहमाला'** [। - - + SS । प । - +] दोन वा अधिक
[। - - + SS । प । प । - +] एक

१५० **'सत्ताधारी'** [- । प । प । - +] भूपति दोन वा अधिक
[- । प । प । प । - +] भवानी एक

"लोळती वैभवीं तयां सुखी मानावें
हे तत्त्व जगीं या जरी मान्यता पावे,
परि सत्य आतले ज्यांचे त्यांना ठावें-

शान्ती न मनाला म्हणुनी रडती कितीक सत्ताधारी." (कास्फू ९९)

काव्यविहारीकृत 'याचना' (कास्फू ९९) ही कविता या सत्ताधारीजातींत आहे.

१५१ **'वनराजी'** [- । प । प । - +] भूपति दोन वा अधिक
[। प । प । प । ~ +] समुदितमदना एक

"ही अजुनि घोरते किर्रकिर्र वनराई,
वेताळ गस्त नुकताच घालुनी जाई,
जाळींत वाघ कानोसा घेऊन पाही,
गजर करूं देवाच्या नावें 'जय मल्हारी बळी." ! (पारा ८६)

ग.ह. पाटीलकृत 'लुटारूंनी म्हटलेलें गाणें' (पारा ८५) आणि काव्यविहारीकृत 'मान्यांच्या मुलास' (कास्फू ६०) या कविता या वनराजीजातींत आहेत.

१५२ **'सृष्टिकवि'** [- । प । प । - +] भूपति दोन वा अधिक
[। प । प । प । +] चन्द्रकान्त एक वा दोन

(१) "बघ **सृष्टीचे कवि** कसे भरारति गगनीं,
गातात कोणत्या स्वैर सुरांची गाणीं,
चल एकजीव हो लौकर त्यांच्या गानीं

स्वर्गांत सांग मग तेच आमुच्या कानीं,
सौन्दर्याची द्वाहि फिरविण्या बा तव अवतार,

(मग) उठ निजशि कां असा? गड्य रे झोप झालि फार." (गोवा १८७)

गोविन्दाग्रजकृत 'निजलेल्या बालकास' या शिथिल रचनेच्या कवितेंतील हे एकच ( २ रें) कडवें या जातीचें म्हणतां येईल.

(२) "वेळ न कां गुणिबाळा झाला? झोप किती घेशी?
सूर्य चालला माध्यान्हासी, अजुनि न कां उठशी? ध्रु॰
तव चहा निवुनि बघ केव्हाचा हा गेला!
मण्डईहि आली केव्हाची सदनाला,
नऊ वाजुनि गेले, पिता कचेरित गेला,
उठ, रान मोकळे पडे, हो कळ सकळिकांशी." १ (आमो १५)

पां. गो. लोहोकरे यांची ही समग्र कविता पाचवें कडवें वगळल्यास, या सृष्टिकविजातीची आहे.

१५३ **'महात्मवती'** [- । प । प । - +] भूपति दोन वा अधिक
[- । प । - +] उद्धव एक ?(क्वचित दोन)

(१) "वाटलें नाथ हो, तुम्ही उतरतां खाली
दे असहकारिता हाक तुम्हां ज्या कालीं. ध्रु॰
हम्बरडा फोडी आर्त महात्मा जेव्हा
आघात झेलिले घोर उरावर तेव्हा
त्या यज्ञें द्रवुनी गमे धावलां देवा,
ऐकिली आर्त किड्काळी." १ (तासक १६७)

'लाविलें निराज्जन तुझ्या पदीं हे भावें' (गोत-यमा ४०/४२,) 'मनोगत' (यज २७), 'अभिनयपटूस' (यग ३८) 'शोभतो तुझा संसार'॰ (यग-१३३) इत्यादि कविता या महात्मवतीजातींत आहेत.

(२) "मारिली ग मञ्जुळ मैना
उडविली कशी ग दैना! ध्रु॰
किति अनन्त फिरती गोल जगाचे ज्यांत,
किति असंख्य तारा, दिनमणि, रजनीकान्त,
जडविलें जवाहिर, चमचम करि दिनरात.

ती अशा प्रदेशीं ताना
घेतसे स्वैर फिरतांना.” १ (फागकृ-वामा ५/१)

१५४ **‘विश्राम’** [। - प । - +, ऽऽ - । - +] दोन वा अधिक
[- । प । प । प । +] अरुणप्रभा एक

“हे घनश्याम श्रीराम वदात्माराम
स्वातन्त्र्य सकलसुखनिधी समर्पुनि कधी पुरविशिल काम? ध्रु॰
हे पक्षी तरुवरि गाती-॰ स्वच्छन्दें
काननीं त्यापरी रमती-॰ मृगवृन्दें,
स्वातन्त्र्यसौख्य सेवीती-॰ आनन्दें,
मग अम्हालाच कां पारत न्त्र्यपञ्जरीं कोण्डिलें राम?
दण्डुनी दशानन तेव्हा -॰ कोदण्डें
सुरवृन्द रक्षिला देवा -॰ आनन्दें,
पाण्डवां राज्य दिधलें त्वां -॰ गोविन्दें,
मग अम्हांवरिच कां दया न करिशी मुनीन्द्रजन**विश्राम**?” २ (गोक १३)

‘महाराष्ट्रमहिमा’ (सहु २) ही कविता या विश्रामजातींत आहे.

१५५ **‘महती’** [। प । प । - +] वंशमणि दोन वा अधिक
[। प । - +, - - । प । - +] शुक्रकला एक

“महत्त्व भारी आहे या पृथ्वीचें,
त्याहुनि अतिशय या सगळ्या विश्वाचें;
परि तुजमध्ये **महती**चें जें बीज
त्याहुनि काही मोठी नाही चीज;-
ठसव मनीं हे साचें; बापा, हे वच बहु मोलाचें.” (केक १८४)

१५६ **‘ग्रहमाला’** [। - - + ऽऽ । प । - +] नगराज दोन वा अधिक
[। - - + ऽऽ । प । प । - +]

“जगदीशा-॰ तात असशि कलिकाला;
तटवासी -॰ निरखिशि अखिल शिशूंच्या बालिश लीला. ध्रु॰
राहु करें -॰ झांकि सूर्यनयनांला,
विधु तिमिरीं -॰ माण्डि लपण्डावाला,

ही पिड्गा -॰ घालितसे **ग्रहमाला,**

स्वर्गड्गा -॰ तटिं उडु फुगड्या खेळति जणि बहु बाला.” १ (कोगु)

पुढील सात जातींच्या कडव्यांत लीलारतिमात्रावलीचें अग्रेसरत्व असतें.

१५७ **‘जलवाहिनी’** [- । प । प । ~ +] दोन वा अधिक
[। प । प । प । ~ + ॥ उ । प । ~ +] एक

१५८ **“चकितहरिणी”** [- । प । प । ~ +] दोन वा अधिक
[- । प । प । ~ + ॥ उ । प । ~ +] एक

१५९ **‘उल्लास’** [- । प । प । ~ +] दोन वा अधिक
[। प । प । प । - +] एक

१६० **‘वरदायिनी’** [- । प । प । ~ +] दोन वा अधिक
[- । प । प । प । ~ +] एक

१६१ **‘बालमुकुन्द’** [- । प । प । ~ +] दोन वा अधिक
[- । ~ - ~ +, - । ~ - ~ + ऽऽ । प । ~ +] एक

१६२ **‘स्नेहसागर’** [- । प । प । ~ +] दोन वा अधिक
[। प । प । प । ~ +] एक

१६३ **‘जगद्गायक’** [- । प । प । ~ +] दोन वा अधिक
[। प । प । प । +] एक

१६४ **‘प्रीतिखेल’** [- । प । - + ऽ - ~ । +] दोन वा अधिक
[- । प । प । प । - +]
[- । प । प । - +] संयुक्त चरण

१६५ **“दैव-ग्रन्थि”** [। प । + ऽऽ - - । +] दोन वा अधिक
[। प । - +] एक

१५७ **‘जलवाहिनी’** [- । प । प । ~ +] लीलारति दोन वा अधिक

[। प । प । प । ~ + ॥ उ । प । ~ +] एक संयुक्त

"रजनीचें अवगुण्ठन पडलें साऱ्या विश्वावरी,
दाटले मेघहि गगनोदरीं. ध्रु॰
सोडूनि गाव ही उञ्च इमारत जुनी,
किति किर्र रान हे माजे चौबाजुंनी!
खळखळा वाहते मधेच **जलवाहिनी,**
पिसाट वारा तरुपर्णांतुनि फिरुनी भय दाखवी,
माजली भेसुर कोल्हेकुई" (गोत)

श्री. ग. दाढे यांची 'गिरणी मालकास' (भाले १२) ही कविता या जलवाहिनी जातींत आहे.

१५८ "**चकितहरिणी**" [- । प । प । ~ +] लीलारति दोन वा अधिक
[- । प । प । ~ + ॥ उ । प । ~ +] एक संयुक्त चरण

"ही पाण्यालागी हण्डा घेऊनि शिरीं
चालते विहिरिकडे सुन्दरी. ध्रु॰
हा विहिरीवरती आम्रवृक्ष डोलतो,
कोकीळ ओतुनी कण्ठ बाग भारतो,
कुई कुई मोटेचा शब्द मधुनि चालतो,
आसूड सप्पदिशि ऐकुनि बैलावरी
सुन्दरी बिचके हरिणीपरी.' (माभा ७६)

'गोफणवाली' (माभा ६२) आणि 'सुन्दरी' (माभा ७६) या कविता या चकितहरिणीजातींत आहेत.

१५९ **'उल्लास'** [- । प । प । ~ +] लीलारति दोन वा अधिक
[। प । प । प । - +] लवङ्गलता एक वा दोन

"हा तुझा अरुण बघ उगवे पूर्वेकडे,
वद कोण तयाचें गाणें गाईल
हा देवद्वारीं चौघडाहि धडधडे,
करि कोण तुझ्याविण बोल तयाचे खडे?
तव कवनाची वाट पाहती पहा उगवलीं किरणें,

गाऊनि गाणीं प्रेमळ त्यां **उल्लास** तूच रे देणें." (गोवा १८६)

या पद्याचीं इतर कडवीं अशीं नाहीत.

१६० **'वरदायिनी'** [- । प । प । ~ +] लीलारति दोन वा अधिक
[- । प । प । प । ~ +] कमललोचना एक

"कां अशी अचानक तुझ्या लोचनीं तुडुम्ब भरलीं जळें? ध्रु॰
नुकताच देवते, कौल मला देऊनी
केलेंस मला स्वर्गीय सुखाचा धनी;
ते घुमती मङ्गल अजुनी कानीं ध्वनी
तो व्हावी **वरदायिनीच** कम्पाकुला कशी नाकळे!" (यज ५६)

'मैना' (कास्फू ८४) ही कविता याच वरदायिनीजातींत आहे. ध्रुवपद मात्र निराळें आहे:-

"पिञ्जऱ्यांत झुरते मैना,
कुणि सोडीना, मन राहीना." (कास्फू ८४)

१६१ **'बालमुकुन्द'** [- । प । प । ~ +] लीलारति दोन वा अधिक
[- । ~ - ~ +, - । ~ - ~ + ऽऽ । प । ~ +] एक

या जातीचें नाव 'तुझ्या बालमुकुन्दें अजि बाई दैना केली' या प्राचीन पद्यावरून घेतलें आहे.

"मज चैन नसे गे कशि मी रिझवूं मना?
घडि घडी मनीं स्मरण होऊनीं-॰ सखये दिन जाईना.
किति लोचन भरले जातांना येथुनी,
किति आतुन आले हृदय सखे, दाटुनी,
परि आवरिलें मन होतें किति आतुनी!

ओतिलें झणीं हृदय घेऊनी -॰ बाळाच्या चुम्बना." १ (गिका ७५)

द. ग. कुळकर्णी यांची 'अर्पणपत्रिका' (भाले ३५) ही कविता या बालमुकुन्दजातींत आहे. यशवन्तकृत "मज विफल गमे ग जीवित माझें सखे" या कवितेंत कडव्याची बान्धणी वरीलप्रमाणे

नसल्याने त्या कवितेची जाति मात्र बालमुकुन्द होऊं शकत नाही.

१६२ **'स्नेहसागर'** [- । प । प । ~ +] लीलारति दोन वा अधिक
[। प । प । प । ~ +] समुदितमदना एक

(१) "अहा ही दैववशें लाधली
विपिनीं फिरतां अवचित मजला कण्टककलिता कळी! ध्रु॰
करिं धरितां देई दिव्यगन्धपरिमळा,
उघडितां नयन करि प्रेमदृष्टिसोहळा,
ओष्ठासि देतसे स्पर्शमोद आगळा,
**स्नेहसागरा** सञ्चित करिते वाटे प्रतिपाकळी." १ (केपगु ५४)

यशवन्तकृत 'प्रतिमालेखन' (यग ८३) आणि शैवालाने आच्छादिलेल्या विहिरीचें गाणें' (२) (यग १०६) ही या स्नेहसागरजातींतील आहेत. ध्रुवपद मात्र निराळे आहे.

(२) "शैवालानें मला टाकिलें व्यापुनि पुरतेपणीं
गुदमरे जीवहि त्या दडपणीं. ध्रु॰
बाहेर वाहते वाऱ्याची झुळझुळ,
लागतां तयाची पुसट कधी चाहुल
चल-बिचल अन्तरीं करि मजला व्याकुळ,
परी सुटेना मिठी तयाची बसलि जी जखडुनी." १ (यग १०६)

१६३ **'जगद्गायक'** [- । प । प । ~ +] लीलारति दोन वा अधिक
[। प । प । प । +] चन्द्रकान्त एक वा दोन

"**जगद्गायका** बालकवे, चल उठ उठ आता!
तूच निजशि तरि कोण सांग मग जागवील जगता? ध्रु॰
भ्रमभरें विश्व हे सर्व जयामधि बुडे
चल फोडुनि टाकूं ते फसवे बुडबुडे,

मग बसूं जाऊनी कालाच्याही पुढे,
तव सुराबरोबर कोण न यापरि उडे?
गोविन्दाग्रज कविशि तुजसवें ने देऊनि हाता,
जगद्गायका बालकवे, चल उठ उठ आता." १ (गोवा १८६)

१६४ **'प्रीतिखेल'** [- । प । - + ऽ - ~ । +] मालिबाला
[- । प । प । प । - +] दोन वा अधिक
[- । प । प । - +] एक संयुक्त चरण

"तुज खेळ वाटली प्रीति मना रे वेड्या,
हो अता तरी खातरी! जाशिं वाटे त्या? ध्रु॰
हो झुन्जुमुन्जु ती कोठे-॰ जैं उषा,
ताऱ्यांस दाविं मी बोटें-॰ दशदिशा,
मिळतील, न वाटे खोटें-॰ किति नशा!
कुणीकडे दडाले पुढे हिऱ्याचे खडे नभांतुनि साऱ्या?
हो उषा प्रखर मध्यान्ह, कुठुनि समजाया?" १ (तासक ७२)

१६५ **"दैव-ग्रन्थि"** [। प । + ऽऽ - - । +] दोन वा अधिक
[। प । - +] एक

"दैवं गाठ तुझी -॰ मग पडली,
विवाह हो अपुला -॰ ते कालीं;
प्रणय नसे पहिला -॰ तरि अपुलीं
एकरूप हृदयें -॰ ती झालीं,
दिव्यप्रेमें न्हालीं." (सपाजि-माध ५४)

पुढील सतरा जातींच्या कडव्यांत पादाकुलकाचे अग्रेसरत्व आहे.

१६६ **'प्रेमतारका'** [। प । प ] दोन वा अधिक
[। प । प । प । - - + ।। प । - - +] एक

१६७ **'आयुर्नौका'** [। प । प ] दोन वा अधिक
[। प । प । प । - - + ॥ प । - - +] एक

१६८ **‘कलकल’** [। प । प ] दोन वा अधिक
[। प । प । प । +, उ । प । +] एक

१६९ **‘श्यामाराणी’** [। प । प ] दोन वा अधिक
[। प । प । प । - - +] एक

१७० **‘हृदयेश्वरी’** [। प । प ] दोन वा अधिक
[। प । प । प । + ऽ ~ +] एक

१७१ **‘स्मर’** [। प । प ] दोन वा अधिक
[। प । प । प । - + ] एक

१७२ **‘सृष्टिलता’** [। प । प ] दोन वा अधिक
[। प । प । प । ~ +] एक

१७३ **अञ्जनी** [। प । प ] दोन वा अधिक
[। प । प । प । +] एक

१७४ **‘रतिकेलि’** [। प । प ] दोन वा अधिक
[। प । +, उ । प । +] एक

१७५ **‘चित्तरञ्जन’** [। प । प ] दोन वा अधिक
[। प । प । + ऽ ~ + ऽ ऽ । +] एक

१७६ **‘नयनचकोर’** [। प । प ] दोन वा अधिक
[। प । प । प ] एक

१७७ **‘प्रसन्ननयना’** [। प । प ] दोन वा अधिक
[। प । प । - - +] एक

१७८ **‘लतिका’** [। प । प ] दोन वा अधिक
[। प । प । - + ] एक

१७९ **‘युवतिभूषण’** [। प । प ] दोन वा अधिक

[उ । - + SS - । प । - +] एक

१८० **'नववधू'** [। प । प ] दोन वा अधिक
[-। प । - - +] एक

१८१ **'वत्सलता'** [। प । प ] दोन
[। प । - - + ] दोन

१८२ **'नागी'** [। प । प ] दोन वा अधिक
[- । प । - +]

१८३ **'मेघराज'** [। प । प ] दोन
[- । - + S - ~ । +] दोन

१८४ **'शिवराज'** [। प । प ] दोन वा अधिक
[। उ । - +] एक

१६६ **'प्रेमतारका'** [। प । प ] पादाकुलक दोन वा अधिक चरण
[। प । प । प । - - + ।। प । - - +]
एक संयुक्त चरण

(१) "आयुष्याच्या घनान्धकारीं
हास्यरसें मज रङ्गविणारी
**प्रेमतारका** एक मिळे जरि, उदासवाणा जीव पिसा
असेल कायमचा ऐसा." (कुक ८५)

(२) "आकाशींचा गुलाब फुलला,
माणिकमोत्यांचा रस भरला,
रङ्गदेवता बनवि तयाला, वास दरवळे चोहिकडे,
देठ दिसेना कुणीकडे." (दसु-यमा ५/५९)

१६७ **'आयुर्नौका'** [। प । प ] दोन वा अधिक
[। प । प । प । - - + ॥ प । - - +] एक

"अकस्मात उभविशी राजसे उन्मादक प्रीतिच्या खुणा,
भ्रमविशी मना. ध्रु॰
सुकल्या माळावरी उसळला
पर्जन्याचा झोत अवेळां,
धुन्द काजळ्या रात्रीं दिसला
दीपक चुकल्या वाटसराला,
कालौघामधि परी बहकली **आयुर्नौका** पिशापरी,
कशि धरूं तरी? (टिविसि-रमा ६/१)

१६८ **'कलकल'** [। प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[। प । प । प । +, उ । प । +] एक संयुक्त

"उशास पर्वत घेऊनि सागर
निद्रा करिती भूशय्येवर
**कलकल** तालांतून वाहला शान्त रसाचा नाद
तयाचा स्वप्नामधि पडसाद?
सुखशय्येंतिल सागर असला
अथाङ्ग शान्तीने भरलेला
त्यास हलवुनी फुडक मारितों दर्याच्या नस्तांत
नाचती तुफान झ न्झावात." २ (आ-कगु ४९)

१६९ **'श्यामाराणी'** [। प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[। प । प । प । - - +] एक (क्वचित दोन)

'श्यामा राणी गभीर रजनी' (केक १५२) या केशवसुतकृत कवितेवरून या जातीचें नाव घेतलें आहे.

(१) "जेव्हा जेव्हा वाढायातें
येई सुभद्रा ती त्या यतितें
भुलुनि पाहुनी तद्रूपातें तैसे नाना ढङ्ग करी." (किग्र ४९७)

(२) "गरिब बिचारा माधुकरी!
दुक्ख तयाला जन्मभरी. ध्रु॰

कडक उन्हाने जीव घाबरे,
कपोल सुकले, घर्मे भिजले
पायीं चटके, तापे डोकें धापा टाकित पळे जरी." १(राश्री-कि १८)

(३) "नवलाख दिवे हे तुझ्या घरीं,
कां जातिस दुसऱ्याच्या दारीं?
हा अनन्त पसरला नीलिमा
शान्त गभीर जयाची सुषमा
विभूति ही प्रभूची निस्सीमा नान्दतसे तव शिरावरी." (घा-मधुमा १)

(३) शशिवदना म्हणुं कसें तिला मी?
उसन्या तेजें वदन खुलवि तो निज तेजें सखिमुख विलसे. ध्रु॰
शशिच्या उदरीं जड दगड कसे,
सखिच्या उदरीं हिरा विलासे,
त्यांतुनि सोज्जवल भविष्य हासे, सखि तारकगणसदन कसें!"
(कुमा ५०)

ताम्बे यांची 'प्रणयप्रभा' नावाची जी कविता (तासक १०६) आहे ती वस्तुतः या श्यामाराणीजातीची आहे.

१७० **'हृदयेश्वरी'** [। प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[। प । प । प । + ऽ ~ +] प्रियलोचना एक

(१) "कां आड सखे तू येऽशि गे? ध्रु॰
दिन बहु झाले तिकडे येऊनि
अन्तःपुरिचें सुख ते सेवुनि,
असेल त्यांची उत्कण्ठा मनिं जाऊंदे परतुनि त्यांऽसिगें!" १
(किग्र ३६१)

पण हे किर्लोस्करांच्या नाटकांतील पद्य देवलांचे आहे.

(२) “पाहिलि का सुन्दरी
जनककुमारी कुणि तरी? ध्रु॰
बा उटजा, तव प्रसन्नतेला
जिचा समागम कारण झाला,

सांग कुठे रे विदेहबाला ती माझी **हृदयेश्वरी**?” १ (उपो ३७)

या जगकृष्ण उपाध्ये यांच्या कवितेंतील पहिलीं नऊ कडवीं शुद्ध रचनेचीं आहेत. उरलेल्या दोन कडव्यांत थोडे शैथिल्य आहे.

१७१ **‘स्मर’** [। प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[। प । प । प । - + ] लवङ्गलता एक

(१) “साध्य नसे मुनिकन्या मज ही,
परि वेडें मन ऐकत नाही. ध्रु॰
पाहुनि सखिच्या विविध विलासा
मन घेई हे बहु विश्वासा,
स्मर जरि तुष्ट न होई, मी परि बहुसुख यांतचि घेई.” (किग्र ३४१)

(२) “कुठुनि सखे वद येशी प्रतिभे? ध्रु॰
अज्ञेयाच्या अन्ध तमांतुनि
की तेजोमय खंब्रह्मांतुनि,
चैतन्याच्या की हृदयांतुनि सम्भवुनी स्फुरतेसी?” (च-कभा २)

‘मधमाशी’ (मानुक १९२), ‘प्रभूचा सहवास’ (उस २९०), ‘घुबडास’ (गोवा १३), ‘बन्दिवान गरुड’ (यध ६५), ‘केशवसुतास’ (कावि ५१), ‘केशवसुतांची कविता वाचून’ (कावि ५३), ‘हाक’ (तासक १८६), ‘भैरव’ (तासक १८७), ‘खटारा’ (कास्फू ६९) इत्यादि कविता या स्मरजातींत आहेत.

(३) “आज फिरुनि कां दारिं उगवला?
शपथ घेऊनी गेलां त्या दिनिं केलि न कां दुजि नारि?
(उगवला आज फिरुनि का दारिं?) ध्रु॰

खचित वाटलें याल कधीहि न,
भाजुनि पोळुनि गेलें हे मन,
ओस जाहलें सारें त्रिभुवन, जिती मरें संसारिं.” १ (तासक १९८)

येथे ‘उगवलां आज फिरुनी कां दारि’ हा ध्रुवपदाचा भाग कडव्याला जोडून म्हणावयाचा आहे म्हणून कडव्याच्या अन्तींची ‘रिं’ ऱ्हस्व आहे; पण अमुकच भाग जोडून म्हटला पाहिजे असे नाही. तेव्हा ही ‘रीं’ दीर्घ समजून पद्याची जाति स्मर ठरवायला काही प्रत्यवाय नाही.

१७२ **‘सृष्टिलता’** [। प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[। प । प । प । ~ +] समुदितमदना एक

(१) “तीच मनोहारिणी
जी ठसलीसे मन्मनीं. ध्रु॰
**सृष्टिलते**ची कलिका फुलली,
अनुपम माधुर्याने भरली,
जिच्या दर्शनीं तटस्थ वृत्ती
भान सर्वही विसरुनि जाती ती युवती पद्मिनी.” (केक १९१)

(२) “उठ गडे सत्वरी-॰ सेवा शेवटची ही करी. ध्रु॰
डाग नको हा वैधव्याचा,
मज सोसेना विरह पतीचा,
केला निश्चय सहगमनाचा अग्नि पेटवीं तरी.” (देशाप)

‘उदार चन्द्रा!’ (तासक १३७), ‘निजल्या तान्ह्यावरी’ (तासक १४२), ‘फेरीवाला’ (तासक १४४), ‘पक्षी पिन्जऱ्यांतून उडाला’ (तासक १४४), ‘दृष्ट हिला लागली’ (तासक १४५), ‘विरहांतील चित्तरज्जन’ (तासक १४६), ‘डोळ्यांतील जादू’ (तासक १४७), ‘दे पूर्ण हृदय सुन्दरी’ (तासक १५३), ‘समर्थांच्या पायाशीं’ (यध ५७), ‘अनन्ताची आरती’ (सारा १५२), ‘उम्बरांतले किडे’ (कास्फू ३८) इत्यादि कविता या सृष्टिलजातींत आहेत. पद्मिनी हे एका वृत्ताचें नाव असल्याने तें या जातीस देतां येणार नाही.

१७३ **अञ्जनी** [। प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[। प । प । प । +] चन्द्रकान्त एक

(१) “लङ्केहूनि अयोध्ये येतां
रामऽ लक्ष्मऽणऽ सीता
हऽनूमन्तें **अञ्जनी** माता दाखविली रामा”

हे मूळ अञ्जनीचें गीत बसवलिङ्गाने रचिलेलें आहे असे श्री. जगन्नाथ रघुनाथ अजगांवकर म्हणतात; कारण, या गीतांत शेवटीं “मातापुत्रां आलिंगन । बसवलिङ्गा समाधान” असे दोन चरण आहेत. या अञ्जनीच्या गीतावरून या जातीला अञ्जनी हे नाव मिळाले आहे.

(२) “कपी घेऊनी बसला वीणा,
घूक लागला घेऊं ताना,
रसिक न कोणी जनीं म्हणोनी श्मशान गानागार.” १ (टिक १४८)

‘पुषाप्रत’ (केक ९०), ‘फुलपाखरू’ (केक १५५), ‘गाण्याचें गाणें’ (विक ८६), ‘दसऱ्याचें सोनें’ (विक ९०), ‘सेवा’ (टिक १९१) ‘लोकमित्र’ (टिक १९२) ‘बोम्बाबोम्ब’ (टिक २१८), ‘श्मशानांतले गाणें’ (गोवा २३), ‘अवेळीं ओरडणाऱ्या कोकिळेस’ (गोवा ५०), ‘बागेंत बागडणाऱ्या लहानग्यास’ (गोवा ९१), ‘आशा-निराशा’ (कावि १०), ‘एकच शान्तिस्थान’ (गिका २८), ‘इरलेवाली’ (माभा ५४) इत्यादि कविता या अञ्जनीजातींत आहेत.

१७४ **‘रतिकेलि’** [। प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[। प । +, उ । प । +] चन्द्रकला एक

(१) “बघुनि सुभद्रेला-॰ कसा यति वेडावुनि गेला! ध्रु॰
हस्तांतिल ती गोमुखि गळली,
आशीर्वचनीं जिव्हा चळली,
नासिकाग्र दृष्टीही वळली
निर्लज्जचि झाला -॰ टकमक मुख ते बघण्याला.” (किग्र ४९६)

(२) "कपटानृतभूमी -॰ मायादम्भगेह नामी. ध्रु॰

केवळ **रतिकेलीचें** मन्दिर

सुरतोत्सव सौख्याचें आगर

ऐशी गणिकातनु ही सुन्दर

म्हणुनि कामहोमीं-॰ चतुरे, तोषवि तो कामीं." (देम ५७)

'हरिमुरलीचा मधुर गीतरव॰ (टेआ ३/८६) ही कविता या रतिकेलिजातींत आहे.

१७५ **'चित्तरञ्जन'** [। प । प ] पादाकुलक दोन वा अधिक

[। प । प । + ऽ ~ + ऽ ऽ । +] एक

(१) "मारी नाड तमारे हाते प्रभु सम्भाळजो -॰ रे

मुजने पोताने जाणीने प्रभुपद पाळजो -॰ रे ध्रु॰

पथ्यापथ्य नथी समजातूं

दुक्ख सदैव रहे उभर उभरातूं

मने हशे शूं थातूं? नाथ, निहाळ जो -॰ रे (केशव-आभ १९३)

(२) "जाऊं याहो खेळायला चित्ता रज्जवाया. ध्रु॰

कुञ्जवनांमधि गोपस्त्रिया त्या

रञ्जविती हो परमात्म्या त्या

फेर धरूनी छाऽन चित्ता रञ्जवाया.' (अनामक)

१७५ अ **'मुक्ता'** [। प । प ] पादाकुलक दोन वा अधिक

[। प । - - + ऽऽ । प । +] एक

"नका करूं अविचार!

भार्या नूतन वृद्धपणीं ती व्याधिच देते ताप अपार. ध्रु॰

शक्ति नसोनी मुक्ता हातीं

धरितां प्रबळ हिरावुनि नेती

जरठ पतीची तीच गती-॰ घ्या मनिं यांतिल सार" १ (देशा ४७)

नरहर शङ्कर रहाळकर यांच्या 'धिक्कार'! आणि 'क्षिप्रातीरावर' (रपु १७, १७१) या कविता या मुक्ताजातींत आहेत.

१७६ **‘नयनचकोर’** [। प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[। प । प । प ] अनलज्वाला एक

(१) “जो मम नयनचकोरा इन्दू,
नाही ज्याला मत्सरबिन्दू,
दुर्भाग्ये, तू त्या नच निन्दूं माझ्या रामा. १
रामापरता भेदचि नाही,
दोन्ही मूर्ती एकचि पाही,
ही मी आण नृपाची वाहीं, नटळे नेमा.” २ (किग्र ५७६)

(२) “विनति एक अजि करित पदाला,
परिस भगिनिच्या प्रेमवचाला या समयाला. ध्रु॰
अन्धाराची रजनी सरली,
हसत हसत ही उषा पातली,
अरुणमीलनीं रङ्गुनि गेली,
विहग काढिती मधुर रवाला या समयाला.”
(मस-आमा ऑग १९३१)

१७७ **‘प्रसन्ननयना’** [। प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[। प । प । - - +] शुभगङ्गा एक

“एक दरीच्या तोण्डापाशी
बसलो होतो ऐके दिवशीं
गाळित दुक्खे मी अश्रूंसी टपाटपा! १
रम्य चन्द्रिका होती पडली
प्रसन्ननयना सृष्टी दिसली
परि मच्चिन्ता वाढत गेली क्षणोक्षणीं.” २ (मानुक ६२)

१७८ **‘लतिका’** [। प । प ] पादाकुलक दोन वा अधिक

[। प । प । - + ] वंशमणि एक

पादाकुलकाचा दुवा [। प । प । - +] या मात्रावलीशी जुळतो, [- । प । प । -+] या मात्रावलीशी जुळत नाही. अर्थात पुढील पद्यांत अन्त्य चरणाच्या आरंभीं छन्दोभङ्ग आहे.

(१) "अभिवादन करित निसर्गा सुन्दर शोभा. ध्रु॰
प्रभा रवीची करि अर्धाङ्गी,
ज्योत्स्ना ठेवी विधुच्या सङ्गीं,
**लतिके**शी तरुच्या उत्सङ्गीं,
(जो) वसुन्धरेशी योजी अम्बरभागा." (कोप्रे)

(२) "कां असा साजणी, सांग धडधडे उर? ध्रु॰
पवन वाहतां तरुशिखरावर
जेवि थरारे ताम्बुस मोहर,
कम्पित होई त्यापरि अधरऽ
(पा-) हिलें कोणतें चित्र असे भेसूर?" (काकि-यमा ३३)

१७९ **'युवतिभूषण'** [। प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[उ । - + ऽऽ - । प । - +]

(१) "फुलें वेलीचीं-॰ भूषणें तशीं युवतीचीं. ध्रु॰
नाही कधि गे मी चोरीलीं,
द्विजयज्ञधनें नच मी हरिलीं,
बाळें वित्तार्थ न कधि नेलीं,
रीति चौर्याची-॰ धरिली ही सुविचाराची." (देमृ ४१)

कडव्याच्या तिसऱ्या चरणाच्या अन्तीं आवर्तन पूर्ण असल्याने पुढील चरणांत आद्यतालकपूर्वगण असतां कामा नये पण तो तर येथे पाच मात्रांचा आहे! येथे छन्दोभङ्ग होतो. पण 'शास्त्रद्रूढिर्बलीयसी!' 'घटोत्कच माया' (तासक ६४) 'आवड आणि प्रेम' (टिक १०९), 'पळाचा

भरवसा' (टिक २०६) 'घरांत बसलेल्या काजव्यास' (गोवा ६) इत्यादि कविता या युवतिभूषणजातींत आहे. आधीचे चरण सोळा मात्रांचे हवे असल्यास ते [उ । प । ~ +] या मात्रावलीचे घ्यावेत म्हणजे मग मात्र छन्दोभङ्ग होणार नाही. (पुढे वधूवल्ली आणि स्वरसुधा पहा.)

युवतिभूषणजातीसारख्या रचनेंत कित्येकदा चौथ्या चरणाचा पूर्वार्धच असतो आणि उत्तरार्धाच्या ठिकाणीं ध्रुवपदांतील तेवढा भाग आवृत्त करण्यांत येतो. परन्तु तो कडव्याच्या घटनेंत धरितों येत नसल्याने ती जाति वेगळी मानिली पाहिजे. (खाली १८४ शिवराजजाति पहा).

१८० **'नववधू'** [। प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[-। प । - - +] कर्णफुल्ल एक

येथे छन्दोभङ्ग होतो; परन्तु ताम्बे यांच्या पुष्कळच लोकप्रिय कविता या जातीच्या असल्याने ती युवतिभूषणजातीप्रमाणेच रूढ झाली आहे.

(१) "**नववधू** प्रिया, मी बावरतें;
लाजतें, पुढे सरतें, फिरतें. ध्रु॰
मला येथला लागला लळा
सासरि निघतां दाटला गळा,
बागबगीचा येथला मळा
सोडितां कसें मन चरचरतें!" १ (तासक ११५)

ताम्बे यांची 'प्रणयप्रभा' (तासक १०६) ही कविता मात्र या जातीची नसून श्यामाराणीजातीची आहे हे ध्यानांत ठेविलें पाहिजे. अर्थात नववधू जातीला प्रणयप्रभा म्हणणें चुकीचें होईल.

(२) "भिऊं नये मुळीही मना,
संशयी सोड कल्पना. ध्रु॰
काल चान्दणें सुन्दर फुललें,
आज गगन मेघांनी भरलें,
निर्दाळोनी ढग हे काळे
झळकेल उद्या नभिं चन्द्र पुन्हा." (कास्फू ९७)

१८१ **'वत्सलता'** [। प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[। प । - - + ] अचलगति दोन

“या हो या हो प्रियजन या हो
जाऊं चला परमेश्वर सदनीं
भक्ती शान्ती धरुनि मनीं
सुन्दर गायन गा वदनीं
देवाजीच्या वत्सलतेला
उपमा न जगीं उपकारांला,
स्मरुनी चित्ती ते सगळे
प्रेमाश्रूंची वाहुं फुलें.” २ (उस ४५७)

१८२ **‘नागी’** [। प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[- । प । - +] उद्धव एक

(१) “नागिणी चपल खलजिव्हा
दु:स्वभावा धरि दावा,
चावेल सन्धि ये जेव्हा. ध्रु॰
सुन्दरदाराकरलोभाने
विघ्न विवाहीं केले त्याने
म्हणतिल, लाञ्छन ते नावा.” १ (देशा १०७)

(२) “ही आग भडकली खाली!
तज्ज्वाला गगनाला
पोचली आज या कालीं. ध्रु॰
किती पोकळ्या कळ्या कोवळ्या,
किती गळाल्या फूलपाकळ्या,
वनता उद्याना आली.” १ (रपु ७९)

(३) “मजशी नकळे -॰ मी अथवा जन हे चकले. ध्रु॰
प्रपञ्च मोठा आप्पलपोटा
परमार्थाचा पथ वा खोटा
पडलें मज गूढ न उकलें.” (विक ८२)

१८३ **‘मेघराज’** [। प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[- । - + ऽ - ~ । +] दोन

"मज ओलावा हवा
सुकलेल्या या जिवा. ध्रु॰
कुणा तरी हृदया बिलगावें,
भ्याड मुलापरि झोपीं जावें,
स्वप्न गोड मग बघत रहावें,
आस असे ही जिवा,
कोणि तरी तोषवा.१
या उतरा मेघराज माझे
चाखूं द्या रस ताजे ताजे
तप्त मना करितील गार जे,
प्रेमरवा ऐकवा
या मोरा नाचवा." २ (घा-मधुमा ८)

१८४ **'शिवराज'** [। प । प ] पादाकुलक दोन वा अधिक
[। उ । - +]

(१) गडावर जाऊं -॰ **शिवराज**दर्शना लाहूं ध्रु॰
आमचा गुरु श्रीशिवराणा
पुनरुज्जीवन हेतु पुराणा,
महाराष्ट्र वीर्याचा बाणा
सड्कटीं बाहूं." (विक ६)

'शिवराजदर्शन' (विक ५), 'चाललेली घटिका' (टिक २०७), 'मुरली'' (टिक २१४), 'आन्धळ्यांची माळ' (गोवा ३८), 'पुनर्जात प्रेमास' (गोवा ५५), 'कवि आणि कैदी' (गोवा ९४), 'मनांतली पाल' (गोवा १२८), 'लाण्डोर' (गोवा १७२) आणि 'जागेपणचें स्वप्न' (गिका ६३) या कविता या प्रकारच्या आहेत.

१८५ **‘नगरभूषण’** [। प । - - ~ +]
[। प । +]

“जो या नगरा भूषण खरा
जैसा भाळीं शोभे हिरा
ज्याच्या सद्‌गुणगानीं गिरा
रङ्‌गलि सुजनांची. १
निर्धन असतां धनदापरी
औदार्यानें अङ्‌गीं धरी,
दुदैवाने छळिले तरी
शील न सोडी जो.” २ (देमृ २६)

यांतील पहिले तीन चरण [- - । प । ~ +] या मात्रावलीचे आहेत असेहि म्हणतां येईल.

पुढील चार जातींच्या कडव्यांत अचलगतिमात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

१८६ **‘अलकभार’** [। प । - - +] दोन वा अधिक
[। प । प । प । प । - - +] एक

१८७ **‘रामरसायन’** [। प । - - +] दोन वा अधिक
[। प । प । प । - - +] एक

१८८ **‘श्रद्धा’** [। प । - - +] दोन वा अधिक
[। प । प । प । - +] एक

१८९ **‘परात्परकरुणा’** [। प । - - +] दोन वा अधिक
[। प । प । प । +] एक

१८६ **‘अलकभार’** [। प । - - +] अचलगति दोन वा अधिक
[। प । प । प । प । - - +] एक

(१) "भलतयाहि जीवा राऽमनामचि तारी. ध्रु॰.
योगयागहिमपर्वत रे
त्यांत साधक न सर्व तरे
सर्व गमे गुरु गर्व होय अघ पर्व त्यांत कवि सर्वहि
म्हणती रामनाम." १ (मोप्र १।९९)

(२) "चान्द बिजेचा नभावरी
पाहुनि उमले विभावरी,
कवळुनि बसली दारापाशी पाय घेईना पुढे मुळी, ही
नाव खुळी." १ (आ-कगु ५९)

(३) "सख्या साजणा, बघा गडे
कोर चालली कुणी कडे;
दिलांत धडधड तरी लोटते सखी चान्दणी तिला पुढे ही
प्रियाकडे." १ (वव्यश-पिंपा ३८)

(४) "आकाशींची वीजच की
अवतरली या भूलोकीं
**अलकभार** मृदु मन्द वायुच्या झुळुकी सरशी उडे पहा जणु
षटपद हा." (श-मा ६१)

१८७ **'रामरसायन'** [। प । - - +] अचलगति दोन वा अधिक
[। प । प । प । - - +] हरिभगिनी एक

(१) "जागा जागा झटका रे
गुरुपदिं जाऊनि हटका रे
**रामरसायन** घ्या तुम्हि घुटका तरीच होईल सुटका रे." १
(रामदास, पस १/२८४)

(२) "नीलनील नभसरोवरीं
चन्द्रकलेसह केलि करी
नक्षत्रांची गोड सहचरी दावा मजल कोणि तरी." (कावि २५)

(३)                    “तिमिराने बघ झाकियलें
हृदयाचें दर्पण अपुलें,
प्रीतिभाव दिसती कुठले?
प्रतिबिम्ब नको नयनामधलें, हृदय पाहुं दे हृदयातें.”
(देवि-विवी १४६)

(४)                    “माळाच्या पायालगती
गावाच्या शेजेभवती
अफाट दुनिया वास न करिते, चुकूनि पाहीना जेथे
आनन्दाची फुगडी धरुनी करितों आम्ही खेळ तिथे.” (पाआ ११)

‘मनस्ताप’ (कावि ९), ‘बॅक्बेच्या वाळवण्टांत’ (कावि ६८) ‘असो स्थिर तुझा दृक्सन्देश’ (माजुस्व ३९) ह्या कविता या रामरसायन जातींत आहेत.

१८८ **‘श्रद्धा’** [। प । - - +] अचलगति दोन वा अधिक
[। प । प । प । - +] लवङ्गलता एक

“प्रीत हाच मज पतङ्ग द्या
स्वैर मनाने उडविन त्या;
झणी नभा चढवीत खुल्या
उडत जाऊं द्या स्वैर भरारी गिरक्या घेऊनि उन्चऽ?
धागा श्रद्धेचाच खुला
सहज सोडुनी लाम्ब भला
मिळुनि जाऊं द्या गगनाला;
तुटेल ऐशी भीती त्याची वाटु न द्या मनिं व्यर्थऽ.” (फकीर-पारि २३)

१८९ **‘परात्परकरुणा’** [। प । - - +] अचलगति दोन वा अधिक
[। प । प । प । +] चन्द्रकान्त एक

"ईश्वर पङ्कज जेवि मतङ्गज सङ्कट उद्धारितो,
मनिं भाव मनुज धरितोऽ सुलभ त्या तो. ध्रु॰
सङ्कटिं धीर न सोडिं कधी
हृदयि अविश्वासास वधीं;
अकलुष ठेवि सदा निज धी,
इश **परात्पर करुणा** तुजवर अविलम्बें करितो." १ (कोगु)

'निजजनजीवन' (उपो ४०), आणि 'मलाच मी हसलों (कोका १/८०) या कविता या परात्परकरुणाजातींत आहेत.

पुढील चार जातींच्या कडव्यांत [- - । प । - +] या मात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

१९० **'मदनहुताशन'** [- - । प । - +] दोन वा अधिक
[। प । प । प । +] एक वा दोन

१९१ **"वधूवल्ली"** [ - - । प । - +] दोन वा अधिक
[- - । - + ऽऽ - । प । - +] एक

१९२ **'पञ्चकल्याणी'** [- - । प । - +] दोन वा अधिक
[- । प । प । - +] भूपति एक वा दोन

१९३ **'दीप'** [- - । प । - +] दोन वा अधिक
[+ ऽ ˜ - - । +] एक

१९० **'मदनहुताशन'** [- - । प । - +] दोन वा अधिक
[। प । प । प । +] चन्द्रकान्त एक वा दोन

"लवही धीर नसे गे मजशी,
आता अन्त जरी तू बघशी,
न जरी पूर्ण काम मज करिशी,
**मदनहुताशन** दग्ध करिल मज तू पाहत असतां,
झाला जरि अनुताप तुला मग रक्षा ये हाता." (देशाप ६/३)

१९१ **“वधूवल्ली”** [ - - । प । - +] दोन वा अधिक
[उ । - + ऽऽ, - । प । - +]

“**वधू** ही **वल्ली-**० मज दिसे सङ्कटीं पडली. ध्रु०
वर हा आम्रवृक्ष मनिं भरला
परि तो स्वीकारिल का मजला?
उपजे शङका याची तिजला
अशा या काळीं-० पाहिजे सखी कुणि जवळी.” १ (देशाप)

येथे अन्त्य चरणारम्भीं एक मात्रा अधिक झाल्याने छन्दोभङ्ग होतो. पहिले तीन चरण जर [- - । प । - +] या मात्रावलीचे आहेत तर अन्त्य चरणारम्भीं आद्यतालकपूर्वगण पाच मात्रांचा चालणार नाही; तो चारच मात्रांचा पाहिजे; ‘अशा या काळी’च्या ठिकाणीं ‘ऐशा काळीं’ पाहिजे. परन्तु या चालीवरील कित्येक कवितांत कडव्याचे पहिले तीन चरण [-। प ।] असतात तेथे तर चौथ्या चरणाच्या आरम्भीं तर ४-५ मात्रा अधिक होऊन छन्दोभङ्ग होतो! मागे युवतिभूषणजाति आणि पुढे स्वरसुधा पहा.

१९२ **‘पञ्चकल्याणी’** [- - । प । - +] दोन वा अधिक
[- । प । प । - +] भूपति एक वा दोन

या जातीला नाव ‘पञ्चकल्याणी घोडा अब्लख’ या लावणीवरून दिलें आहे. लावणीची रचना मात्र तशी शुद्ध रेखीव नाही.

(१) दारावरुन कोण मध्यान्हीं
गेला दौडत वाऱ्यावाणी?
शोभिवन्त वारू काय पञ्चकल्याणी! (२६७)

(२) “सुटला पितृदिशेचा वारा
झाकी मेघ नभ:पथ सारा
घन गर्जति तोफेपरी, वर्षती गारा,
कडकडाट करिती विजा, येति जलधारा.” (किग्र ५४९)

या पद्यांतील इतर कडवीं शिथिल आहेत; परन्तु ‘शान्तीस’- (सोक ३/१५), गं. के. शिराळकरकृत ‘विजयी वीर’ (सुहा २५), आणि वि. ह. आपटेकृत ‘आहवन’ (आ-माला ४४) या कविता सर्वथा या पञ्चकल्याणीजातींत आहेत. ‘सञ्जिवा, शोधुं कुठे तुज आतां’ (यब ७०) या पद्यांतील चौथें कडवें वगळलें तर उरलेलीं बारा कडवीं पञ्चकल्याणीजातीचींच आहेत.

”कञ्चनी रसरङ्गाची खाणी
शेकडों हृदयांची ही राणी
लागली गावया सहज पाखरावाणी” (माजूस्व ७२)

या कवितेंत पहिल्या दोन चरणांत आद्यतालकपूर्वगण पञ्चमात्रक असल्याने एक मात्रा अधिक होऊन छन्दोभङ्ग होतो. पुन्हा या कवितेंत दोन जातींचें मिश्रण आहे.

१९३ **‘दीप’** [- - । प । - +] दोन वा अधिक
[+ ऽ ~ - - । +] एक

“प्रकाश पाडीना तिमिरा झाडीना
काही केल्या दीप वरी हा डोकें काढीना. ध्रु॰
वाहे चोहीकडून वारा
**दीपा** देईना तो थारा
करितो वरचेवर बहु मारा
शाऽन्त होईना.” (सुमौ ११९)

पुढील पाच जातींच्या कडव्यांत उद्धवमात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

१९४ **‘वनराज’** [- । प । - +] दोन वा अधिक
[- । प । प । प । +] एक

१९५ **‘महाकाली’** [- । प । - +] दोन वा अधिक
[- । प । प । प । +] एक

१९६ **‘पुष्पिता’** [- । प । - +] दोन वा अधिक
[- । प । - + ऽऽ - । - + + ऽ ~ । +]

१९७ **‘मेधा’** [- । प । - +] दोन
[- । प । प । - +] एक

१९८ **'मुरलीमोहन'** [- । प । - +] दोन वा अधिक
[ । प । - - -] एक

१९४ **'वनराज'** [- । प । - +] उद्धव दोन वा अधिक
[- । प । प । प । +] भवानी एक

(१) "हा न्याय असे जगताचा! ध्रु॰
मेण्ढरें वासरें गाई
त्राता कुणि ज्यांना नाही
कापिती अशांस कसाई,
जङ्गलांत घुसुनी कुणि उतरिना नक्षा वनराजाचा" १ (कास्फू ५२)

परन्तु पुढील कवितेंतील कडव्यांत शेवटीं [ - । प । - +] या मात्रावलीचा आणखी एक चरण आहे.

"तो महाराष्ट्र शिवबाचा
लोपला सर्वथा साचा,
लेशही मुळि न अजि त्याचा,
आजला जरी राहता, जगा सांगता कोण शिवराणा
हाय तो हरपला दाणा!" (टेआ ३/१२१)

१९५ **'महाकाली'** [- । प । - +] उद्धव दोन वा अधिक
[- । प । प । प । +] अरुणप्रभा एक

(१) "रे हिन्दबान्धवा, थाम्ब या स्थळीं अश्रु दोन ढाळीं!
ती पराक्रमाची ज्योत मावळे इथे झांशिवाली! ध्रु॰
ताम्बेकुलवीरश्री ती
नेवाळकरांची कीर्ती
हिन्दभूध्वजा जणु जळती,
मर्दानी राणी लक्ष्मीबाई मूर्त **महाकाली!**" १ (तासक १८४)

(२) "तो प्रेमयोगि झाला. ध्रु॰

जो नाचे लतिकासङ्गें,
जो तारांमध्ये रङ्गे,
जो शून्यामध्ये गुङ्गे
जो कृत्रिमतेला विसरुनि जाणें दीक्षा ही पढला.'' १ ( सा निसा १५४)

'तू टाक चिरुनि ही मान' (देशा ६७), 'भग हृदयाचे उद्‌गार!' (सुमौ ११३), 'कल्पलतेस' (यभा ५३), 'चल सोड!' (माभा ७८), 'मोगरा स्वयेंच पुसे' (कुमा १९) आणि 'पाळीव पोपटास' (कास्फू ४३) ही पद्यें या महाकालीजातीचीं आहेत.

१९६ **'पुष्पिता'** [- । प । - +]उद्धव दोन वा अधिक
[- । प । - + ऽऽ - । - + + ऽ ~ । +]

(१) ''मशि बोलुं नको गोविन्दा-॰ मज आला तुझाऽराग ध्रु॰.
तू दहिदुध चोरुनि खाशी,
घट अवघे फोडुनि जाशी,
पदराला धरिशि कशाला? -॰ मज आला तुझा ऽ राग.'' १

या प्राचीन पद्याच्या कडव्याच्या अन्त्य चरणांतील उत्तरार्ध हा वस्तुत: ध्रुवपदाचाच भाग असल्याने कडव्याचें स्वरूप निश्चित करितांना तो गणतींत धरितां कामा नये. वस्तुत: हे कडवें म्हणजे उद्धव [- । प । - +] मात्रावलीचीच त्रिपदी ठरते. छन्दोरचनेच्या पहिल्या आवृत्तींत मी लिहिलेल्या कवितेंत हा उत्तरार्ध भिन्न शब्दांचा आहे:-

(२) ''चल वाजव सखि, सारङ्गी,-॰ घे हरुनी देहभान. ध्रु॰
त्या कम्पित होतां तांती
स्वरभाव मिळुनी जाती,
मुरकीची काय मजा ती! -॰ कर मज तू भाग्यवान.'' (२६८)

यानन्तर 'मुरली' (गिका १०४), 'आशीर्वाद' (यभा ३९), 'भास' (गिका ८४) आणि इतर कविता या पुष्पिता जातींत रचण्यांत आल्या.

(३) ''तुज द्याया आशीर्वादा-॰ मी उचलूं केवि हात. ध्रु॰
**पुष्पिता**लता उद्यानीं
घालितां तिला मी पाणी

तेथल्या तेथ ती होई-॰ अविलम्बें भस्मसात." १ (यभा ३९)

१९७ **'मेधा'** [- । प । - +] उद्धव दोन वा अधिक
[- । प । प । - +] भूपति एक वा दोन

(१) "त्या उजाड माळावरती
बुरुजाच्या पडल्या भिन्ती
ओसाड देवळापुढति वडाचा पार,
अन्धार दाटला तेथ भर भरपूर." (बाक ५९)

(२) "देशाच्या पालनवाला
तो शिवाजि राजा झाला.
धर्माचा पालनवाला
तो शिवाजि राजा झाला. ध्रु॰
गर्जते भवानी **मेधा**,
चमकते भवानी खाण्डा,
चाललाच भगवा झेण्डा, रणनाचाला." १ (गोक ३७)

गोविन्दकवीची 'शिवाजी' ही ओजस्वी कविता या मेधाजातींत आहे. या जातीच्या कडव्यांचे आणि गङ्गा जातींच्या कडव्यांचे श्री. आनन्दराव टेकाडे हे पुष्कळदा मिश्रण करितात.

१९८ **'मुरलीमोहन'** [- । प । - +] उद्धव दोन वा अधिक
[ । प । - - -] कर्णफुल्ल एक

"भारता तार या कालिं-कालिं हरि वाजिव गीता मुरली
नाचून कालियामौलिं-मौलि हरि वाजवि गीता मुरली.
हरि वाजिव गीता मुरली! ध्रु॰
धाव रे धाव वनमाली!
तुजवीण नाहि कुणि वाली,
आम्हांस तार या कालीं
तुझि आशा केवळ उरलि उरलि. १

तव मुरलीमोहनगीत
निर्जिवा करी जीवन्त
षण्ढास समरपण्डीत,
रणधीररिपुसि भयभीत,
अबलास करिल बलशालि-शालि." १ (गोक २७)

पुढील तीन जातीच्या कडव्यांत शुद्धसतीमात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

१९९ **'गया'** [। प । - +] दोन वा अधिक
[। प । प । प ।- +] एक

२०० **'नारी'** [। प । - +] दोन वा अधिक
[। प । प । प । +] एक

२०१ **'शशिकुल'** [। प । - +] दोन
[। प । प । - +] एक

१९९ **'गया'** [। प । - +] शुद्धसती दोन वा अधिक
[। प । प । प ।- +] लवङ्गलता एक वा दोन

(१) "या रे सज्जन जनहो या रे
मनीं धरुनि विनया रे! ध्रु॰
होतो नाश तया रे
यमास नाहि दया रे
हरिगुणकीर्तन श्रवणमनन करुं काशी हेचि **गया** रे." (अपस ५१ वें)

(२) "मङ्गल नाम तुझें की
मज उच्चारूं दे की
तार कसें या लोकीं
दास अनन्त कृपाघन इच्छित रङ्गणणिं येऊनि दे की." (अपस ११ वें)

'अन्तर माझें साधें' (जोसवि-यमा ५९/१) हे पद्य या गयाजातीचें आहे.

२०० **‘नारी’** [। प । - +] शुद्धसती दोन वा अधिक
[। प । प । प । +] चन्द्रकान्त एक

“अपराधाविण पतिला
छळितां आनन्दाला
मानुनि निष्कारण कोपाला वाढविती **नारी.**” (किग्र ६००)

हे पद्य समग्र या प्रकारचें आहे.

२०१ **‘शशिकुल’** [। प । - +] शुद्धसती दोन वा अधिक
[। प । प । - +] वंशमणि एक

“शशिकुलभूषण सदया
मत्प्राणेश्वर विजया
विनवी ही तवजाया मान्य कराया.” (किग्र ४७०)

या पद्याच्या चार कडव्यांपैकी दुसरें तेवढें शिथिल आहे.

खालील सात जातींच्या कडव्यांत [उ । प । ~ +] या पर्वतीमात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२०२ **‘धरणी’** [उ । प । ~ +] दोन वा अधिक
[उ । - +, ऽऽ - । प । प । प । ~ +] एक

२०३ **‘कण्टकदरी’** [उ । प । ~ +] दोन वा अधिक
[- । प । प । प । ~ +] एक

२०४ **“स्वर्गसौन्दर्य”** [उ । प । ~ +] दोन वा अधिक
[। प । प । प । ~ +] एक

२०५ **‘निस्सार’** [उ । प । ~ +] दोन वा अधिक
[। प । +, उ । प । +] एक

२०६ **‘स्वर्गसुख’** [उ । प । ~ +] दोन वा अधिक
[- । प । प । - +] एक वा दोन

२०७ **‘स्वरसुधा’** [उ । प । ~ +] दोन वा अधिक
[उ । - +, ऽऽ - । प । - +] एक

२०८ **‘कालचक्र’**, [उ । प । ~ +] दोन वा अधिक
[- । प । प । ~ +] एक वा दोन

२०९ **‘सुरमणि’** [उ । प । ~ +] दोन वा अधिक
[ - - । ~ + ऽ - - । +] एक

२१० **“विविधरसा”** [- । प । प । ~ +] एक
[उ । प । ~ +]

२११ **“सुभद्रावर”** [- - । प । + ऽ ~] दोन वा अधिक
[- - । + ऽ ~ - - । +] एक

२०२ **‘धरणी’** [उ । प । ~ +] पर्वती दोन वा अधिक
[उ । - +, ऽऽ - । प । प । प । ~ +] एक

“पाहयलं ग दारीं -॰ का हसूनि खुदकन तरी? ध्रु॰
काल दुपारीं विहिरीवरी
होति एकटी तू सामुरी
पाणी प्याया आलों परी
तोच सुकुमारी-॰ पाण्याची चरवी तुझिया करवी
पडली **धरणी**वरी” (सोचौ-सुगी ९१)

येथे कडव्यांतील पहिले तीन चरण [उ । प । ~ +] असें न वाटतां [। प । - - ~ +] असे दिसतात; पण तसे ते घेतल्यास आणि म्हटल्यास पुढील चरणाच्या आरभ्भीं एकच मात्रेच्या आद्यतालकपूर्व गणाची कूस राहते; आणि तो गण तर पाच मात्रांचा आहे. मग छन्दोभङ्ग होतो. तो टाळायचा असला तर कडव्याचे पहिले चरण [उ । प । ~ +] असेच पाहिजेत.

२०३ **‘कण्टकदरी’** [उ । प । ~ +] पर्वती दोन वा अधिक
[- । प । प । प । ~ +] कमललोचना एक

“हां हां जाऊं नको बा वरी,
असती जाण सर्वही उरी,
करितिल कुदशा तव सत्वरी,
मन्दिर नोहे, **‘कण्टकदरी**!’

कुणि म्हणे मित्र, 'ये खाली, ये तू सुटशिल येथूनि तरी! " (सुमौ १०८)

येथे पहिले चरण [उ । प । ~ +] या मात्रावलीचे घेतां येत असल्याने छन्दोभङ्ग होत नाही. पण

"पडलों बन्दीच्या मी घरीं
भुयार खाली, माडी वरी,
वाटा दोनचि जर यापरी
काय करूं त्या ठायीं तरी?
वर जाऊ अथवा खाली उतरूं, संशय हा अन्तरीं." १ (सुमौ १०७)

येथे कडव्याचे आरम्भीचे चरण [। प । - - ~ +] असे आहेत आणि अन्त्य चरणाच्या आरम्भीं दोन मात्रांचा आद्‌यतालकपूर्व गण आहे. तेव्हा सान्ध्यावर एक मात्रा अधिक होऊन छन्दोभङ्ग होतो.

केशवसुतकृत 'कोणीकडून!-कोणीकडे?' (केक १४३) या कवितेलाहि ही चर्चा लागूं आहे. मात्र त्या कवितेंत कडव्याचा अन्त्य चरण आखूड म्हणजे [- । प । प । ~ +] या मात्रावलीचा असल्याने त्याची जाति निराळी होते. (खाली २०८ कालचक्रजाति पहा.)

२०४ "**स्वर्गसौन्दर्य**" [उ । प । ~ +] पर्वती दोन वा अधिक
[। प । प । प । ~ +] समुदितमदना एक

"नवलाख झुले लश्कर -॰ तळपे भाला वरच्यावर. ध्रु॰
दिसतें एकच वर अम्बर,
खाली सैन्याचा सागर,
नाही नजर ठरत त्यावर,
जरिपटका डौलांत डोलतो भरजरि हत्तीवर.
हौदा सोन्याचा सुन्दर,
वरती मोत्यांची झालर;
भाऊ - दक्षिणचा भास्कर,
स्वर्गाचें सौन्दर्य लोटलें ह्या तर सैन्यावर." (अज्ञा ६८)

२०५ **‘निस्सार’** [उ । प । ~ +] पर्वती दोन वा अधिक
[। प । +, उ । प । +] चन्द्रकला एक

”**निस्सार** असे संसार सखे, पण अम्हां कधी कळणार.? ध्रु॰
पहा या श्रावणमासांतले
रवीचे किरण कसे कोवळे
ढगांतुन खुले, क्षणीं मावळे-
तसा असे संसार मनीं पण केव्हा हे ठसणार?” (घाली ३३)

२०६ **‘स्वर्गसुख’** [उ । प । ~ +] पर्वती दोन वा अधिक
[- । प । प । - +] भूपति एक वा दोन

“कोणी बालक अङ्कावरी
घेई जो जो जो त्या करी;
आलापी मञ्जुळ रवें गायना हर्षे,
ती गानमिषें त्यावरी सुधेतें वर्षे.
कोणी बालक घेई कडे
जावळ ज्याचें भुरु भुरु उडे,
बोबडें बोबडें वदे, अकारण हासे,
पाहतां त्यापुढे तुच्छ **स्वर्गसुख** भासे.” (विक ११९)

२०७ **‘स्वरसुधा’** [उ । प । ~ +] पर्वती दोन वा अधिक
[उ । - +, ऽऽ - । प । - +] एक

गळ्यांतुनि काढिशि जी स्वरसुधा
हरी ती मनिंच्या साऱ्या क्षुधा,
आणखी चिन्ता -॰ लोपती क्षण न लागतां. १
रेशमी रङ्गवल्लिका भरी
चतुरा कुणी मख्मलीवरी
त्यापरी गाणें -॰ मज वाटे तव शोभने. २ (२६९)

२०८ **‘कालचक्र’**, [उ । प । ~ +] पर्वती दोन वा अधिक
[- । प । प । ~ +] लीलारति एक वा दोन

(१) “फिरतें **कालचक्र** भूवरी,
दसरा ये प्रतिसंवत्सरीं,
पूर्वजस्मरण आम्हांस देतसे परी
सोडवे न धामग्राम राहिलें दुरी.” (विक ८५)

‘दसरा’ (विक ८४) ही कविता १ लें कडवें वगळल्यास शेवटपर्यन्त याच कालचक्रजातींत आहे. ‘निन्दिलें आजवर वैरि गणियलें तुला’ ही सोपानदेव चौधरीकृत कविता (सपा १/३६) या कालचक्रजातींतच आहे. के. नारखेडे यांच्या ‘न्याहारी’ आणि ‘जीवनमूर्ति’ (नाच १५, २५) आणि विश्वनाथ वामन पत्की यांची ‘प्रतीक्षा’ या कविता समग्र या कालचक्रजातींत आहेत.

(२) “कोणीकडून? कोणीकडे?
इकडुनि तिकडे, म्हणती गडे;
येथूनि तेथे, मागुनि पुढे,
हे तर नित्यच कानीं पडे;
पण समाधान का कधी तयाने घडे! (केक १४३)

(३) “नवतिच्या बहरामधि बालिका
करूनी साज तऱ्हेचा निका
चालली लगबगा कोठे अभिसारिका?
कोणता राजहंस मानसीं,
हुरहुरे ज्यास बघाया अशी?
किति डौलदार चापल्य हे हिच्या नसीं!” (माजूस्व ९५)

‘माझा अभिसार’ (घा-मधुमा ५) ‘कञ्जनी’ (माजूस्व ७२) नि ‘अभिसारिका’ (माजूस्व ९५) या कवितांत पञ्चकल्याणी आणि कालचक्र या दोन जातीचें मिश्रण आहे.

२०९ **‘सुरमणि’** [उ । प । ~ +] दोन वा अधिक

[ - - । ~ + ऽ - - । +] एक

(१) “ऐसें बोलुनिया **सुरमणी**
झाला शिशुसा हो तत्क्षणीं
विठ्ठल पन्त कवीचा धणी
मन्द स्वनींऽ रडुं लागे.” (विदप ४०)

हे अन्त्य कडवें आहे. याच पद्यांतील इतर कडवीं निराळ्या म्हणजे सुभद्रावरजातीची6 आहेत.

(२) “ऊऽठ ऊऽठ माझ्या जिवा
वन्दुनि दिनरजनीच्या धवा
आयुर्मार्गी आक्रम नवा
कर गौरवा ऽ देवाच्या.’ १ (उस ५)

अन्त्यचरणांत पहिल्या आवर्तनाच्या आरम्भीं इतर चरणांतील अन्त्य गणासारखी म्हणजे (~ + ऽ) अशी अक्षररचना न करितां दोन्ही गुरु (- -) अशीहि करितात.

(३) “प्रात:काळीं वन्दूं तुला
देवा, विश्वेशा, मङ्गला
बापा शरणागतवत्सला
प्रेमाब्धीला आनन्दें.” (उस ४)

ही ‘सकाळची प्रार्थना’ सर्वथा या प्रकारची आहे.

२१० **“विविधरसा”** [- । प । प । ~ +] लीलारति एक
[उ । प । ~ +] पर्वती दोन वा अधिक

“तुम्हि लिहा सुकविता अशी विविधशा रसीं
हृदयें आकर्षुनि घे तशी
सहज जी रुचे रसिकमानसी.
जी बघता हृदयें मुदें डुलुनि जन वदे
कविस या प्रसन्न तू शारदे
म्हणूनिच रचितो सुन्दर पदें.”

द. बा. पद्माकर (प्रप ४०)

या पद्यांत [- । प । प । ~ +] हा अन्त्यचरण आधी घेऊन [उ । प । ~ +] या मात्रावलीचे दोन चरण मागाहून घालून कडवें सिद्ध करण्यांत आलें आहे. हा कालचक्रजातीचा व्यत्यय गमतीचा आहे.

२११ "**सुभद्रावर**" [- - । प । + ऽ ~] दोन वा अधिक
[- - । + ऽ ~ - - । +] एक

ही जाति मागील सुरमणिजातीसारखीच आहे. भेद इतकाच की सुरमणिजातींत कडव्याच्या पहिल्या तीन चरणान्तीं आणि चौथ्या चरणांतील पहिल्या आवर्तनाच्या आरम्भी6 (~ +) हा त्रिमात्रक गण येतो तर सुभद्रावर जातींतल्या त्या ठिकाणीं (+ ~) हा त्रिमात्रक गण येतो.

(१) "धर्मा वालि न कुणि तुजला
आता उरला रे!
नाहि तपा तुज कोणी नाथ,
हरवे सरस्वतीचा कान्त,
सत्या, होय तुझाही घात,
झाला अऽन्त सौजन्या." (देशाप ४०)

(२) "मजला वरिल सुभद्रा काय
कुणितरि सांगा हो! ध्रु॰
आहे लग्नाची मनिं आस
कैसा घ्यावा हो संन्यास?
दिसतिल दाही दिशा उदास,
होईल त्राऽस शरिराला." (ए-पस १/४५)

या एकनाथाच्या पदासारखेंच त्याचें 'माझा कृष्ण देखिल काय' (एकनाथ गाथा ६९५) हे पद आहे. दत्तकृत 'मेनका शकुन्तलेस काय म्हणते?' (दक ३२) ही कविता या सुभद्रावरजातींत आहे. परन्तु त्या कवितेंत मध्येच एखादा चरण [- - । प । + ~] असा न होतां [। प । - - + ~] असा होतो.

“या परि समजावित कवळून
। शकुन्तलेसी । जगताहून
गेली जननी वर घेऊन
गगनांतून वीज जशी.” (दक ३२)

(१८५) **‘नगरभूषण’** [उ । प । ~ +] दोन वा अधिक
[। प । +]

उदाहरण मागे पृ. ४६९-४७० यावर दिलेंच आहे.
खालील सहा जातींच्या कडव्यांत [- । प । ~ +] या भरतखण्डमात्रावलीचे अग्रेसत्वर असतें.

२१२ **‘घनराजी’** [- । प । ~ +] अनेक
[- । प । प । प । ~ +] एक

२१३ **“राज्ञी”** [ - । प । ~ +] अनेक
[- । प । - + ऽऽ - । प । ~ +] एक

२१४ **‘श्रीपति** [- । प । ~ +] अनेक
[। प । प । प । ~ +] एक

२१५ **‘सम्पन्न’** [- । प । ~ +] अनेक
[- । प । प । प । +] एक

२१६ **‘सुवासिनी’** [- । प । ~ +] अनेक
[- । प । प । - +] एक

२१७ **‘गङ्गा’** [- । प । ~ +] अनेक
[- । प । प । ~ +] एक

२१८ **‘माधुरी’** [। प । ~ +] अनेक
[। प । प । प । ~ +] एक

२१२ **‘घनराजी’** [- । प । ~ +] भरतखण्ड दोन वा अधिक
[- । प । प । प । ~ +] कमललोचना एक वा दोन

(१) "यापरी असे जीवनऽसखे गे, चञ्चल अमुचे क्षण! ध्रु॰
घनराईमधे कवडसा
तरु हलतां डुलतो कसा,
परि जाई कुणिकडे सांग सखे, रवि कलतां स्थानांतुन?
यापरी असे जीवनऽसखे, अम्हि हलतों डुलतो6 पण." १ (तासक २८)

(२) "तारका चमकली नभीं,
तेजाची पुतळी उभी,
रिपुतिमिर तयाला न भी,
उत्साह वाढता तिचा अहाहा परिसर उज्ज्वल करी." (बवि-त ७७)

(३) "ते हवेत माझे मला, सखे परि भवति सदा गल्बला. ध्रु॰
हे मधुप फुलांभोवती
डोलती जसे गुज्जती
लोभले तेवि सोबती, तयांचा ओघ न कधि आटला." (यभा ४८)

'भिड्गरी' (देनाघ-सुगी ९३), 'तुज म्हणूं कुणासारखी' (कावा ६०), 'वत्सलभीति' (कान ४२), 'विनयवती प्रियेस' (रमा-कभा ४८) आणि 'आला खुशींत समिन्दर' हे 'कोळ्याचें गाणें' (काचा ५५) या कविता या घनराजीजातींत आहेत. गिरीशकृत शूर्पणखा ही सुप्रसिद्ध कविता या चालीवर म्हणतां येत असली तरी ती या जातीची नाही. ती कविता कडव्याची घटना पाहतां भरतखण्डजातीची ठरते.

२१३ **"राज्ञी"** [ - । प । ~ +] भरतखण्ड दोन वा अधिक
[- । प । - + ऽऽ - । प । ~ +]

"भर उन्हामधीं चालुनी
आलीस कारभारणी
येईल कवा ही राणी -॰ होतोंच वाट पाहुनी." (ठो-स्फूमा ३७)

२१४ **'श्रीपति** [- । प । ~ +] भरतखण्ड दोन वा अधिक
[। प । प । प । ~ +] समुदितमदना एक

(१) “पतिव्रता द्रौपदी सती
ती सभेमाजि गुणवती
दु:शासन दुर्जने6 गाज्जितां आळविते **श्रीपती.**” (भिद्रौ-लकामा १/१११)

(२) “या रानचमेलीवरी
दडलेलीं पर्णान्तरीं
शोधुनी फुलें हासरीं
हार तयांचा कुणासाठि तू गुम्फिशी तीरावरी?” (जोव ३९)

‘सवाई माधवरावांचा मृत्यु’ (माक १६३), ‘पर्वती’ (अज्ञा ७९), ‘सिंहगडास पाहून’ (बासा-अकामा ४/१२०), ‘स्वप्नांत काय पाहिलें’ (पाआ २४) इत्यादि कविता या श्रीपतिजातींत आहेत.

२१५ **‘सम्पन्न’** [- । प । ~ +] भरतखण्ड दोन वा अधिक
[- । प । प । प । +] अरुणप्रभा एक

“अमुलत्या फुला, सांगतों तुला धरुं नको वृथा अभिमान. ध्रु॰
**सम्पन्न** बगीचा खुला
हा तुजभवती पसरला,
कमतरता नाही जला,
सौन्दर्य खुलावें तुझें म्हणोनी प्रयत्न सगळे जाण.” कास्फू ८९)

२१६ **‘सुवासिनी’** [- । प । ~ +] भरतखण्ड दोन वा अधिक
[- । प । प । - +] भूपति एक

(१) “घेई हरिनाम -॰ मनवाजिस घाल लगाम. ध्रु॰
त्यज पुत्रमित्रराग तो,
तुज गुज मी हें सांगतों,
श्रीकान्तभजनिं लागतो अल्पहि न दाम.” (खाक ७०)

(२) “या मूर्तदेवता पहा भरतभूवरती. ध्रु॰

पति जिवन्त असतां स्त्रिया
वरि **सुवासिनी** पद जयां
वैधव्यें पुशितां तयां चढविलें वरती." (पापना-माअक २७)

काव्यविहारींची 'कृष्णेच्या पुलावरून' (कास्फू ५७) ही कविता या सुवासिनीजातींत आहे.

२१७ **'गङ्गा'** [- । प । ~ +] भरतखण्ड दोन वा अधिक
[- । प । प । ~ +] लीलारति एक वा दोन

(१) "तू मर्द कोठला गडी?
हे तुझेच का सवगडी?
चल टाक हिच्यामधि हिमतीने तू उडी
जरि अथाङ्ग भरली **गङ्गा** ही दोथडी."
(टे-आमा सप्टे १९२३)

परन्तु या कवितेंत आणि 'हा कोण' (टे-विवी ४४) या कवितेंत मेधा जातीच्या कडव्यांचे6 मिश्रण आहे.

२ "राबलों वृथा संसारसौख्यविभ्रमीं
ने प्रभो आपुल्या धामीं -॰ जाहलों सर्वथा श्रमी.
चाललों जरी सत्पथें
तरी तुफान उलटें सुटे,
सैराट तारुं भडकतें, विफळ रुस्तमी." (यध १५६)

'विनवणी' (अज्ञा ६३) आणि शेखरकृत 'सृष्टिप्रेम' (कभा ५५) या कविता या जातीच्या आहेत. ध्रुवपद मुद्रिकाजातीचें असलें तरी कडव्यांची घटना भिन्न असल्याने या पद्यांची जाति मुद्रिका होऊ शकत नाही.

२१८ **'माधुरी'** [। प । ~ +] दोन वा अधिक
[। प । प । प । ~ +] समुदितमदना एक

१ "गोड जाईच्या फुला, सदा मी जीव तुला वाहिला. ध्रु॰

जरी उकिरड्यावरी
घाण पडे चौथरी
तया सन्निधीं परी
वेल जाईचा चढे तयावरि जन्म तुझा जाहला.१
उपवनांत किति तरी
जाई-फुलें गोजिरीं
सदैव बघतों तरी
तुझ्या गुणांची गोड **माधुरी** लळा लाविते मला." २ (कास्फू १५)

खालील तीन जातींच्या कडव्यांत [उ । प । +] या भुवनसुन्दर मात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२१९ **'कल्पद्रुम'** [उ । प । +] अनेक
[। प । प । प । +, उ । प । +] एक

२२० **'चेतना'** [उ । प । +] अनेक
[- । प । प । प । +] एक

२२१ **'विकल्प'** [उ । प । +] अनेक
[। प । प । प । +] एक

२२२ **'भृडगराजी'** [। प । प । प । +] एक
[उ । प । +] अनेक

२१९ **'कल्पद्रुम'** [उ । प । +] भुवनसुन्दर दोन वा अधिक
[। प । प । प । +, उ । प । +] एक संयुक्त

"वन्दुनि पुष्पकिं शङ्कर हा,
जन हो भविं नि:शङ्क रहा. ध्रु॰
कारण पुष्पचि सृष्टीला
बघतां दिसतें दृष्टीला
पुष्पाविण फल वृक्षाला
नाही भासे हे सकलां.

नि:सार्थकता पूजेला
पुष्पाविण की प्रिय त्याला
म्हणुनि बसवुनी प्रथम पुष्पकीं करिति महोत्सव हा,
भक्ता **कल्पद्रुमसम** हा." (किग्र ७७)

'शशिकुलभूषण गुणवन्ता' (किग्र ३६५), 'माझी ताई' (टिक १२०), 'दिधले जनन तुला असलें' (रेक १/३५७), 'उषाही दंवबाष्पा टाळी' (नाव १२) इत्यादि कविता या कल्पद्रुमजातींत आहेत.

२२० **'चेतना'** [उ । प । +] भुवनसुन्दर दोन वा अधिक
[- । प । प । प । +] अरुणप्रभा एक

"माझिया शूर सैनिकांनो,
धुरन्धर मर्द मराठ्यांनो,
शत्रुच्या कर्दनकाळांनो,
साण्डुनी प्रसड्गीं प्राणहि भगवा झेण्डा राखावा!
निशाणा बघुनि अघाडीला
स्फुरण ये अवघ्या सेनेला
शत्रुशी झुन्ज करायाला
**चेतना** मूर्त ही सड्गामाची वाऱ्यावरि झुलवा." (कास्फू १०१)

२२१ **'विकल्प'** [उ । प । +] भुवनसुन्दर दोन वा अधिक
[। प । प । प । +] चन्द्रकान्त एक वा दोन

(१) "मम सुत भरत जरी असला
प्रिय नच रामाहुनि मजला;
मिळतें राज्य जरी त्याला
अत्यानन्दचि मज झाला.
खचित मन्थरे, वृद्धपणीं भ्रम ये तव बुद्धीला
म्हणुनि असा हा विकल्प वाटे देहिं तुझ्या शिरला." (किग्र ५७५)

(२) "हे घन चूर्ण पहा होती,
बारिक रेणूपरि दिसती,

रथाच्या मागे ते उडती,

उरांत दुसरी पडिक्त उरांची दिसत चक्रवेगें." (दिविक्र)

'रुतला दर्भाङ्कुर चरणीं' (किग्र ३४७) हे पद्य आणि परशुराम नारायण पाटणकर यांची 'विश्वनाटक' (सुहा १५२) ही कविता ही या विकल्पजातींत आहेत.

२२२ **'भृडगराजी'** [। प । प । प । +] चन्द्रकान्त एक
[उ । प । +] भुवनसुन्दर दोन वा अधिक

विकल्पजातीच्या व्यत्ययाने ही जाति सिद्ध होते.

"प्रभातकालीं मोटवणावर कोण गीत गाई,
साथही कोण त्यास देई,
चला ती बघुं या नवलाई! १
अनुपम शोभा दावितसे ही आम्रवृक्षराजी
फुलांची नवाळ ती ताजी,
लुटुनि ती उडति **भृड्गराजी.**" २ (कास्फू ७६)

खालील तीन जातींच्या कडव्यांत या [। प । +] पिशड्गमात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२२३ **'चिरसुन्दरी'** [। प । +] अनेक
[। प । प । प । ~ +] एक

२२४ **'कालावेग'** [। प । +] अनेक
[। प । प । प । +] एक

२२५ **'कण्हेरी'** [। प । +] अनेक
[। प । - - +] एक वा दोन

२२३ **'चिरसुन्दरी'** [। प । +] पिशड्ग दोन वा अधिक
[। प । प । प । ~ +] समुदितमदना एक वा दोन

“सृष्टीचें छकुलें
सुमन जरी सुकले6
दरवळलेला परिमळ झुलवित ते हृदया वरिवरी.
दुर्दैव अपुला
वियोग जरि घडला,
तुजविषयींचे तरङ्ग हृदयीं वसतिल **चिरसुन्दरी.**” (कावि २३)

‘सात्वन’ (कावि २३) या कवितेच्या पहिल्या कडव्यांत तेवढा थोडा भेद आहे.

२२४ **‘कालावेग’** [। प । +] पिशङ्ग दोन वा अधिक
[। प । प । प । +] चन्द्रकान्त एक

“प्रीतीची फुलली
हृदयाशी धरिली
कलिका, परि ती **कालवेगें** जाईल का सुकुनी?” (अफु ७)

’भवितव्य (अफु ७) या कवितेच्या पहिल्या कडव्यांत मात्र थोडा भेद आहे.

२२५ **‘कण्हेरी’** [। प । +] पिशङ्ग दोन वा अधिक
[। प । - - +] अचलगति एक वा दोन

“कळ्या कण्हेरीच्या
अन्तीं निधनाच्या
उपयोगीं तुज पडतील,
शोभा तुज त्या देतील.” (आगरा-रमा ३/४)

खालील दोन जातींच्या कडव्यांत पद्ममात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२२६ **‘गानतुषार’** [। प] अनेक
[। प । प । प । +] एक

२२७ “**नभोरङ्ग**” [। प] अनेक

[। प । - - +] एक वा दोन

२२८ “**मुक्तामाला**” [। - - +] अनेक

[। प । - - +] एक वा दोन

२२६ ‘**गानतुषार**’ [। प] दोन वा अधिक

[। प । प । प । +] चन्द्रकान्त एक

अरुण तेज तव
लाजनसे नव
कपोल वैभव
प्रखर होऊनी जगता दिपविल रविरूपाने तें!
फेक भोवती
तेजोमय ती
काव्यस्फूर्ती
कविच्या हृदया उसळवि, उधळीं **गान तुषारांते**” (देवि-विवी १४०)

२२७ “**नभोरङ्ग**” [। प] दोन वा अधिक

[। प । - - +] अचलगति एक वा दोन

“चला गड्यांनो खेळूं या
आनन्दाने नाचूं या. ध्रु॰
आभाळाचे
तऱ्हे तऱ्हेचे
रङ्ग मजेचे
चला चला रे पाहूं या
आन न्दाने नाचूं या.” (नावा ९)

२२८ “**मुक्तामाला**” [। - - +] दोन वा अधिक

[। प । - - +] अचलगति तीन

(१) “तुझ्या गळां
माझ्या गळां,
गुम्फूं मोत्याच्या माळा”
”ताई, आणखि कोणाला?”
”चल रे, दादा चहाटला!”
”कशी कशी
आज अशी
गम्मत ताईची खाशी!”
”आता गडि फू दादाशी?” २ (तासक ८३)

पण या पद्याची रचना बरीच शिथिल आहे.
खालील तीन जातींच्या कडव्यांत [। - ~ - + । - ~ - +] या मात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२२९ **‘घोररजनी’** [। - ~ - + । - ~ - +]
[- । प । प । प । - +] एक

२३० **‘मनमोहन’** [। - ~ - + । - ~ - +] अनेक
[- । प । प । प । +] एक

२३१ **‘सन्देश’** [। - ~ - + । - ~ - +] अनेक
[- । प । - +, ऽऽ - । - + ऽ - ~ । +] एक

२२९ **‘घोररजनी’** [। - ~ - + । - ~ - +] दोन वा अधिक
[- । प । प । प । - +] भवानी एक

“सारडिग सारखी तव वाजवुनी टाकी मन गुङ्गवुनी. ध्रु॰
**घोर रजनी** विकट हासे,
वस्तुठायीं भूत भासे,
परि सूर ऐकतां दूर जातसे काहुर मनिंचें पळुनीं.” (यध १३३)

‘साल्गिरा’ (कुयशो १८), मञ्जुमाधवकृत ‘गा गडे गोड गोड गीतांना’ (पद ४५) आणि सोपानदेव चौधरी यांची ‘वाजवूं नको माधवा.’ (गोगु ७५) ही कविता या घोररजनीजातींत आहेत.

२३० **‘मनमोहन’** [। - ~ - + । - ~ - +] दोन वा अधिक
[- । प । प । प । +] अरुणप्रभा एक

“**मनमोहन** वाजवुनी सारड्गी काढी मञ्जुळ सूर. ध्रु॰
विश्व निजलें, शान्त झालें,
एक धरणी मात्र डोले,
गम्भीरपणाने अन्धारांतुनि छेडित जाई सूर” १ (गिका ३)

‘चान्दण्यांतील हुरहूर’ (माजूस्व ७०), ‘खचतो माझा धीर’ (माभा ५०), ‘ध्यास व भास’ (माभा ५६), ‘एका बाळकास’ (गोदू ४), ‘चिमुकल्यास’ (काचा ३६), कृष्णाकुमारकृत ‘हुतात्मा’ (फ २२) इत्यादि अनेक कविता या मनमोहन जातींत आहेत.

२३१ **‘सन्देश’** [। - ~ - + । - ~ - +] दोन वा अधिक
[- । प । - +, ऽऽ - । - + ऽ - ~ । +] एक

“हें स्वागत तुमचें सारें -॰ मज आता लाभतें. ध्रु॰
हाय तो **सन्देश** माझा
नित्य हृदयीं वागवा जा!
जाऊं द्या बन्दिशाला ती -॰ विरहाने कष्टते.” (अ-मे ११)

२३२ **‘रूपवती’** [मोहिनी] अनेक
[शारदा] एक

“जरी कुणा श्रीमन्ताची सून होय शारदा
तरी त्यास साजे ऐशी तिची रूपसम्पदा. ध्रु॰
बघुनि तीस आकाशींची चान्दणी दिपावी,
नाहि रूपवन्ती दुसरी हजारांत ठावी,
हसत थोर सर्दारांनी मागणी करावी,
परी मला मनचे माण्डे चुरुनि काय फायदा?” १ (देशा ३१)

खालील चार जातींच्या कडव्यांत धात्रीमात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२३३ **'सदयशान्त'** [‿̄ ~ । ‿̄~ । - - - +] दोन वा अधिक
[‿̄~ । ~ ~ - - - + ~ ~ । ~ ~ । ~ ~ - - +]

(१) "**सदयशान्त** असशी मरणा, भीति तुझी वाटे ना. ध्रु०
हीन दीन दुक्खी दुबळी
ज्यांस ओस दुनिया सगळी,
येति त्यांस घेशी जवळी प्रेम तुझें आटेना." (देशा ८७)

(२) "रुदन हेंचि आयुध अमुचें सर्वदा विजयी असे,
पाहतें तयाच्या पुढती मातृहृदय टिकतें कसें. ध्रु०
कोण ऐसि जाडी चिन्ता
स्पर्श मम न जी करि शान्ता
शल्य ते तिच्या हृत्पान्ता कोणते सलतें असे." (कोगु)

२३४ '**कृष्णनाथ**' [‿ ~ । ‿ ~ । - - - +] दोन वा अधिक
[‿ ~ । ‿ ~ । - - - + । ‿ ‿ । ‿ ~ । + ~ +]

"गोकुळिंचा कान्हा कोणी पाहिला कि काय ग?
गोकुळिंचा राणा माझा देखिल कि काय ग? ध्रु०
प्रभू सावळा हा कृष्ण,
रङ्‌ग तुझा झाला कृष्ण,
**कृष्णनाथ** लपवुनि पोटीं ठेविला कि काय ग?" (सोका २१)

२३५ **'प्रेमरज्जिता'** [‿ ~ । ‿ ~ । - - - +] दोन वा अधिक
[‿ ~ । ‿ ~ । - - - + । ‿ ~ । ‿ ~ । + +]

(१) "काय पुरुष चळले बाई,
ताल मुळी उरला नाही,
धर्मनीतिशास्त्रें पायीं तुडविती कसे हो?" (देशा २)

(२) "किती वेळ सांगू तुजला सोड हा अबोला?
**प्रेमरज्जितांच्या** साठी कायदा कशाला? ध्रु०

अपाड्गास आली लाली
राग रड्गलेला गालीं,
परी रागवोनी होई फायदा कुणाला?" (जोअह-फत्रै २४/४)

रा. यशवन्त खण्डेराव कुळकर्णी यांची 'कोण ना भिकारी?' (माल १८) ही कविता या प्रेमरज्जिताजातींत आहे.

२३६ '**आत्मवञ्चना**' [‗̃ ̃ ¯। ‗̃ ̃ ¯। - - - +] दोन वा अधिक
[‗̃ ̃¯। ‗̃ ̃¯। - - - + । ‗̃ ̃ ¯। ‗̃ ̃ ।¯+]

(१) "आकळे न अघटित घटना तव दयाघना,
कां रुचे अधोगति ऐशी या विभूतिंना? ध्रु॰
सिद्ध पुरुष सद्गुरु असुनी
मग्न होति मायाव्यसनीं
केवि करिति तप नाशोनी **आत्मवञ्चना**" ? (गोटे-मामबो)

(२) "हे दिनेश, उघडी नयना तमनिवारणा,
तुजविना न अन्यचि कोणी क्षम जनावना. ध्रु॰
कृष्ण घनचि अम्बरिं जमले,
लोकपतिस ग्रासूं सजले,
उघड तरी द्वादशनयना लोकतारणा." १ (किरा-नजीमा २/९-१०)

अग्न्यावर्तनी

२३७ '**जलवाह**' [। - ̃ - - । - ̃ - -] दोन चरण
[। - ̃ - - । - ̃ - - । - ̃ - - । - ̃ -] एक

"हासतें जग हे विनोदें परि कुठे तू हे प्रभो?
नाचतें जग हे प्रमोदें परि कुठे तू हे प्रभो? ध्रु॰
तारकांसह चन्द्र चमके
फुल्लकुमुदी वायु ठमके,
वाहती **जलवाह** गमकें, परि कुठे तू हे प्रभो?" १ (सुजी)

२३८ **‘अमररमणी’** [। - ˜ - - । - ˜ -] दोन
[। - ˜ - - । - ˜ - - । - ˜ - - । - ˜ -] एक

(१) “गमत सुखकर समय हा
तेजराशी कुमुदबान्धव येत सदनाङ्गणिं पहा. ध्रु॰
विबुधललना क्रीडती
रत्नकन्दुक फेकिती,
**अमररमणी**पादतलहत म्हणुनि विहरे गगनिं हा.” (कावि ३)

(२) “यामिनी जणु कामिनी
यौवनीं मृदुहासिनी
मञ्जुमञ्जु सलील पाऊलिं पातलीं जनमोहिनी.” (काराअ-माल ६७)

२३९ **‘विजितमदन’** [। भृ । भृ । भृ । - +] परिलीना तीन
[। भृ । भृ । भृ । भृ] दासी एक

“श्रीराम माझा हो राजधिराज ध्रु॰
वीरासन पीतवसन सजलजलदकान्ती
वामजानुनिहितवामहस्त मूर्त शान्ती,
ज्ञानमुद्रिका विराजमान दक्षिण हस्तीं,
इन्दुवदन, सुगुनसदन, **विजितमदन**, विलसतसे”. (विदप १२)

२४० **‘कामना’** [- । भृ । भृ । भृ । +] रुचिरवदना दोन वा अधिक
[। भृ । भृ । भृ । +] धवलचन्द्रिका एक

“कां दिवसां तू करिशि विधो म्लान आनना?
खुलवी तुज रात्रीचा समय, आन ना. ध्रु॰
स्थिति माझीही तुजसमान होय या दिनीं,
मज बहु उदास भयद खास गमत मेदिनी,

ग्रहतारायुत लोपे मम सुखद यामिनी,
लाभो तो, त्वरित घडो पूर्ण **कामना**.'' (सुमौ ५८)

'त्रस्त मानसास' (सुमौ २२) ही कविताहि या कामनाजातींतच आहे. 'वैशाखमासिं॰' (किग्र ४५२) या पद्याची हीच जाति आहे पण रचना थोडी शिथिल आहे.

''या जाइजुई मोगरिला बहर तो अला,
गुज्जारव करण्यांत गुड्ग मधुप जाहला,
नव पल्लव ते फुटति सकळ वृक्षगणांला,
कुसुमगन्धयुक्त मन्द वात सूटला.'' (किग्र ४५२)

२४१ **'हृदयहारी'** [। भृ । भृ । भृ । +] धवलचन्द्रिका अनेक
[। भृ । भृ । भृ । - +] परिलीना एक

''लपत छपत येऊनिया मारिशि पिचकारी,
भिजविशि का तनुलतिका कुटिला, मम सारी? ध्रु॰
केसांतुनि रड्गाचे थेम्ब निथळतां
पदर चिम्ब भिजुनि उरीं तेवि बिलगतां,
चिडलेली नजर तुझी मजशि विन्धतां
या परतें सांग कुठे चित्र **हृदयहारी**.'' १ (यग ५९)

खालील सात जातींच्या कडव्यांत [। भृ । भृ ] या जीवन लहरी मात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२४२ **'रमावर** [। भृ । भृ ] अनेक
[। भृ । भृ । भृ । भृ । भृ । +] एक

२४३ '**उन्मनी**' [। भ । भ ] अनेक
[। भृ । भृ । भृ । + ऽऽ - । भृ । +] संयुक्त एक

२४४ **'हृदयवरद'** [। भृ । भृ ] अनेक
[। भृ । भृ । भृ । भृ । +] एक

२४५ **‘मधुमधुरा’** [। भृ । भृ ] अनेक
[। भृ । भृ । भृ । भृ] एक

२४६ **‘अरुण’** [। भृ । भृ ] अनेक
[। भृ । भृ । भृ । - ~ +] एक

२४७ **‘शुभवदना’** [। भृ । भृ ] अनेक
[। भृ । भृ । भृ । - +] एक

२४८ ‘**पुण्डरीक’** [। भृ । भृ ] अनेक
[। भृ । भृ । भृ । +] एक

२४२ **‘रमावर** [। भृ । भृ ] जीवनलहरी अनेक
[। भृ । भृ । भृ । भृ । भृ । +] एक

करि अति त्वरा
घडिघडिघडि पलपल जप अमृतधाम रामनाम धरुनि आदरा. ध्रु॰
जो इन्द्रियसङ्घ दक्ष
तो निजकल्याणदक्ष
त्यज वटवट खटपट उगि, झटपट करि कपटरहित
भज **रमावरा**.” (विदप ३७)

२४३ ‘**उन्मनी**’ [। भ । भ ] जीवनलहरी अनेक
[। भृ । भृ । भृ । + ऽऽ - । भृ । +] संयुक्त एक

(१) “बान्धावरि झुडुप एक,
पुष्प तयावरि सुरेख
पाहुनि मी निज हृदयीं मुदित जाहलों
त्याजवळि चाललों.
जाऊनिया त्या सुमनीं

काय असे, हे स्वमनीं
मनन करित **उन्मन** मी तेथ ठाकलों,
या पडिक्त बोललों." २ (केक ११०)

'सत्य, दिव्य आणि शान्त' (विक ४) आणि अर्धस्फुट पुष्पाप्रत' (नाव १८) या कविता या उन्मनीजातींत आहेत.

२४४ **'हृदयवरद'** [। भृ । भृ ] जीवनलहरी अनेक
[। भृ । भृ । भृ । भृ । +] एक

(१) "धणी-॰ सकल तरणि-कुलज नृपति मुकुतमणीरे. ध्रु॰
परम सदय **हृदयवरद**
दुरितजलधिपतितकरद
शतमुखमखविजयवरद खचर निकट पवनफणी रे. १
असुर दनुज नमन मात्र
करुनि आलियासि जो न पूर्वकर्म किमपि गणीरे." २
(मोस्फुका १/३७०)

(२) "अर्थहीन गाशी तू काहिही मुली!
होशीही तल्लिन किति सहज आपुली!
लाख जिभा चालवून
जे न उकलि पण्डितगण
ते येथे ये समजुन ज्यास बालबोलि उमगली." (अज्ञा १२४)

२४५ **'मधुमधुरा'** [। भृ । भृ ] जीवनलहरी अनेक
[। भृ । भृ । भृ । भृ] एक

(१) "डोळे तुमचे जादुगिरी, आमच्याकडे पाहुं नका! ध्रु॰
तुम्हि जातां मुल्खावरि
माझि चिन्ता कोण करी?

ऐकिल मी राहुं कशी? फार दिवस लावुं नका!"
(एक प्राचीन पद्य, संहिता प्रतिभापाक्षिकावरून.)

(२) लग्न नव्हे मरण उद्या ठरलें ते टळत नाहि. ध्रु॰
मातेची धरिलि कास,
परि तुटली तीहि आस;
नवस बोलिले जिवास, अजुनि कसा वळत नाहि?" (देशा ६९)

(३) "**मधुमधुरा** मुरलिधरा, आज असें काय गडे?
लावुनि टक बघतां मुख? दृष्टिस नव काय पडे? ध्रु॰
नजर तरी जादुगिरी!
आवर, बेभान करी,
राहुं उभी कोठवरी?
शिरिं घागर, मनिं खळबळ, न कळत पथिं चाल उडे." १
(गोपाश्रा-विवी ९१)

'कञ्जनयन गोपाल' (विदप ३४), 'कमलनयन गोपाल' (विदप ३५) 'नन्दसुता ओळखितां॰' (गोबो १३) आणि 'कालचा गुलाब कुठें' (कावा-३२) या कविता या मधुमधुराजातींत आहेत.

२४६ **'अरुण'** [। भृ । भृ ] जीवनलहरी अनेक
[। भृ । भृ । भृ । - ~ +] मदनरङ्ग एक

(१) "प्रिये पहा रात्रीचा समय सरुनि येत उष:काल हा. ध्रु॰
थण्डगार वात सुटत,
दीपतेज मन्द होत,
दिग्वदनें स्वच्छ करित अरुण पसरि निज महा." १ (किग्र ५११)

(२) "एकदाच पाहिलें,
पाहिलें तयाक्षणींच आपुली न राहिलें. ध्रु॰

ठाऊके न नाव-गाव,
कळवुं केवि हृदयभाव?
हे असें अधान्तरीं जिणें न जाय साहिलें." १ (उपो ७)

(३) "सहज तुझी हालचाल मन्त्रे जणु मोहिते. ध्रु०
सहज चालणेंहि तुझें
सहज बोलणेंहि तुझें
सहज पाहणेंहि तुझें मोहनि मज घालितें. १" (तासक १६८)

'जोहार' (विक ८१) 'मधुयामिनी' (बाक २५), 'जगाचें गाणें' (गोवा ६०), 'पुनर्विकसन' (गोवा ७७), 'प्रीतीचा वास' (तासक ५८), 'साम्राज्यवादी' (तासक १८१) इत्यादि कविता या अरुणजातींत आहेत.

(४) "नेत्र उघडुनी
बघशि कुणा काय जनीं नेत्र उघडुनी? ध्रु०
चोहिकडे रम्यपणा
बघुनि तोषवीशि मना;
पद्मिं मधुप, विश्विं उडुप रुचिर सृष्टि मानिनी." (टेआ १/१९४)

हे पद्यहि या अरुणजातीचेंच आहे. परन्तु 'भक्तजन सदा०' या पद्याच्या चालीवर लिहिलेल्या अशा पद्यांच्या कडव्याच्या अन्त्य चरणांत आरभ्भीं जे दोन भृङ्ग गण समयक येतात ते पुष्कळदा अधिक मात्रांचे आढळतात; (~ - ~ ~ ~ ) या गणाच्या ठिकाणी ( - - ~ ~ ~) अशी रचना आढळते आणि मग आद्यगुरु प्रयत्नें लघु उच्चारावा लागतो!

२४७ **'शुभवदना'** [। भृ । भृ ] जीवनलहरी अनेक
[। भृ । भृ । भृ । - +] परिलीना एक

(१) "श्रीगुरुचें चरणकमल हृदयीं ऽ स्मरावें. ध्रु०
रामदास सांगे तुज
अजुनि तरी समज उमज,
विषयवीष घेऊनिया फुकट कां मरावे?" (अकक ३/१५१)

(२) “नन्दतनयछन्द मला बाइ लागला गे! ध्रु०
चहूंकडे कृष्ण दिसे,
बाइ, इतर भान नसे,
रात्रन्दिन हेंचि पिसें लागलें मला गे. १
मन्दहसितलसित वदन,
कुन्दमुकुलललित रदन,
केवळ जणु बाइ मदन, हृदयिं रङ्गला गे!” २ (खाक ७३)

(३) रुणुझुणु ये, रुणुझुणु ये झणकारित वाळा!
लुटुलुटुलुटु दुडुदुडुदुडु ठुमकत ये बाळा! ध्रु०
धुन्दि अजुनि रजनिनयनिं
सावरूनि पदर धरुनि
**शुभवदना** उडुरदना देई जाम्भयाला.” १ (तासक १६१)

‘प्रबोधन’ (रेक १/७६), ‘अजुनि लागलेंचि दार’ (तासक ६७), ‘मूकसङ्गीत’ (गिका ९४), ‘अजुन’ (यध ६४), आणि राजकवि चन्द्रशेखरकृत ‘मधुर मधुर हेच झरे’ (पामा १/६) इत्यादि अनेक कविता या शुभवदनाजातींत आहेत.

२४८ ‘**पुण्डरीक’** [। भृ । भृ ] जीवनलहरी अनेक
[। भृ । भृ । भृ । +] धवलचन्द्रिका एक

(१) **“पुण्डरीक** म्यां वरिला,
याहुनि जरि अन्याला
स्वप्नीहीं वाहियला नाहि देह हा.” (देशाप ६/३)

(२) “प्रिये अवन्तिके, नयनहृदयरञ्जिके! ध्रु०
तू जीवन, तू भूषण,
परमार्थाचें साधन,
आहे मज तुजवाचून सर्व जग फिकें !” (विक ९३)

(३) “मना काहि तरी शान्ति धरीं चिन्तिं हरी रे! ध्रु॰
अपुले हे त्यजुनि ढङ्ग
सतत धरीं सन्तसङ्ग
निशिदिनी भज पाण्डुरङ्ग,
भवजल तरण्यास असे हीच तरी रे.” १ (खाक ७६)

‘पाण्डुनृपति॰’ (किग्र ५३) हे पद्य शिथिल आहे. ‘लग्नाला जातों मी॰’ (किग्र ४५७), ‘लक्ष्मीसम चञ्चल॰’ (देमृ ४३), ‘नोहे हा जवन पवन’ (देमृ ५५), ‘चिमकुला संसार’ (कावि ४८), ‘हास बालिके!’ (माजूस्व ५३) आणि ‘सीमा (कावा ८) इत्यादि कविता या पुण्डरीकजातींत आहेत.

खालील तीन जातींच्या कडव्यांत [। भृ । - ~ +] या मात्रावलीचें अग्रेसरत्व आहे.

२४९ **‘स्वर्गदेवता’** [। भृ । - ~ +] अनेक
[। भृ । भृ । भृ । - ~ +] एक

२५० ‘**कुसुमबाण**’ [भृ । - ~ +] अनेक
[भृ । भृ । भृ । +] एक

२५१ **‘मञ्जुला’** [। भृ । - ~ +] अनेक
[। भृ । +] एक

२४९ **‘स्वर्गदेवता’** [। भृ । - ~ +] दोन वा अधिक
[। भृ । भृ । भृ । - ~ +] मदनरङ्ग एक

(१) “कोण तू कुठोनि येशि, कां हळूच मन्दिरीं?
मोहवी मनास रम्य हास्यतेज सुन्दरी. ध्रु॰
तू सती जगांतली
अप्सरा नभांतली
**स्वर्गदेवता** सजून येशि वा धरेवरी.” १ (गिका १३०)

(२) “अन्धकार मातला
वेष्टितसे भूतला
शून्य मना खिन्नपणें सुखदायक जाहला.” (बाक ६५)

बालकवीच्या या कवितेच्या ९ कडव्यांपैकी शेवटलीं ३ निराळ्या म्हणजे अरुणजातीचीं आहेत. ‘उघड उघद दार रे!’ (अज्ञा ८३) ही कविताहि स्वर्गदेवताजातीची आहे.

२५० ‘**कुसुमबाण**’ [भृ । - ~ +] दोन वा अधिक
[भृ । भृ । भृ । +] धवलचन्द्रिका एक

(१) “हृदय सांग चोरिलें कशास सुन्दरी?
देऽ! देन देशिं तरी दे तुझें तरी! ध्रु॰
(व) सन्त कोतवाल हा
’सज्ज गे उभा पहा!
**कुसुमबाण** सोडवीन मी तुझ्या उरीं.” (तासक ४१)

(२) “हिन्दबन्धुनो, चला करीत हिन्दवन्दना
गौरवूं तिला कृती करून वीरनन्दना. ध्रु॰
भक्तिनेच आळवूं
अन्तरांस मेळवूं
वैभवीं विराजवूं करून दूर बन्धना.” (गिफ ३५)

२५१ **‘मञ्जुला’** [। भृ । - ~ +] दोन वा अधिक
[। भृ । +] एक

(१) उगिच काय बुल्बुला ऽ, शिणविशी गळा! ध्रु॰
उगिच कण्ठ फोडिशी,
हृदय मात्र फाडिशी,
रमणिवाणि आणिशी,
स्मरणिं **मञ्जुळा**.” (तासक ४०)

(२) “रति खरी न रति तव ती विकृति कामिनी! ध्रु॰
येऊनी क्षणोक्षणीं
जपशि बघुनि लोचनीं,
द्विरदगामिनी.” (सुमौ ५०)

२५२ **‘जीवितेश्वरी’** [। - ~ - ~ । +] दोन वा अधिक
[। भृ । भृ । भृ । +] धवलचन्द्रिका एक

(१) “धाव धाव गा
धाव राघवा
तूजवीण वाटतसे शीण आघवा. १
विषय घोर हे
चोरसे मला
करुनि विकल निखळपणें म्हणति ‘नागवा’”. २ (विदप ११)

(२) “जीवितेश्वरा,
बोलणें जरा
काय आगळीक होई, जोडितें करा.” (राम-कि १०)

’प्रतिक्षा’ (यध १४१) ही कविता या जीवितेश्वरीजातींत आहे.

२५३ **‘दीपारती’** [। - - ~ । - - ~ । - - ~ । +] दोन वा अधिक
[। - - ~ । - - ~ । - - ~ । - - ~ । - - ~ । - - ~ । - - ~ । +]

”**दीपारती** घेऊनी दो करी
देवा, उभी देवता सुन्दरी
या हिन्दभूची असे एक आशा, अता सार्थ होवो तुझी वैखरी.”
(इ-मनोमा नोवे-१९३४)

२५४ **‘दिव्याङ्गना’’** [। - - ~ । - - ~] दोन वा अधिक
[। - - ~ । - - ~ । - - ~ । - +]

“तरुणा जिवा, अन्त
हे सत्य अत्यन्त;
कसली वृथा खन्त? करिं मौज घडिची.” १

"स्वप्नांत सुस्नात
**दिव्याङ्गना** कान्त
पाहूनिया भ्रान्त हा जीव झाला. २
कटु मद्य हे गोड,
लागे जिवा ओढ
मिळवील ते जोड दिव्याङ्गेनची." ३ (तासक २०१)

२ **'सुवन्दित'** [। - - ~ । - -] दोन वा अधिक
[। - - ~ । - - ~ । +] एक

"प्रभुचें **सुवन्दित** नाम असो. ध्रु॰
मी नग्न आलों
जाईन नग्न
हा बोध मजला ठसो.
प्रभुनेच दिधलें,
प्रभुनेच नेलें,
तरि दोष प्रभुला नसो" (उस २६८)

२५६ **'वीरभद्र'** [- ~ - । - ~ - । - ~ - । - ~ +] वरमङ्गला अनेक
[- ~ - । - ~ - । - ~ - । +] देव एक

(१) "डुमडुमत डमरू ये, खणखणत शूल ये,
शङ्ख फुङ्कीत ये येई रुद्रा!
प्रलयघनभैरवा, करित कर्कशरवा
क्रूर विक्राळ घे क्रुद्ध मुद्रा! ध्रु॰
पूर्विं नरसिंह तू प्रगटुनी फाडिले
दृष्ट जयिं अन्य गृहिं दरवडे पाडिले
बनुनि नृप तापुनी चण्ड, जन ताडिले-
दे जयांचे तया **वीरभद्रा**!" ! १ (तासक १२७)

(२) "वाऽरे सर्वथा मुक्त झालों. ध्रु॰

रुक्मिणीने मला मन्त्र जो कथियला,
जुळुनिया होईलचि सफल तो चाङ्गला;
काय फसवील ती या नराला?" (किग्र ५२१)

**वर्ग ४ था**

विषम जाति

**प्रकार दुसरा**

विषमजातीच्या पहिल्या प्रकारच्या व्याख्येंत ज्या विषमजाती बसत नाहीत त्यांचा समावेश या वर्गात केला आहे.

२५७ **'यक्षपुरी'** [प । ~ +, उ । प । ~ +] सूर्यकला दोन
[उ। प । ~ +] पर्वती तीन
[। प । प । प । ~ + ॥ उ । प । ~ +] एक संयुक्त

"नील नभोमण्डलीं -॰ अस्फुट **यक्षपुरी** देखिली
धरुनी सुफलावली, डोलती बघ पुढती नारळी
स्वदेहे बाळावर सावल्या
कराया वात्सल्यें वाकल्या,
एक या सळसळती झावळ्या,
अविरत त्यांची मर्मर ही का हुरहुर हृदयांतली
जरी मी कण्हतो ही आपुली." (कास ६१)

२५८ **'झपूर्झा'** [। प । - - +] अचलगति एक
[। प] दोन
[। प । - - +] अचलगति तीन
[। प] दोन
[। प । - - +] अचलगति दोन

“हर्ष खेद ते मावळले
हास्य निमालें
अश्रु पळाले
कण्टकशल्यें बोथटलीं,
मख्यामालीची लव वठली,
काही न दिसे दृष्टीला,
प्रकाश गेला
तिमिर हरपला;
काय म्हणावें या स्थितिला?
झपूऽर्झा गडे झपूऽर्झा” (केक ११२)

२५९ **‘सदया’** [- । प । - +] उद्धव एक
[- । प । - +, - ˜ । +] मालिबाला एक
[- । प । प । प। प । - +] भवानी एक
[- । प । - +, - ˜ । +] मालिबाला एक

“मम हृदयीं जन्मा घेईं,
ये सदया, येथे राहीं, ये प्रभो! ध्रु॰
मी माझें लोपुनि जावो,
जग तुझेंच अवघें होवो ये, प्रभो!
मज म्हणोन कुणि दुर्भागि, बावळा, जोगि, मला क्षिति
नाहि, मला भय नाही,
तू माझा होऊनि राही हे प्रभो!” (उस ३९८)

२६० **‘अभिमता’** [। भृ । भृ] जीवनलहरी तीन
[। भृ । भृ । +] एक
[। भृ । भृ । भृ । +] धवलचन्द्रिका एक

“सांग कुठे पाहुं तुला सखि स्वतन्त्रते?
जनिं विजनीं सांग कुठे रमशि सुव्रते?
तू धन मम, तूच मान
तू जीवन, तूच प्राण

तव सूचित मज प्रमाण
अजुनि किती अन्त पाहशी?
हो प्रसन्न मज प्रणता शीघ्र **अभिमते**!" (टिक २०२)

## पुरवणी

हरावर्तनी समजाती

७४ अ देव [। - ~ - । - ~ - । - ~ - । +]

"कोणी काही नका शिकवुं आता!
दोष लावूं नका व्यर्थ ताता!
देइ हाते मला तात ज्यासी
लग्न होतांचि तो देव मजशी" (देशा ८९)

## वर्ग ५ वा

स्वैरपद्य जाति

स्वैरपद्यासाठी रा. व्यङ्कटेश शङ्कर वकील यांनी पद्मावर्तनीजातीचा, रा. आत्माराम रावजी देशपाण्डे यांनी अग्न्यावर्तनी जातीचा आणि रा. भवानीशङ्कर पण्डित यांनी भृङ्गावर्तनीजातीचा कसा उपयोग केला आहे याचें विवेचन पहिल्या अध्यायांत (पृ ३९-४३) सोदाहरण येऊन गेलेंच आहे. अ ग्न्यावर्तनीजातीचा उपयोग स्वैरपद्यासाठी केल्याचें आणखी एक उदाहरण, रा. वामन नारायण देशपाण्डे यांनी आपल्या 'चित्रवेडा' या अप्रकाशित काव्यांतून, कृपा करून पाठविलें आहे ते खाली देतों.

"चित्र आहे निस्तुकच हे बापुडें
हीन कोणी देहधारी कामिनी,
काय नकळे हेहि मतिला माझिया?
हासतां मग कासया?
काय परि करूं?
केवि तरि कथुं?
चित्र हें; नच देहिनी ही-हें कळूनहि मन्मन

चित्रितेच्या रूपदिप्तिस भाळलें!
शलभ आपण जाहलें!!" (चित्रवेडाकाव्य)

चरण मुख्यत: [। ७ । ७ । ५] असा असून अर्थानुरोधाने तो लहानमोठा करण्यांत आला आहे.

## अध्याय ७ वा

## छन्दश्छाया

बायकांच्या तोण्डीं असलेलें पुढील परम्परागत गीत पहा:-

तुझा । लाडका ग । यशोदा ऽ ऽ । माई,
तुझ्या । हरीने ऽ ऽ । खाल्लें माझें । दही. ध्रु॰
पहिली। बोलली ऽ ऽ । सुताराची । साळू
तिच्या । अङ्गणीं ऽ ऽ । खेळतसे । बाळू. १
दुसरी । बोलली ऽ ऽ । तेलङ्ग्याची । गङ्गा,
तिच्या । अङ्गणीं ऽ ऽ । घाली हरि । पिङ्गा. २
तिसरी । बोलली ऽ ऽ । ब्राह्मणाची । उमा,
तिच्या । अङ्गणीं ऽ ऽ । खेळे हरि । झिम्मा. ३
चौथी । बोलली ऽ ऽ । मराठ्याची । राणी,
तिच्या । अङ्गणीं ऽ ऽ । खेळे चक्र- । पाणी. ४

येथे चरणांतील पहिली टाळी तिसऱ्या अक्षरावर पडते, म्हणजे आद्यतालकपूर्व गण दोन अक्षरी आहे. तथापि दहापैकी तीन चरणांत हा आद्यतालकपूर्व गण त्र्यक्षरी दिसतो.

पहिल्या टाळीनें आरम्भ होणाऱ्या आवर्तनांत, ध्रुवपदाचा पहिला चरण वगळल्यास तीन तीन अक्षरें आहेत नि पुढे द्विमात्रक विराम आहे.

त्याच्या पुढील आवर्तनांत, पहिला चरण वगळल्यास चार चार अक्षरें आहेत. पहिल्या चरणांत त्या ठिकाणीं तीन अक्षरें असून पुढे द्विमात्रक विराम आहे.

तिसऱ्या आवर्तनांत सर्वत्र दोन दोनच अक्षरें आहेत.

हा एक पद्मावर्तनी छन्द आहे. छन्दांत प्रत्येक अक्षर, मग ते दिसायला लघु असलें तरी गुरु उच्चारायचें आणि गुरुच समजायचे असतें. सारींच अक्षरें गुरु म्हणजे द्विमात्रक मानायचीं हा छन्दाचा मूलभूत नियम असल्यामुळे पद्मगण हा चार अक्षरांचाच असतो. लघु अक्षरच नाही म्हणून लगक्रमाचा प्रश्नच उद्भवत नाही. म्हणून छन्दास लगत्वभेदातीत अक्षर सङ्ख्याक पद्य म्हणतात.

परन्तु प्राचीन रचना सहेतुकपणें रेखीव अशी नाही. तिच्यांत मध्येच एखादें अक्षर अधिक येतें. तेथे दोन अक्षरें त्वरेने एका गुरु अक्षराच्या म्हणजे दोन मात्रांच्या कालांत उच्चारायचीं असतात. ही दोन्ही अक्षरें लघु असल्यास ती दोन मात्रांच्या काळांत सहज उच्चारितां येतात. वरील पद्यांत चरणारम्भीं पहिली, दुसरी, तिसरी हे जे तीन शब्द आले आहेत त्यांतील पहिली

दोन दोन अक्षरें दोन दोन मात्रांच्या कालांत उच्चारायची आहेत. असें शैथिल्य आधुनिक छन्दोरचनेंत तरी नसावे. छन्द कण्टाळवाणा होऊं नये म्हणून त्यांतील अक्षरांची सङ्ख्या न्यूनाधिक केली पाहिजे असे मुळीच नाही. अकारान्त शब्दांतील अन्त्य अकार गाळून अथवा एक मात्रक उच्चारून उपान्त्य अक्षर अनुक्रमें चतुर्मात्रक वा त्रिमात्रक उच्चारल्याने तेवढें वैचित्र्य आणितां येतें. गाव हा शब्द गाव ऽ असा उच्चारण्याच्या ठिकाणी गाऽऽव अथवा गाऽव असा उच्चारितां येतो. पुन्हा हा भेद वैकल्पिक आणि वैयक्तिक उच्चारापुरताच असल्याने पद्याच्या स्वरूपांत विकृति कोणतीच होत नाही.

छन्द केवळ अक्षरसङ्ख्याक नसतो. छन्दांतहि लयबद्धता असावी लागते. प्रत्येक अक्षर द्विमात्रक असल्याने छन्द हे पद्मावर्तनी वा भृङ्गावर्तनी असतात; ते अग्न्यावर्तनी वा हरावर्तनी असूं शकत नाहीत. पण छन्दांची मोडणी ही जातिमोडणीसारखीच असते. जातींत जितका सशब्द मात्रा असतात त्याच्या अदपट अक्षरें त्या छन्दांत असायची. छन्दांत मागे छान्दस वा पुढे छन्द हा शब्द ठेऊन जातींचींच नावे छन्दांना दिलीं तर पारिभाषिक संज्ञांची सङ्ख्या तितकीच परिमित राहील. छन्द पादाकुलक म्हटलें की मात्रालेखन [। प । प] असेंह होणार; पण अक्षरें मात्र आठच असणार आणि टाळी अर्थात पहिल्या नि पाचव्या अक्षरावर पडणार. छान्दस रचना ही स्थूल असल्याकारणाने एकाच पद्याच्या अनेक मोडणी कित्येकदा सम्भवतात. शब्द कोठेहि तुटला तरी कानाला ते तितकें कडू लागत नाही. तथापि छन्दांतहि शब्द भलत्या ठिकाणीं तुटूं नये याविषयी काळजी घ्यायलाच पाहिजे. जातींत जेथे अपरिहार्यपणें यति येतो त्या ठिकाणीं छन्दांतहि यति पाळायलाच हवा.

पद्माचें विषमाक्षर आणि समाक्षर मिळून एखादा द्यक्षरी शब्द नसावा. '। कां लोक धा - । वती असे' यापेक्षा '। लोक कां धा -। वती असे' म्हणणें कानाला अधिक चाङ्गले लागतें.

मराठींतील अभङ्ग, ओवी, घनाक्षरी इत्यादिकांची रचना छान्दस आहे. ख्रिस्ती उपासनासङ्गीतांत 'इंग्रजी चालीवर' म्हणून जी पद्यें दिली आहेत ती वस्तुत: छन्दोरूप आहेत. संस्कृतांत आणि प्राकृतांत न आढळणारी ही लगत्वभेदातील छन्दोरचना मराठींत आढळते. अगदी आरम्भापासून आढळते ही गोष्ट चिन्तनीय आहे. ठोकळ मानाने लयाला अनुसरणाऱ्या लोकगीतांपासून छन्दाचा उगम झाला असावा. शिशुगीतांना म्हणूनच छन्द योग्य वाटतो.

ओवीची रचना अनियमित वाटते. महानुभाव लोकांत शके १५०० च्या मागेपुढें भीष्माचार्य नामक ग्रन्थकाराने आपल्या मार्गप्रभाकर नामक ग्रन्थाच्या ज्ञानखण्डांत ओवीचें पुढील प्रमाणे बान्धलेले लक्षण विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनी आपल्या मराठी छन्द या पुस्तिकेंत उद्धृत केले आहे:- "गायत्री छन्दोपासौनि धृतिपर्यन्त । ग्रन्थ वोवियाचे तीन चरण जाणावे निश्चित । प्रतिष्ठेपासौनि जगतीपर्यन्त । चौथा चरण." या लक्षणांत गायत्रीच्या ठिकाणीं सुप्रतिष्ठा आणि प्रतिष्ठेच्या ठिकाणीं मध्यमा अशी सुधारणा राजवाडे यांनी सुचविली आहे. एकूण काय लेखी ओवीचें स्वरूप फारच अनियमित आहे.

परन्तु ओवी हा गेय पद्यप्रकार होता असे दिसते. सङ्गीतरत्नाकराच्या प्रबन्धध्यायांतील पुढील अवतरण प्रो. ग. ह. रानडे यांनी माझ्या दृष्टीस आणिलें आहे:-

"खण्डत्रयं प्रासयुतं गीयते देशभाषया
ओवीपदं तदन्तेचेदोवी तज्ज्ञैस्तदोदिता
त्रयाणां चरणांना स्युरेकाद्यावृत्तितो भिदा:
आदिमध्यान्तगै: प्रासैरेकाद्यैश्च पदे पदे
छन्दोभिर्बहुभिर्गेया ओव्या जनमनोहरा:
सानुप्रासैस्त्रिभि: खण्डैर्मण्डिता प्राकृते: पदै:"

ज्या गेय ओव्या आजीबाईंच्या आणि मुलीबाळींच्या तोण्डून अद्यापि ऐकायला मिळतात त्यांतील शैथिल्य मर्यादित दिसतें. आणि त्या ऐकून ज्या ओव्या रचण्यांत येतात त्यांत ते शैथिल्यहि येतें. या ओव्याचे दोन प्रकार कल्पितां येतील. दोन्ही प्रकारांत चार चार चरण असले तरी पहिल्या प्रकारांत चाऱ्ही चरण जितपत सारखे असतात तितपत सारखे दुसऱ्या प्रकारांत पहिले तीनच चरण असतात आणि चौथा चरण तोकडा चार-अक्षरी असतो. हे जे चरण जवळ जवळ सारखे असतात ते सहा-अक्षरी सात-अक्षरी वा आठ अक्षरी असतात. चरण सात-अक्षरी वा आठ अक्षरी असल्यास आवर्तनारभ्भ अनुक्रमें दुसऱ्या वा तिसऱ्या अक्षरापासून होतो.

१ ल्या प्रकारच्या ओवीचीं काही उदाहरणें

(१) "। शितं तिथं । भूतं
घरीं । एक गज - । बज
बो - । बडा बोल । नाही
नाही । कानीं कुज - । बूज." (तासक १९४)

(२) "। भ्रताराच्या । राज्यीं
उणें । ठेवीना रे । देव
। बहिणीच्या । मनीं
चो - । ळीची आशा । ठेव." (तासक १९६)

(३) उ - । चकी लागे । माय,
काही। केल्याने रा - । हीना;
का - । ढिशी आठ - । वणी?
सुखी । माय, तुझी । मैना." (तासक १९५)

२ ऱ्या प्रकाराचीं काही उदाहरणें

(१) “। ये ग ये ग । गाई
बा- । ळाला दूदू । देई,
पर- । तोनी राना । जाईं
। चरायाला.”

(२) “। माझें मोठें । घर
केर । लोटितां लो - । टेना
सभा । बैसलीं उ- । ठेना
। भाऊजींची” (दलो २/६५)

दोन्ही प्रकारच्या ओव्या यापुढे समाक्षरक रचणें श्रेयस्कर होईल.

कित्येक छन्दांत जो आद्यतालकपूर्व द्यक्षरी गण आढळतो तो वस्तुत: द्विमात्रक असावा अशी शड्का म्हणण्याच्या धाटणीवरून येते. तसा तो असल्यास रेखीव पद्यांत तो एकाक्षरीच असावा हे इष्ट होय.

समाक्षरक ओव्या कशा वाटतील हे परम्पराप्राप्त ओव्यांतूनच काही निवडून पाहूं. यांना पुढे देवद्वार, तुलसी आणि पुष्पगुच्छ ही नावें दिली आहेत.

(१) “ । अड्गाईचे । घरीं
। मड्गाई ग । गेली
। सवड्गाई । झाली
दाणे । याची.

(२) का - । वळा काका । करी
घ - । राच्या आढ्या । वरी
पा - । हुणा घोड्या - । वरी
भाऊराया.

(३) फूल । फूल घोसा - । ळिये
फूल । गेलें ग । घोसांत
तुझें । सासर दे - । शांत
अम्बू - । बाई” (दालो २/६५)

अभङ्गाचा एक प्रकार या ओव्यांतील पहिल्या प्रकारासारखाच असतो हे सहज ध्यानांत येण्याजोगें आहे.

## वर्ग १ ला

### समछन्द

### पद्मावर्तनी

**१ कपिवीर छन्द** [ । प । प । प । प । - -] १८ अक्षरें
"गायका तू गीत गाशी की ओतिशी सुधेचा कलश,
मधुरता स्वरांतली अलौकिक गमते मनास;
देवांचा का गवई तू? गन्धर्व-लोकीं का तुझा वास?
तरीच का तेथली ये गोडी तुझ्या येथल्या गानास?"
(देवाना-विमा १/५)

२ **वनहरिणी छन्द** [ । प । प । प । प ] १६ अक्षरें
(१) "आटपाट नगरांत नान्दे राजाची ग राणी
नाव मैनाई तियेचें रूप गोड फुलावाणी.
नाही नोवऱ्याचा पत्ता, कुलशील न माहीत
चौदा चौकड्याचें राज्य तिच्या होतें पदरांत." (कोल ७१)
(२) "शोभिवन्त फूलपात्रीं ठेवियलीं फुलें दोन
कुणी रचनाकुशलें आणिली जी निवडोन,
परिचय उपचार अशालागी कसा व्हावा?
पटे नि:शब्द ओळख समदुक्खीसुखी जीवा."
(काकेना-ज्योमा १/३)

३ **हरिभगिनी छन्द** [। प । प । प । - - -] १५ अक्षरें
(१) ईश्वराची दया किती थाड्ग तिचा लागेना
न्यायी तरी त्याची प्रीती सिन्धू एवढी जाणा. १
देव बोले प्रेमें फार । टाकी माझ्यावरी भार. ध्रु॰

सर्व कष्टी सर्व दुक्खी ओझियांनी कण्हती
ऐकूं जातें दिव्यलोकीं प्रीति तेथे वसती." २ (उस ३३)

२ "चाल बाई चाल माझी, चाल सई चाल ग
कोवळे हे पाय मऊ मखमल लाल ग
इवलाले पाय तुझे, गोरे गोरे हात ग
चाल चाल, भिऊं नको, मोत्या माऊ हात ग!"

(देअ-आमा एप्रील १९३४)

या छन्दाची उदाहरणें उपासनासङ्गीतांत विपुल आहेत.

४ **वैकुण्ठ छन्द** [। प । प । - - - ऽ ऽ । - - -] १४ अक्षरें

(१) "तुकाराम म्हणे, जिजा तू माझी -॰ बायकू
**वैकुण्ठाला** चल नको कोणाचें -॰ आयकू" (भागू)

(२) "पाखरांची शाळा भरे पिम्पळा -॰ वरती
चिमण्याचीं पोरें भारी गोड्गाट -॰ करिती.
उतरतें ऊन, जाते टळूनी -॰ दुपार
पारावर जसा यांचा भरतो -॰ बाजार." (पारा ६६)

मायादेवकृत 'गोकूळ' (माभा ७४) या कवितेची रचना शिथिल आहे.

५ **लवङ्गलता छन्द** [। प । प । प । - -] १४ अक्षरें

(१)"सौरी झाले जनीं
रामा केला धनी. ध्रु॰
शान्तिगुन्ती घेऊन हातीं भक्तिचोळी ल्याली,
मीतूपण ठावें नाही विसरून गेली.
कर्म नेणे धर्म नेणें, नेणें आम्ही काही
ज्ञानदेव म्हणे आम्हां येणें जाणें नाही." (ज्ञापस १/६)

(२)"येई गा तू येई गा तू पण्ढरीच्या राया
तुजवीण शीण वाटे, क्षीण झाली काया,
याति हीन मति हीन, कर्म हीन माझें;
दीननाथ दीनबन्धु नाम तुम्हां साजे.
विटेवरी उभा नीट कटीवर कर,

तुका म्हणे आम्हां हेचि ध्यान निरन्तर." (तुका-पस १/८१)

(३)"ये ग ये ग चिऊ. ध्रु॰
हात हलवून तुला किती वेळा बाहूं? १
तुझ्यासाठी कापसाचें घर केलें मऊ." २
(मागत्र्यं-आमा जुलै १९३६)

ज्ञानेश्वर पृ ७७, पद्य ३१ वें (चित्रशाळा प्रत), तुकाराम (२/१५०, अभङ्ग क्रम २४९९-२७५२ इंदुप्रकाश गाथा.), 'रूपगर्विता' (देवाना-कार ४०/७) 'सुना, सुना' (माअ ८), 'वाघ्याचे गाणें' (स्त्रेप्र १७) इत्यादि गीते या छन्दांत आहेत.

६ **शुक्रकला छन्द** [। प । - -, - - । प । - -] १४ अक्षरें
"तरीच मशी बोल पोरा जिव्हाळ्याची ओल.
मशी घेतां भास जीवा,अ मीतूपणा नास.
मजसवें खरा पण जाऊं नेदी घरा.
आमुचिये रङ्गी दुजें तगेना ये सङ्गीं.
तुक्यासवें भास हरी जीवा करी नास." (अभङ्ग १५४ वा)

७ **दयिता छन्द** [। प । - - - ऽ ऽ । प । - -] १३ अक्षरें
"एकान्तीं ज्या सकाळीं-॰तसा दुपारींही
तसेच सन्धिकाळीं-॰ फिरून रात्रींही;
मनांतून टाकूनी-॰ विषयवासना
विनम्रता धरुनी-॰ करीच प्रार्थना." (उस ४२८)

८ **चन्द्रकान्त छन्द** [। प । प । प । -] १३ अक्षरें
(१) "भज रे मना रे बा रे भज रे मना
रामकृष्ण वासुदेव भज रे मना
आता काय नरदेह येईल पुन्हा?" (प्राचीन पद्य)

(२) "अखण्डित असावेसें वाटतें पायीं.
साहोनी सङ्कोच ठाव थोडासा देई.
असो नसो ठाव आलों तुझिया ठायां.
पाहें कृपादृष्टी मज पण्ढरीराया!

तुका म्हणे आम्हीं तुझीं वेडीं वाकडीं,
नामें भवपाश हातें आपुल्या तोडीं." (तुकाराम पृ. १८७)

(३) "बघा माझी बेबी किती आहे तरी गोड
उतर ना खाली बेबी, जरा तरी सोड." (माअ ११)

श्रीयुत वामन नारायण देशपाण्डे यांचे 'कपटवेष' हे नाटक याच छन्दांत पण निर्यमक आहे. आरम्भींच्या ओळी अशा:-

रमणी-"उषे, ठेव आवरून पूजासाहित्य.
झाली बाई यथासाड्ग पूजा अवघी
सन्ध्ये, सार वाती जरा समईतल्या
उषा----- निके महाराज-----
रमणी--- मूर्खे, वोसणशी का?
महाराज गे मी आहे की महादेवी."

९ **दोहा छन्द** [। प । - - - ऽ ऽ । प । +] १२ अक्षरें

"गृहाप्रति ममता -॰ देई शोभा फार
प्रेम तेथे वसतां -॰ सुख नान्दणार
शान्ति तेथे राहती
तृप्ति तेथे नान्दती
वेळ वेगें क्रमती -॰ सर्व साधणार १
गृही जया ममता -॰ क्रोध न तिथे
प्रेम गृहीं वसता -॰ न हेवा तिथे
झोपडींत नान्दलों
दुक्खहानि पावलों
प्रेम बद्ध राहिलों -॰ सर्व साहवे". २ (उस ४५२)

या छन्दात कडव्यांत अन्तरा आहे.

१० **चक्रपाणि छन्द** [- - । - - - ऽ ऽ । प । - -] ११ अक्षरें

"पहिली बोलली -॰ सुताराची साळू
तिच्या अड्गणी -॰ खेळतसे बाळू
दुसरी बोलली -॰ तेलड्ग्याची गड्गा
तिच्या अड्गणी -॰ घाली हरि पिड्गा

तिसरी बोलली -॰ ब्राह्मणाची उमा
तिच्या अङ्गणी -॰ खेळे हरि झिम्मा
चौथी बोलली -॰ मराठ्याची राणी
तिच्या अङ्गणी -॰ खेळे **चक्रपाणी"** (प्राचीन पद्य)

११ **वंशमणि छन्द** [। प । प । - -] १० अक्षरें
"निखळून गगनांमधून
पडतां हे वेगे कोसळून
कोणी तरी अदृश्यचि कर
खाली खाली ओढी अनिवार"
(देवाना-रमा ८।२)

१२ **पादाकुलक छन्द** [। प । प] ८ अक्षरें
(१) "कान्हा वाटे देव भेटे
हातीं पायीं तोचि दाटे.
ओळखिला देव राजा,
सर्व शोक गेला माझा.
समसङ्गें सङ्ग गेला
रङ्गेवीण रङ्ग केला." (केस्वा-पस १/२११)

(२) "ऐशी ऐकोनिया वाणी
नेत्रानें उघडी राणी,
वाटे मनास नीरोषा
पावला भूपति तोषा" (मोसारा २/७)

(३) "सेवितां श्रीगुरुकुळ
ब्रम्ह त्रैलोक्य गोकुळ
दासपुत्र अनुकूल
आहे आहे नाही नाही." (अक १३)

(४) "मिठी हातां हातीं पडे
दिठी दिठीवरी जडे
अपुल्या ग हृदयाचे

सुरू झाले हे पवाडे.
मधुरात ही चान्दणी
खुले मोगरा अङ्गणी
    परिमल दरवळे
मन्द वायु श्वासांतूनी.” (पगन-वामा ५/१)

१३ **अचलगति छन्द** [। प । - - -] ७ अक्षरें

(१) “काय साङ्गो तूज गा
अन्तरींचें गूज गा?
मोलें हाता येईना,
बोलें प्राप्त होईना;
द्वैतसङ्ग साण्डूनी
राहे तूचि माण्डूनी.” (केस्वा-पस १/२०७)

(२) “देवस्तुति वाढवा
त्याची दया गाजवा
ईश्वराची करुणा
सर्वकाळ सरेना.” (उस ३१)

‘भातुकलीचें गाणें’ (माजूस्व १०८) ‘आभाळाच्या अङ्गणीं’ (पचचा) आणि ‘सुशे सुशे उठ ग’ (माअ १) या कविता या छन्दांत आहेत.

१४ **देवी-वर छन्द** [- - ! प । - -] ८ अक्षरें

(१) “रूप पाहतां लोचनीं
सुख जालें वो साजणी
सर्व सुखाचें आगर
बाप रख्मा**देवी-वर**” (ज्ञानदेव)

या छन्दांत पहिल्या दोन अक्षरांचा गण आद्यतालक पूर्व असल्याने त्याच्या अन्तीं बहुश: शब्द पुरा व्हावा लागतो. अभङ्गरचनेंत हा गण कित्येकदा मध्येच गाळलेला दिसतो.

(२) “घेई घेई माझे वाचे,
गोड नाम विठोबाचें.

तुका म्हणे जीवा,
नको सोडूं या केशवा."

(३) "शुद्ध बीजा पोटीं
फळें रसाळ गोमटीं.
मुखीं अमृताची वाणी
देह वेचावा कारणीं.
सर्वाङ्गीं निर्मळ
चित्त जैसें गङ्गाजवळ.
तुका म्हणे जाती
ताप, दर्शनें विश्रान्ती."

(४) "नको देवा कधी देऊं
कुणा परतन्त्र जिणें
त्याच्याहून दारोदारीं
बरें भिक्षान्न सेवणें." (कावि ८८)

(५) "माझ्या छकुलीचे डोळे
दुध्या कवडीचे डाव
बाई कमळ कमळ!'
गोड चिडीचं ग नाव." (कोल ५६)

या छन्दांत त्रिपद्यांची आवलि रचणें बरेच कविप्रिय झाले आहे.

(६) "आकाशींच्या अन्तराळीं
तारकांना तेज चढे
तुझी माझी प्रीति जडे." (अफु ६१)

१५ **उद्धव छन्द** [- । प । - -] ७ अक्षरें

(१) "दिवस मावळूं दे,
विझूं दे निमिषांत
प्रकाश दिवसाचा

वाढत्या तिमिरांत.” (देवाना-विवी १३७)

(२) “कासया घोड्गावून
स्फुन्दशी मरुद्गणा?
चहाळ लागतांच
दचके माझा कान्हा.”
(देवाना-रमा मे-जून १९२९)

१६ **शुद्धसती छन्द** [। प । - -] ६ अक्षरें

(१) “आसवांच्या माळा
साठवूं या किती?
घालाया त्या गळां
वाट पाहूं किती?
दीप पाजळिला
अखण्ड ही वात
धीर दे ये तिला,
वाहे झन्झावात.” (देकु-यमा १७/१८)

‘कमी आणि ठमी’ (माअ २४) ‘डोला बाई डोला!’ (माजूस्व १५४) आणि ‘बोकोबा’ (माशि ४) या कविता याच छन्दांत आहेत. या छन्दांत अन्त्यावर्तनांत जी दोन अक्षरें असतात त्यांचा बहुश: अलग शब्द असल्याने तो पुनरुक्त करितां येतो. परन्तु तेवढ्याने छन्द निराळा होत नाही.

(१) “आहे बरें आई आई
रडूं नको काही काही
घालितें मी तोतो तोतो
करितें मी जो जो जोजो” (माशि ५)

१७ **गजवदन छन्द** [। प । - - ऽ ऽ ऽ ऽ । प । - -] १२ अक्षरें

हा छन्द शुद्धसतीछन्दाच्या द्विरावृत्तीने होतो.

(१) “जाडीचें घोडगडें -॰ येव्हढीये राती
कानींची कुण्डले -॰ करी जग ज्योती
होय न हो ऐसा -॰ संशय गमला
निर्धारितां विश्व -॰ व्यापक देखिला

हृदयमन्दिरीं -ु दाटोनी धरावा
ही च खूण साङ्गे -ु भानुदास देवा."
(तुकारामतात्यासम्पादित एकनाथ गाथा पृ. १४१)

(२) "गजवदना रे -ु गजवदना रे
नमितों तुजला -ु गजवदना रे
मध्वनाथचित्तीं -ु वाटे तुझी खन्ती
येशी धावोनिया -ु गजवदना रे." (ममुक २)

(३) "यज्ञ शम्भरावा -ु होतांच पुरता
गमे भूपा झाली -ु जन्म सफलता
कुणा दे दक्षिणा -ु कुणा देई भूमी
याचकां सन्तुष्ट -ु करी अन्तर्यामीं
घडविली तेणें -ु यज्ञ पुरुषाची
कलाकुसरीची -ु प्रतिमा सोन्याची."
(देवाना-विमा १/९)

(४) "आलेलें भरासी -ु देवा रे कणीस
मोडूनी दयाळा -ु लाविसी भिकेस
मळा पिकविला -ु भावनेचा
बिन्दु बिन्दु माझ्या -ु गाळून श्रमाचा"
(पा-फ ३०)

१८ **भुवनसुन्दर छन्द** [- - ! प । -] ७ अक्षरें

(१) "नाना बाहुली माझी
बघा कोनाड्यामाजीं
तिला पिसांची गादी
तिची रेशमी साडी." (माजूस्व १०८)

(२) "बघ चान्दोबा बाई
माझ्या सङ्गती येई;
बिम्ब आभाळीं हाले
माझ्या सङ्गती चाले." (गिका १०)

१९ **पिशङ्ग छन्द** [। प । -] ६ अक्षरें

(१) “दृश्यातीत रे
सदोदित रे
भगवन्त रे
नान्दे नित्य रे
रूपे वीण रे
परिपूर्ण रे
नारायण रे
आहे जाण रे” (केस्वा-पस १/१५०)

या छन्दाची मोडणी [। भृ । - -] अशीहि होईल, मात्र त्या मोडणीला सहेतुकपणें अनुसरून रचना केल्यास शब्द निराळ्या रीतीने बसतील. उदाहरणार्थ ‘इवला झरा’ (देनाघ-ओ ६) ही कविता पहा.

‘काऊ काऊ गे!’ (माजूस्व ११९) ही कविता या छन्दांत आहे.

२० **“आन्दोलन” छन्द** [। प । - ऽ ऽ ऽ ऽ ऽ ऽ ! प । -]

(१) “देव घ्या कोणी देव घ्या कोणी
आयता आला घर पुसोनी
देव नलगे देव नलगे
साठवणेचे रुधले जागे
दुबळा तुका हा भावेविणे
उधारा देव घेतला रिणें.” (तुकाराम पृ. ३५८)

(२) “ताई गुणाची माझी छकुली
झोका दे दादा म्हणूं लागली.
साभ्भाळ ताई फान्दी वाकली
दोन्ही दोरांना गच्च आवळी
जो जो गे जो जो! (दक ६२)

(३) “तीन चाकांचा गाड रड्गीत
बाळ ऐटीने नेई रेटीत
चौफेर हिण्डे खेळत हसे

दृष्टि त्यावर ठरत नसे"

(मञ्जुबाळ-आमा जुलै १९१३)

'प्रभुसहवासार्थ विनन्ती' (उसं ४३६) आणि गोपीनाथकृत 'आमची इन्दु' (गोदू ७) या कविता आन्दोलन या छन्दांत आहेत. पुढे पहा.

२१ **पद्‌य छन्द** [। प] ४ अक्षरें

"काळा काळा
मट्ट्या आला
नीज बाळा
लाव डोळ." (पचचा ४०)

२२ **'विठ्ठल' छन्द** [। - - -] ३ अक्षरें

(१) "जीव तू
प्राण तू
आत्मा तू
विठ्ठला." (नामदेवगाथा पृ. ७१)

(२) "ये काऊ
घे खाऊ
खा दाणा
वाटाणा." (पचचा २६)

भृङ्गावर्तनी

२३ **दासी छन्द** [। भृ । भृ। भृ । भृ] १२ अक्षरें

"तू प्रिय, हे प्रभु, तू प्रिय अपार
तू प्रिय, हे येशु, त्वां केला उद्धार
मला तू सुप्रिय, हें कैसे दावीन?

सम्पूर्ण शक्तीने मी तुला स्तवीन!" (उस ३४२)

२४ **परिलीना छन्द** [। भृ । भृ । भृ । - -] ११ अक्षरें

(१) "ऐसा गे माय ऽऽ कैसा हा योगी
जे ठायीं जन्मला ते ठाय भोगी. ध्रु॰
आचार साण्डोनी झालासे भ्रष्ट
मावशीसी जेणें लाविला पाट." (ज्ञ-पस १/२)

(२) "ज्याचा तो जाणे ऽऽ ज्याचा तो जाणे
जाणीव निमाली त्यासीच बाणे
जनीं जनार्दन जाणोनि वागे
पदोपदीं त्यासि समाधि लागे
स्वसुखसागरीं हरपे चित्त
ठायींच्या ठायीं ऽऽ पूर्ण निवान्त." (केस्वा-पस १/२११)

(३) "स्वागताच्या केला अङ्गणीं थाट
बघत बैसले तुझीच वाट
आशेसम उन्च तरूची शाखा
तिच्या खाली बघ बान्धिला झोका
सभोंती शीतल सावली दाट." (गां-यमा ३८)

(४) "एकत्र गुम्फून जीवन-धागे
प्रीतीचें नर्तन नाचलों मागे,
एकटा उभा मी तेथे
भोवती शोधीं प्रियतें;

न दिसे कोठे; का सोडून गेली?
लोपते का कधी प्रीति उदेली?" (माजूस्व ७९)

२५ **जीवनलहरी छन्द** [। भृ । भृ] ६ अक्षरें

(१) "धडाड धडाड
खडाड खडाड

धावते ही गाडी
केवढी धडाडी! (माजूस्व १११)

'हें कोण गे आई?' (तासक ८०) आणि 'वाघाची मावशी!' (माशि ७) या कविता या छन्दांत आहेत. तिसऱ्या अक्षरानन्तर द्विमात्रक विराम घेतला तर छन्द पद्मावर्तनी होईल.

(२) "नदीच्या ऽऽ पैलाड
दामाजी ऽऽ सोनार" (भुलाबाईचें गाणें)

याच्या पुढील ओळी

"त्याने घडविला
साखळ्यांचा जोड"

यांत तिसऱ्या अक्षरानन्तर यति नसल्याने त्या

। त्याने घड - । विला
। साखळ्यांचा । जोड

अशा म्हणाव्या लागतात. हे चरण अर्थातच [। भृ । भृ] या छन्दांत बसूं शकत नाहीत. त्या शुद्धसती छन्दाच्या आहेत.

२६ **निर्झरगीत छन्द** [। भृ । - - ऽ ऽ । भृ । - -]

"इवला झरा गायन गात
चान्दण्यासवें हासली रात
हालेना जरा वेलीचें पात
निजली धरा निजलें रान."

(देनाघ-ओ ६)

या छन्दाशी मागील आन्दोलनच्छन्द अवश्य ताडून पहावा.

**वर्ग २ रा**

अर्धसम छन्द

**पाद्मवर्तनी**

२७ **'प्रसाद' छन्द** [- - - ऽ ऽ । - - -, - । - - - ऽ ऽ । - - -]
[प । प । - - - ऽ ऽ । - - -] चक्रपाणि

पोर ही -॰ सानुली की सोन्याची -॰ बाहुली,
देव हिच्यावर ठेवो मायेची -॰ साऊली.
सुन्दर -॰ हसते नि मोहक -॰ रुसते,
ठेपराईने ही कशी चालते -॰ बसते!
बोबडे -॰ बोलते नि हृदय -॰ खोलते,
मन माझे बोबड्या या बोलांनी -॰ डोलतें.
साधेच कपडे ही घालूनी -॰ बागडे,
गौरीहून ज्याला त्याला परी ही -॰ आवडे.
या हो या -॰ पाहुणे या नवे या, -॰ या जुने
भण्डाऱ्याचा **प्रसाद** घ्या, काहीही -॰ ना उणें. (२७०)

२८ **दिव्यप्रभा छन्द** [। प । प । प । - - -] १५ अक्षरें
[। प । प । - - -] ११ अक्षरें

''पुन्हा उठण्याच्या काळीं देह आत्मा जडणार
दुक्ख रडणें की कष्ट न होणार
शीणलेल्या शरीराला तै विसावा मिळू
अन्तीं येई **दिव्यप्रभा** फाकूनी.' (उस १४७)

२९ **रक्षा छन्द** [। प । प । प । - -] १४ अक्षरें
[। प । - -] ६ अक्षरें

''नाव तुझें ऐकूनिया दयाळा रङ्क मी
आलों तुझ्या धामीं!
दारीं याचकांची दाटी भिनली अपार,
देणग्यांचा वर्षाव तू करिशी त्यांवर
मुखीं त्यांच्या चाले तुझा जयजयकार
निनादे अम्बर.

मीही तुजपुढे उभा राहिलों येऊन
करांते जोडून.” (देवाना-विविधविस्तारविशेषाङ्क १९३२)

३० **मूढा छन्द** [। प । -] ५ अक्षरें
[। प । प । प । -] १३ अक्षरें

(१) “या ऽऽ बाई या
बघा बघा कशी माझी बसली बया
ऐकूं न येते
हळुहळू अशी माझी छबी बोलते.
डोळे फिर्वीते
टुलुटुलू कशी माझी सोनी बघते.
बघा बघा ते
गुलुगुलू गालांतच कशी हसते.
मला वाटतें
हिला बाई सारें काही सारें कळतें.” (दक ६५)

३१ **मृत्युदरी छन्द** [। प । प । प] १२ अक्षरें
[। प । प । - - -] ११ अक्षरें

(१) “प्रभु रे ऽऽ मला असे गुण लाव लाव रे ! ध्रु॰
नीति, दया, प्रीति, नम्रताहि भीति,
यांचा मला पडो खरा डाव रे. १
शास्त्र, भक्ति, स्तुति कीर्तनावडी ती,
यांची मला सुटो बहु हाव रे. २
**मृत्यूदरींतून** पार नेऊनिया
देशी अन्तीं निजपदीं ठाव रे.” ३ (उस ४१५)

३२ **तेजस्वी छन्द** [। प । प । - - -]
[। प । प । - -]

“तेजस्वी ताऱ्या, तू ये उदयाला
दूर करावा निबिड अन्धार
वाट येशूची दिसावी आम्हांला
दृष्टी पडावा तो जगदुद्धार.
आम्ही जगाच्या राजास अर्पाया
भेटी अमूल्य आणाव्या की काय
ख्रिस्त येशूच्या कृपेला पावाया
चाले कधी न द्रव्याचा उपाय
सोनें की रत्नें ही अर्पणें व्यर्थ
प्रेम अर्पावें हे आवडे फार
ख्रिस्त गणी की हा श्रेष्ठ पदार्थ
दीनांच्या प्रार्थना प्रिय अपार.” (उस १३४)

३३ **दीनवत्सल छन्द** [। - - - ऽ ऽ । - - - ऽ ऽ । -] ७ अक्षरें
[- - । - - - ऽ ऽ । - -] ७ अक्षरें

(१) “धावरे धाव आता
दीनवत्सला रामा!
संसारसङ्गें दोषी
नित्य गुन्तलों कामा.
तारुण्य-अभिमान
देहीं भरला ताठा
वैभव-सम्पत्तीचा
अङ्गीं फुटला फाटा” (ए-पस १/६९)

(२) “काय तें तूज साङ्गों?
नये साङ्गतां कोणा.
वृत्तीसी ठाव नाही
कैंचा दाखवूं खूणा!” (केस्वा-पस १/६९७)

या छन्दांतील ‘धाव रे रामराया’ हें रामदासी पद्य सुप्रसिद्धच आहे.

भृङ्गावर्तनी

३४ **“सद्वित्त छन्द”** [भृ । भृ । भृ । भृ] १२ अक्षरें
[भृ । भृ । - -] ८ अक्षरें

“मोकळे हाटीं ऽऽ सोडिल्या गाठी
विकऱ्या घातले कण
ज्याचे भाग त्यासी देऊनी वारिले
सारूनि लिगाड दान
खरें माप हातीं घेऊनि बैसलों
मानिती ते चौघेजण
खरे वित्त तेथे आले चोजवीत
गिऱ्हाईक सन्तजन”. (तुकाराम २/पृ. ३०९)

## वर्ग तिसरा

विषम छन्द

१ ला प्रकार

३५ **‘अग्निमेघ’ छन्द** [। प । प । प । - - -] दोन चरण
[। प । प । - - -] एक चरण

“यात्रिका, प्रभो मला तू या रानांत चालवीं,
आसरा दे दुर्बलाला, भीतिलाहि घालवीं
दिव्य साचें अन्त तूचि पुरवी. १
प्रस्तरा विदारूनीया जीवना आम्हा दावी
अग्निमेघ देऊनिया स्वर्गमार्ग सूचवी
हे समर्था ये तू मला विभवीं.” २ (उस ३२९)

३६ **“जलारोहण” छन्द** [। प । प । प । - -] दोन वा अधिक चरण
[। प । प । प । - - -] एक चरण

"माझी आगबोट चालली दर्यांत ग दर्यांत ग!
मन धावत तरी तव हृदयांत ग. ध्रु॰
हळू हळू पाण्यामधी जुनें जग बुडे
निळ्या काळ्या दर्यावर दैव स्वैर उडे
तुझ्या चिन्तनाने दिल तटीं धडधडे
वर खाली लाटेवरी हेलकावे खात ग" १ (बोप्र ४१)

३७ **श्यामाराणी छन्द** [। प । प] दोन वा अधिक चरण
[। प । प । प । - - -] एक चरण

(१) "आम्हीं जाणावें ते काई
तुझें वर्म कोण्या ठायीं
अन्तपार नाही नाही ऐसें श्रुति बोलती." (ज्ञानदेव)

(२) "राम आकाशीं पाताळीं
राम नान्दें भूमण्डलीं
"रामयोगीयांचे मेळीं सर्व काळ तिष्ठत" (रामदास)

पुढील पद्यांत ध्रुवपद निराळें आहे.

(३) "भक्तांचिया काजासाठीं
साधूंचिया प्रेमासाठीं सोडिली मी लाज रे
वेडीं गौळोयांची पोरे
त्याचें ताक प्यालों बारे!
खातां भिल्लिणीचीं बोरें उच्छिष्टाचें चोज रे १" (भमाप्र ७५)

ज्याला घनाक्षरी वा हिन्दींत कवित्त म्हणतात तो हाच छन्द होय.

३८ **स्मर छन्द** [। प । प ] दोन वा अधिक चरण
[। प । प । प । - -] एक चरण

(१) "तुझ्यावीण अन्तरींची प्रतिभा फुलेना ध्रु॰

दाटे हुरहूर मनीं
सूर लागेना कवनीं,
ऐकूं ये ना वीणाध्वनी
सारङ्गीची तार तारेसङ्गती जुळेना?" (गिफ २)

(२) "आता फार विरहाचे दिवस कठिण!
रङ्ग-पञ्चमीचा आला नवलाचा सण. धृ॰
वसन्ताची शोभा थाटे,
वेलियाचा बन्ध सुटे,
शशिबिम्ब नभीं नटे, मन्मथाचे बाण. १
चोहीकडे रसरङ्ग -
उत्सवांत जन दङ्ग,
प्रणयिनी प्रियासङ्गं करी नृत्य-गान. २
माझ्या जीवलग जीवा,
मज भेटशील केव्हा?
आळवीत जीवाभाव वाचवी रे प्राण!" (बो-विमा ३/८)

'दग्धपक्षपतङ्ग' (माजूस्व १४२), 'क्षुद्र जीवनजन्तूस' (यग २२), 'गुन्हेगारीण' (यग ६१), 'जगराहाटी' (यग १२२), इत्यादि कविता याच स्मरछन्दांत आहेत.

३९ **अञ्जनी छन्द** [। प । प] दोन वा अधिक चरण
[। प । प । प । -] एक चरण

(१) "उगवती ज्या सुरजा
नवरत्नें बान्धूं पूजा
मुगुटीं भाव पै दुजा, उपमा नाही.
पुण्डलीकाचेनी भावें
श्रीविठ्ठल येणें नावें
भानुदास म्हणें दैवें जोडिलें आम्हा." (श्री एकनाथ गाथा पृ. १३७)

(२) "कोठे हो कोठे
बाळ यशोदे?
म्हणे पूतना आण येथे मला पाहूं दे. धृ॰

काय साङ्गों? मनामाजी
आनन्द कोन्दला आजी
दाटला हो पान्हा, आधी कान्हा पाजूं दे. १
चित्त उतावीळ झालें
भाग्य माझें फळा आलें
कृष्णासी हे मटामटा दूध घेऊं दे. २
आनन्दनन्दनस्वामी
सर्वसाक्षी अन्तर्यामी
नेणोनी ते म्हणे, आण अङ्कीं ठेवूं दे." (आपूव २१)

(३) "झिम्मा खेळूं ये
झिम्मा नाचूं ये
आकाशींचे तारेसङ्गे झिम्मा खेळूं ये. ध्रु॰
चान्दण्याच्या चन्द्रज्योति
हिमगिरी चकाकती,
हासऱ्या त्या ज्योतीसङ्गे झिम्मा खेळूं ये." १
(सरद-मशा १/१११)

(४) "प्रिय प्रभु येशु ख्रिस्ता
थारा मिळेना जन्मता
मालक सृष्टीचा असतां अरे रे रे रे !
किती विव्हळ तो झाला!
घाम रक्ताचा वाहीला,
बागीं किती शोक केला अब ब ब ब ब!" (उस ८१)

४० **प्रसन्ननयना छन्द** [। प । प] दोन वा अधिक चरण
[। प । प । - - -] एक चरण

"हें बान्धूं इच्छी मातें आजी आताता ध्रु॰
भारी बळ याला आजी
फावले अङ्गाला काजी
राजीव रे या समाजीं आताता." १ (आगो ३७)

४१ **रामरसायन छन्द** [। प । - - -] दोन वा अधिक चरण
[। प । प । प । - - -] एक चरण

(१) “अर्जुना, तू जाण रे
होशी बा सुजाण रे
विश्व नाही मीच आहे सख्या, तुझी आण रे.”
(वामन भयाप्र ६९)

(२) “क्षीरसिन्धुवासी रे
लक्ष्मी त्याची दासी रे
अर्जुनाचीं घोडीं धूतां लाज नाही त्यासी रे.” (श्रीस्वा-पस ३/८०)

(३) “राहे ऋषिराय हो
तेथे उणें काय हो?
निशिदिनीं सेवा करी दुर्योधन राय हो.” (पास्था ८)

(४) “बोल राघू बोल रे
काही तरी बोल रे
मन तुझें माझ्यापाशीं थोडें तरी खोल रे.” (कु-विम १/५)

४२ **परात्परकरुणा छन्द** [। प । - - -] दोन वा अधिक चरण
[। प । प । प । -] एक चरण

“ध्यातां सुतकामिनी
जातां दिनयामिनी
घडी एक तरी मनीं आठवा राम.” (वाग्र ४/२३३)

४३ **वनगमन छन्द** [। प । - - -] दोन वा अधिक
[। प । - - -] एक

"या रानांतूनी जातां
त्या सुरम्य भूप्रान्ता,
बापा तू धरी हाता
चालवी चालवी. १
शोषें मी माराराती
पाहीं रम्य तें पाणी,
गोडी बा तया आणी
चालवी चालवी." २ (उस ३३२)

४४ **शरदिन्दु छन्द** [। प । - - -] दोन वा अधिक चरण
[। प । -] एक चरण

(१) "**शरदिन्दु** यामिनी
वेणुरत कामिनी
जाती गणगामिनी
हरिकारणें.
कामें सर्व सोडिती,
आर्यमार्ग मोडिती
गृहपाश तोडिती
प्रेमें हरिच्या." (वाग्र ४/२३५) रासक्रीडा

(२) "ऐकी नाकीं बाळिया
कानीं मोती ल्यालिया
त्याही नाही राहिल्या
पावल्या तेथे.
पाड्घरुणें नेसल्या
नेसणीं पाड्घुरल्या,
त्याही नाही राहिल्या
पावल्या तेथे." (ममुक ६४)

'कान्होबाची सड्गती' हे विष्णुदास नाम्याचें पद्य (पस २/५४) याच शरदिन्दुछन्दांत आहे.

४५ **गया छन्द** [। प । - -] दोन वा अधिक चरण
[। प । प । प । - -] एक चरण

(१) “अगा जनावना
प्रभो महामना
दयाघना तुझ्या विना पटेन मी कुणा?” १ (उस ९८)

(२) “ओझें डोईवर
चले भरभर
बळकट बान्धियेलें बाळ पाठीवर.
भुकेलें तान्हुलें
रडाया लागलें
’उगी उगी!’ म्हणत ती माता वाट चाले.” (सपाजि-सुगी ४७)

४६ **“पुष्पगुच्छ” छन्द** [- - । प । - -] तीन चरण
[- - । - -] एक चरण

(१) “फूलफूल घोसाळिये
फूल गेलें ग घोसांत
तुझें सासर देशांत
अम्बूबाई.” (दालो २/६५)

(२) “वर्षा वर्षतो ग दारीं,
न्हाऊं घाली अवनीला
सुधाद्दीष्ट तुझी मला
सख्या जैशी. १

डोलडोलती या वेली
मन्द सजल पवनें
जेवि तुझ्या निश्वासाने
झुलते मी. २
हासहासती हीं फूलें
दवबिन्दुंच्या मोत्यांनी

आणि तुझ्या प्रेमाश्रूंनी
गाल माझे. ३

तरुतरूंच्या कोटरीं
पाखरें ही विसावलीं
जेवि तुझ्या वक्षस्थलीं
उदारा, मी.'' (४ पप-स्फूमा क्रमाङ्क ३८)

(३) ''उभी झोपड्याच्या दारीं
तिन्ही सान्जा झाल्या तरी
कां न येई बाई स्वारी?
कुठे पाहू?'' (मना-वामा ५/२)

४७ **'तुलसी छन्द'** [- । प । - -] तीन चरण
[- - । - -] एक चरण

(१) ''कावळा काका करी
घराच्या आढ्यावरी
पाहुणा घोड्यावरी
भाऊराया.'' (दालो २/६५)

(२) ''पहिली माझी ओवी
पहिला माझा नेम
**तुळशी**खाली राम
पोथी वाचे.'' (प्राचीन लोकगीत)

(३) ''ऐकाया रात्रीं गोड
जेधवा रातकिडे
गातात चोहीकडे
जनीं वनीं.'' (देवाना-वामा ४/४)

या कवितेची आणि ‘कोणासाठी’ (सनामा-विभा १/४), नि ‘आमचें घर’ (माजूस्व ११०) या कवितांची रचना याच तुलसी छन्दांत आहे.

४८ **“देवद्वार”** छन्द [। प । - -] तीन चरण
[- - । - -] एक चरण

(१) “देवाचिये द्वारीं
उभा क्षणभरी
तेणें मुक्तिचारी
साधियेल्या-“ ज्ञानदेव (भमाप्र १७)

(२) “तू माझी माऊली
मी वो तुझा तान्हा
पाजीं प्रेम पान्हा
पाण्डुरङ्गे.
तू माझी गाऊली
मी तुझें वासरूं
नको पान्हा चोरूं
पाण्डुरङ्गे.
नामा म्हणे होसी
भक्तीचा वल्लभ
मागे पुढे उभा
साम्भाळिशी. (भमाप्र ४७)

(३) “पली माझी ओवी
गाईन जगत्र
पाहीन पवित्र
पाण्डुरङ्ग” (तुकाराम)

४९ **कालावेग छन्द** [। प । -] दोन वा अधिक चरण
[। प । प । प । +] एक चरण

